# कृष्णनीती-विचार

(आनंदी जीवनासाठी कृष्णविचार)



लेखक
प्रा.द.ना.दुभाषी

## आशीर्वाद



**प. पू. अदृश्यकाडसिध्देश्वर स्वामीजी**
**कणेरी मठ**

# कृष्णनीती-विचार

## (आनंदी जीवनासाठी कृष्णविचार)

लेखक

**प्रा. द. ना. दुभाषी**

# कृष्णनीती–विचार

**(आनंदी जीवनासाठी कृष्णविचार)**

Krishnaniti - Vichar

(Anandi Jivanasathi Krishnavichar)

**लेखक :**

प्रा. द. ना. दुभाषी

मोबा.: ९८२२५१८२४८

**प्रकाशक :**

© सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन

कणेरी, कोल्हापूर.

**अक्षरजुळणी :**

मुस्कान ग्राफिक्स, कोल्हापूर.

मोबा.: ९३२६००५७२०

**मुद्रण :**

लक्ष्य ग्राफिक्स, कोल्हापूर

मोबा.: ९१७५४०४०३०

**आवृत्ती : २०१५**

**स्वागत मूल्य :**

# ।। आशीर्वाद ।।



**प. पू. श्री अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी**

**सिद्धगिरी मठ, कणेरी**

# लेखकाचे मनोगत...

प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी यांच्या प्रेरणेने व कृपाशीर्वादाने, वयाच्या ७५ व्या वर्षी, हे कृष्णनीतीवरील पुस्तक लिहीण्याचा योग आला. गीतेवरील पाच खंड लिहीताना महाभारत, कृष्णावतार, कृष्णनीती यावर सतत चिंतन केले होते.

आज २१ व्या शतकाच्या दुसऱ्या दशकात, जगातील स्फोटक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर तसेच देशातील विविध समस्यांवर कृष्णनीती-विचाराने, नक्कीच चांगला परिणाम घडेल. ही दूरदृष्टी स्वामीजींच्याकडे असल्याने, त्यांनीच या विषयावर लिहीण्याची प्रेरणा दिली.

आपल्या देशाच्या पंतप्रधानांनी अमेरिका, जपान अशा महान राष्ट्रांच्या प्रमुखांना भगवद्गीता भेट म्हणून दिली. जगातील १८५ देशांच्या समुहाने भारतीय योगाला आंतरराष्ट्रीय मान्यता दिली. भारतीय अध्यात्म, आयुर्वेद याची सुद्धा जगाला निश्चीत आवश्यकता वाटेल अशी परिस्थिती आज सर्वत्र आहे. भौतिक विकासाला अध्यात्माची जोड नसेल तर केवळ पाशवी शक्तीच निर्माण होईल. अतिरेकी दहशतवादी यांच्यामुळे जगाची शांतता धोक्यात आली आहे. आंतरिक शांती, स्वास्थ्य, स्थैर्य नसल्यामुळे मनोविकार वाढत आहेत. त्यामुळे मनोकायिक रोगांची संख्या वाढते आहे. चंगळवाद, व्यसनाधिनता अशा सर्व कारणांमुळे तरुणांमधील आत्महत्यांचे प्रमाण खूप वाढले आहे. २१ वे शतक हे मनोविकारांचे असेल, असे जागतिक आरोग्य संघटनेने आधीच जाहीर केले आहे.

अशीच परिस्थिती महाभारत काळात समाजाची झाली होती. कंस, जरासंघ, शिशुपाल... असे दैत्य दहशतवादी निर्माण झाले होते. समाज भयभीत झाला होता. स्त्रीवरील अत्याचाराला सीमाच राहिली नव्हती.

अशावेळी कृष्णाचा जन्म झाला. मनुष्यरुपातील कृष्णाने आपल्या गुणांच्या व विचारांच्या जोरावर ही परिस्थिती पूर्णपणे बदलून टाकली. हे असामान्य कर्तृत्व, त्याचे अष्टपैलू व्यक्तिमत्व, त्याची जीवन विषयक दृष्टि व हे यश प्राप्त करण्याची त्याची नीती म्हणजेच कृष्णनीती-कृष्णविचार !

याच नीतीने जगात दुर्जनांचा नाश होऊन सज्जनांचे रक्षण होईल. पृथ्वीवर शांती, समृद्धी नांदेल. नव्या विश्वधर्माची निर्मिती होईल यासाठी ही कृष्णनीती... यासाठी हा खटाटोप...

**प्रा. द. ना. दुभाषी**

# अनुक्रमणिका





प्रकरण १

# यत्र योगेश्वरो

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ।। ७८ ।।**

''जिकडे योगेश्वर श्रीकृष्ण व जिकडे धनुर्धर अर्जुन तिकडेच, श्री विजय, शाश्वत ऐश्वर्य व नीति असे माझे मत आहे.''

धृतराष्ट्राला युद्धाची वार्ता सांगण्याच्या निमित्ताने संजयाने हे प्रत्यक्ष पाहिलेले निवेदन केले. व्यासांच्या कृपेने संजयाला दिव्यदृष्टी व दिव्यश्रवण प्राप्त झाले होते. भगवद्गीतेचा हा अखेरचा श्लोक आहे. व तोच भगवंताच्या संपूर्ण जीवनाचे व त्याने केलेल्या अवतार कार्याचे फलित सांगणारा जीवनमंत्र आहे.

श्रीकृष्ण आजही आहे. प्रत्येकाच्या ह्रदयात. अर्जुन हा केवळ पाच हजार वर्षापूर्वीचा श्रीकृष्णाचा सखा, शिष्य, योद्धा नाही. श्रीकृष्णाने अर्जुनाला केवळ निमित्त केले. जगातील सर्व माणसांना सर्व काळात केलेला हा उपदेश आहे. अर्जुन केवळ आपला प्रतिनिधी आहे. या कलियुगात आपण प्रत्येक जण अर्जुन आहोत, त्या अर्जुनाने आपल्या रथाचा सारथी म्हणून कृष्णाला निवडले आणि जीवन सार्थक कृतार्थ केले. म्हणूनच युद्धभूमीवर तो यशस्वी झाला.

त्या महायुद्धाची समाप्ती झाली. पण आजही महाभारत अखंडपणे चालू आहे. ''रात्री दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ।।'' ह्या तुकारामाच्या उक्तीप्रमाणे युद्ध अंतःकरणात व बाह्य जगात अविरत चालू आहे.

म्हणून आज आपल्याला श्रीकृष्णाची त्याच्या विचारांची गरज आहे. आपल्या जीवन-रथावर सारथी होण्यासाठी. कठोपनिषदात शरीराला रथाची उपमा दिली आहे. या शरीराचा मालक आत्मा आहे. बुद्धी सारथी आहे. मन

लगाम आहे. दहा घोडे म्हणजे दहा इंद्रिये. हा रथ विषयांच्या रस्त्यांवरून चालला आहे. असा हा जीवनरथ खाच-खळग्यातून जावा की राजरस्त्यावरुन, यशाच्या आनंदाच्या-साफल्याच्या मार्गाने जावा की अधोगतीच्या, नैराश्याच्या व अंतिमत: दु:खाच्या रस्त्याने जावा हे बुद्धी ठरविते. या बुद्धितील कचरा काढून ती शुद्ध करायची व अशा शुद्ध बुद्धीत कृष्ण विचारांची स्थापना करायची म्हणजेच या कृष्णाला जीवनरथाचा सारथी करायचे. बुद्धी विचारानेच बदलते. मग इंद्रिये आपसूक बदलतात. त्यामुळे आचरण बदलते. जीवन तेजस्वी, यशस्वी व कृतार्थ करण्यासाठी श्रीकृष्णाच्या सकस, शक्तिशाली, प्रभावी विचारांची गरज आहे. हे भागवतात व्यासांनी पाच हजार वर्षापूर्वीच लिहून ठेवले आहे.

**कलेर्दोषनिधे राजन्नास्ति ह्येको महान गुण: ।**
**कीर्तनादेव कृष्णस्य मुक्तसङ्.ग: परं व्रजेत् ।।**

**(भाग १२/३/५१)**

''हे राजा! कलि हा दोषांचा सागर आहे. खरा, पण त्यात एक महान गुण आहे. तो असा की, ह्या कलियुगात केवळ कृष्णाच्या युगांचे, विचारांचे संकीर्तन केल्याने मनुष्याची सर्व बंधापासून मुक्तता होवून त्याला परमपदाची प्राप्ती होते.''

कृष्णाचे जीवन, त्याचे विचार आत्मसात करूनच जीवनात शांती, तृप्ती, निर्भयता, आनंद याची प्राप्ती होवू शकेल. कारण असे जीवन कृष्णाने प्रत्यक्ष जगून दाखविले आहे. हा वस्तुपाठ, आदर्श दाखविण्यासाठीच मनुष्यरूपाने त्याने अवतार घेतला.

आपल्या अवतार घेण्याचे प्रयोजनही श्रीकृष्णाने गीतेत व भागवतातही पुन्हा पुन्हा सांगून ठेवले आहे.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवतिभारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ।।**
**परित्राणाय साधूनां विनाशायच दृष्कृताम् ।।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।।**

**(अ ७-७व ८)**



''हे अर्जुना ! जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानि होऊन अधर्माचे प्राबल्य माजते तेव्हा मी स्वत:च जन्म (अवतार) घेत असतो. साधू-सज्जनांच्या रक्षणार्थ व दुष्टांचा नाश करण्यास युगी युगी धर्मसंस्थापनेसाठी मी जन्म घेत असतो.''

श्रीकृष्णाला एखाद्या संप्रदायात, धर्मात जखडून ठेवताच येणार नाही. कारण कृष्णाचे विचार हे अखिल विश्वासाठी आहेत. संपूर्ण मानवजातीसाठी आहेत. गीता हा वैश्विक ग्रंथ आहे. म्हणून देशाच्या पंतप्रधानांनी अलिकडेच अमेरिका व जपान या देशांना भेट म्हणून भगवद्गीता भेट दिली. जगातील जवळजवळ ६०० विद्वान-पंडितांनी गीतेवर भाष्ये लिहिली आहेत. इमर्सन, कार्लाइल, मॅक्समुल्लर यासारख्या पाश्चात्य तत्वज्ञांनी गीतेच्या विचारांचा प्रसार केला. जगप्रसिद्ध लेखक व इतिहासकार टोयंबी, ज्याने गेल्या पाच हजार वर्षांचा मनुष्यजातीचा इतिहास लिहिला. त्याने जगातील सर्वोकृष्ठ तत्वज्ञानाचा ग्रंथ म्हणून गीतेचा गौरव केला. थोर संत श्री ज्ञानेश्वरांनी सर्व ग्रंथातून केवळ गीतेची निवड केली व ७०० वर्षापूर्वी सर्वसामान्यांसाठी, नऊ हजार ओव्यांमध्ये श्री ज्ञानेश्वरीच्या रूपाने भावार्थदीपिका लिहिली. जगद्गुरू श्री शंकराचार्यांनी गीतेवर भाष्य लिहिले. लोकमान्य टिळकांनी गीतेतील कर्मयोगावर विस्तृत भाष्य लिहिले. राष्ट्रपिता महात्मा गांधींनी गीतेला आई म्हणून संबोधले. गीतेतील अनासक्ती योगावर केवळ पुस्तक लिहीले नाही तर हा योग त्यांनी आपल्या जीवनात आचरुन दाखविला. आपल्या आत्मचरित्रात महात्मा गांधी म्हणतात की, मला जेव्हा जेव्हा जीवनात कठीण समस्या आल्या त्या वेळी मी हाती गीता घेतली. माझ्या सर्व समस्यांचे निराकरण गीतेने केले. विनोबा भावे गीतेला आपली माऊली म्हणत. गीतेवर त्यांनी विपुल लिखाण केले. ''गीता प्रवचने'' या त्यांच्या पुस्तकाने खूप मान मान्यता मिळविली आहे. भारतातील बहुतेक सर्व सांप्रदायांच्या तत्वज्ञानाची मूळ गंगोत्री गीता हाच सर्वसामान्य ग्रंथ आहे. गीता नित्य नूतन असल्यामुळे नवनवीन दृष्टीकोनातून विद्वांनाकडून रोज काहीतरी लिहिले जातेय. भगवंतांनी स्वमुखांनी गायिलेली म्हणून ती गीता. गीतेतील सातशे श्लोक हे केवळ श्लोक नसून ते जीवन उन्नत करणारे शक्तिशाली मंत्र आहेत. ''अनिकेत'' या एका शब्दावर निरूपण करताना

''हे विश्वचि माझे घर'' म्हणून विश्वशांतीचा मंत्र तरी दिलाच पण वसुधैव कुटूंबकम्'' (Global Village) म्हणून भारतीय तत्वज्ञानातील संकल्पनेचा उद्घोष करून गीतेतीलच समता, बंधूता, प्रेम, सत्य या चिरंतन मूल्यांचा संदेश दिला. गीता ही विश्वमाऊली असून तो मानवजातीसाठी लिहिलेला जीवनग्रंथ आहे. अशी ज्ञानेश्वरांची धारणा होती. म्हणूनच माऊलींना गीता हा वेदांपेक्षाही श्रेष्ठ आहे. असे वाटले म्हणून ज्ञानेश्वरीमध्ये ते म्हणतात,

**''हा वेदार्थसागरू । जया निद्रिताचा घोरु ।**

**तो स्वये सर्वेश्वरू । प्रत्यक्ष अनुवादला ।।'' (७१)**

''अपौरूषेय वेद म्हणजे देवांचे झोपेतले घोरणे आहे तर गीता म्हणजे भगवंताने आपल्या मुखाने सांगितलेला ग्रंथ आहे.''

गीतेचे औदार्य वेगळे आहे. वेद अध्यात्मज्ञानाच्या बाबतीत फार कंजूष कृपण आहेत. कारण तो केवळ ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन वर्णांशीच संवाद साधतो. पण हा उणेपणा गीतेने दूर केला आहे. सर्व वर्णांच्याच नव्हे तर सर्व स्त्री-शुद्रादी मानवजातीच्या मुक्तीचा-कल्याणाचा विचार गीतेने केला आहे. हा विषादापासून आनंदाकडे नेणारा ग्रंथ आहे. म्हणून ते मुक्त कंठाने म्हणतात,

**''तैसा वाग्विलास विस्तारू ।**

**गीतार्थेसी विश्व भरू ।।**

**आनंदाचे आवारू ।**

**मांडू जगा ।।**

**(अ.१३.११५९)**

''याप्रमाणे वाणीच्या विलासाचा विस्तार करू. व गीतार्थेने विश्व भरून टाकू व सगळ्या जगाला आनंदाचा कोट करू'' ही त्यांची प्रतिज्ञा होती. म्हणूनच त्याचे फलित म्हणून गेली सातशे वर्षे लाखो वारकरी ''श्री ज्ञानेश्वरी डोक्यावर घेवून नाचतात. पंढरीस जातात. जेथे ज्ञानेश्वरी नाही असे मराठी घर दुर्मिळच.

गीतेच्या प्रत्येक अध्यायाचा शेवटचा संकल्प असा आहे.



**''इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषदत्सु ब्रह्मविद्यांया योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे.....''**

यामध्ये आलेल्या श्रीमद्भगवत्गीता, उपनिषद, ब्रह्मविद्या, योगशास्त्र, श्रीकृष्णार्जुनसंवाद या पाच शब्दांपैकी कोणतेही एक नाव किंवा प्रत्येक नाव या ग्रंथाला समर्पक असे आहे.

गीता हे केवळ उपनिषद नसून ते सर्वउपनिषदांचे सार आहे. गीतेचे तिसरे नाव ब्रह्मविद्या. ब्रह्म-आदिशक्ती हे विश्वाच्या सर्जक चैतन्याचे नाव ह्या विश्वकर्त्याचे ज्ञान करून घेणे व ती शक्ती आपल्यामध्ये अनुभवणे व मानवी जीवनाची सार्थकता करणे हा ब्रह्मविद्येचा उद्देश्य आहे. 'योगशास्त्र' हे नावही गीतेचे आहे. गीतेत मुख्य १८ योग सांगितले आहेत. योग शब्दाचा अर्थ जोडणे असा आहे. अर्जुनाने पहिल्या अध्यायात आपला संबंध विषादाशी (खेद, नैराश्य) जोडला म्हणून हा ''विषादयोग'' कोणी पुरूषोत्तमाशी जोडला म्हणून तो 'पुरूषोत्तम योग.' कुणी कर्माशी जोडला तर तो कर्मयोग......

या ग्रंथाचे पाचवे नाव ''श्रीकृष्णार्जुनसंवाद''! हा पूर्णपुरुष श्रीकृष्ण व त्याचा लाडका शिष्य, सखा अर्जुन यांचा संवाद आहे. अर्जुन प्रश्न विचारतो व त्याची उत्तरे श्रीकृष्ण देतात. ह्या दोघांच्या संवादातून संपूर्ण मानवजातीसाठी तत्वज्ञान उभे राहिले.''

भगवंतानी गीतेत मानवी जीवनातील सर्व महत्त्वाच्या विषयांना स्थान दिले आहे. अर्जुनाने विचारलेले सर्व २१ प्रश्न हे देखील आजच्या २१ व्या शतकातील अर्जुनाचे आहेत. त्यामुळे गीता वाचताना अर्जुनासारखे आपणही निःशंक होतो. भगवंत शेवटच्या अध्यायात अर्जुनाला विचारतात, ''तुझा हा अज्ञानरूपी मोह नष्ट झाला का ?'' तेव्हा अर्जुन म्हणतो,

**''नष्टो मोह: स्मृतिर्लब्धा त्वत्पसादान्मयाच्युत ।**

**स्थितो: स्मि गतसंदेह: करिष्ये वचनं तव ।। ७३ ।। अ.१८**

''हे अच्युता ! तुमच्या प्रसादाने माझा मोह नष्ट झाला आणि मला (कर्तव्यकर्माची) स्मृती झाली. मी (आता) निःसंदेह होवून राहिलो आहे. आता तुमच्या म्हणण्याप्रमाणे मी सर्व कर्मे (युद्ध) करीन.''

''करिष्ये वचनं तवं'' हा गीतेचा आत्मा आहे. श्रीकृष्णाचे विचार

आचरणात आणणे हे गीतेचे सार आहे. गीता ही केवळ पठणासाठी नाही. गीतेचा जरूर अभ्यास करावा, पूर्ण पाठांतर करावे; विद्वतापूर्ण बोलावे..... हे सर्व काही करावे. पण गीतेचा एक सुद्धा विचार प्रत्यक्ष जीवनात आला नाही तर हे सर्व व्यर्थ आहे. गीतेच्या वचनाप्रमाणे जीवनात परिवर्तन आले पाहिजे. अर्जुनाप्रमाणे आपणही नि:शंक होवून जीवनाची इतिकर्तव्यात कशात आहे हे समजून आपल्या जन्माचे सार्थक केले पाहिजे. प्रत्यक्ष भगवंताने जे जे जीवनात सांगितले ते ते आचरुन दाखविले. श्रीकृष्णाच्या जीवनात जन्मापासून ज्या ज्या घटना घडल्या त्या सर्व या तत्वज्ञानाप्रमाणेच घडल्या आहेत. प्रत्येक सुखदु:खाच्या क्षणी त्यांनी कुठेही संयम सोडला नाही, कुठेही मोहीत झाले नाहीत, बुद्धीचा समतोल समत्व कुठंही ढळले नाही. धर्मसंस्थापनेच्या कार्यात, न्यायपूर्ण तडजोडी करण्यात कुठेही तसूभरही ढळले नाही, कर्तव्यच्युती कधीही झाली नाही म्हणूनच 'अच्युत' हे नाव त्यांनी सार्थ ठरविले. दुष्टांच्या संहारात सुद्धा त्यांनी नीतीचा अवलंब केला. जी जी राज्ये जिंकली ती सर्व पात्र लोकांना परत केली.

कृष्णनीती समजण्यासाठी जशी गीता समजली पाहिजे तसे कृष्णजन्माच्या वेळची सामाजिक, राजकीय परिस्थिती जाणून घेतली पाहिजे; श्रीकृष्णाचा जन्म त्याचे मनुष्य अवतारातील गुण, त्याच्या बाललीला, त्यानंतर युवा अवस्थेत त्याने केलेला कंसवध, जरासंध वध, राजसूय यज्ञ, शिशुपाल वध हस्तिनापुरातील घटना, द्रौपदी स्वयंवर, श्रीकृष्ण शिष्टाई, महाभारत युद्धातील अत्यंत संघर्षमय प्रसंग व त्यातील श्रीकृष्णाची भूमिका, कर्ण, जयद्रथ, दुर्योधन अशा कौरवसेनेतील महान योध्यांचा वध, त्यानंतर झालेला युधिष्ठिरचा राज्याभिषेक, द्वारका नगरीची उभारणी, सुदामा भेट, यादवांचा संहार व शेवटी अवतार कार्याची समाप्ती असा जन्मापासून अखेरपर्यंतचा संक्षिप्त आढावा. आपण घ्यायचा आहे.

या प्रत्येक घटनेमागे कृष्णाने अर्जुनासमवेत श्री, विजय, शाश्वत ऐश्वर्य व नीति प्राप्त केली (शीर्षकाच्या जागी असलेला ७८ वा श्लोक) ती त्याच्या अचाट राजनीतीतील कौशल्यामुळे, मुसद्दीपणामुळे व अलौकिक गुणांच्या जोरावरच. गीतेतील तत्वज्ञानाची जोड, साहस, निर्भयता, नेतृत्वगुण,



अनहंकारिता, अनासक्ति, सर्वांवर अलौकिक प्रेम करून केलेले संघटन, बुद्धीचातुर्य, नि:स्पृहता.... अशा त्याच्या अष्टपैलू व्यक्तिमत्वाच्या सर्व छटांचा या कृष्णनीतीमध्ये समावेश आहे. हे अभूतपूर्व परिवर्तन करण्यासाठीच श्रीकृष्णाने जन्म घेतला हेच त्याचे अवतारकार्य होते. या सर्व दैदिप्यमान कामगिरीचा आलेख आपण यापुढील प्रकरणात पाहणार आहोत. श्रीकृष्णाने प्रत्येक प्रसंगी केलेले कर्म, त्याचे गुण, कौशल्य, बुद्धी ..... अशा सर्वांचा परिपाक या कृष्णनीतीत सामावला आहे. कृष्ण म्हणजे कृष्णनीती. तो जे वागला ती कृष्णनीती, कृष्णाचे विचार म्हणजे कृष्णनीती. हे सर्व त्याच्या अंगी होते म्हणून तो पुरुषोत्तम म्हणून तो पूर्णावतार. असे असूनसुद्धा कृष्ण आपल्या सर्वांसारखाच सर्वत्र वावरला. काही ठिकाणी अंतीद्रिंय शक्तीचे प्रकटीकरण जरूर झाले. पण मनुष्यरूपात आलेल्या कृष्णाने आपल्यासारखेच वागून सर्वांना आपलेसे केले. यामुळेच गेल्या पाच हजार वर्षांपासून सर्वांच्या ह्दयावर राज्य केले. महाभारतातील श्रीकृष्ण स्वत:च उत्तंकाला सांगतो. ''माझा जन्म धर्माचे रक्षण करण्यासाठीच झालेला आहे.'' या धर्म-नीतीची प्रतिष्ठापना करूनच श्रीकृष्णाने अवतारकार्य पूर्ण केले. गोकुळ, मथुरा, वृंदावन, द्वारका, हस्तिनापुर या प्रदेशात श्रीकृष्ण वावरला. आजही कृष्णभूमी म्हणूनच हा प्रदेश प्रसिद्ध आहे. त्याच्या अस्तित्वाच्या, अलौकिक कार्याच्या खुणा सर्वत्र आहेत.

गीतेमध्ये श्रीकृष्णाच्या जीवन सिद्धांताच्या प्रयोगांचे सार आहे हे सिद्धांत म्हणजेच कृष्णनीती ! त्यामुळे सातशे श्लोकांतून किमान पन्नास महामंत्रांचा-श्लोकांचा अभ्यास या कृष्णनीतीच्या निमित्ताने करावयाचा आहे. याशिवाय त्याची वैचारिक, तात्विक बैठक समजणे कठिण आहे. हे श्लोक व वर उलगडलेला जीवनपट यांचा ताळमेळ केल्यामुळे हे समजणे सोपे व रंजक होईल. हे सर्व रसायन काही मर्यादेपर्यंत मानवी बुद्धीच्या आकलनातील आहे पण या गूढमय चरित्रातील बहुतांश गोष्टी मला समजल्या आहेत असा दावा कोणीही करणार नाही. हे सर्व कृष्णार्पणमस्तु म्हणून ''इदं न मम'' या भावनेनेच करावयाचे आहे. योगी कृष्णाला योगेश्वर म्हणतात, पुष्टीमार्गीय पंथातील व इतर अनेकजण केवळ बाळकृष्णाचीच पूजा करतात. गीता

सांगणारा व सुदर्शनधारी श्रीकृष्णाला पाहून मोहित होत नाहीत. तर भक्तीत रममाण झालेले भक्त त्याला मुरलीधर बालमुकूंद या रूपातच वेडे होतात.

श्रीमद्भागवत, महाभारत व हरिवंश अशा ग्रंथातून श्रीकृष्णाचे वर्णन करण्यात आले आहे. अखिल ब्रह्मांडाचा नायक जगाच्या कल्याणासाठी मानवरूपाने अवतीर्ण होतो हे तत्वदर्शन भारतीय अध्यात्मशास्त्राचे वैशिष्ट्य आहे. दुष्टसंहारक, सज्जनरक्षक, धर्मसंस्थापक, कुशल सेनानी, मुसद्दी, आदर्श प्रशासक, राजनीतीज्ञ व आध्यात्मिक जगद्गुरू अशा विविध पैलूंनी कृष्णाचे जीवन अलंकृत आहे. कर्ममय संसार चक्रामध्ये अनासक्त कसे राहायचे, बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती अशी जीवनाची बैठक करून सर्व समस्यांचा प्रतिकार कसा करायचा हा सर्व कृष्णनीतीचा भाग म्हणजे एक आदर्श वस्तुपाठच आहे.

श्रीराम व श्रीकृष्ण हे दोघेही श्रीविष्णूचे अवतार. श्री विष्णूच्या दहा अवतारापैकी श्रीकृष्ण हा आठवा अवतार. महाभारताच्या भीष्म पर्वात युद्ध सुरू असताना पांडवांचा विजय का होत आहे असे दुर्योधनाने विचारल्यावरून भिष्मांनी त्याला श्रीकृष्णाचे स्वरूप व माहात्म्य विस्ताराने सांगितले. महाभारतात अनेक प्रसंगी देव, ऋषीमुनी भक्त अशा अनेकांकडून श्रीकृष्णाच्या स्वरूपाचे वर्णन आले आहे. या सर्वांचे तात्पर्य हेच की भगवान श्रीकृष्ण सगुण–साकार ब्रह्मच होत. निर्गुण परमतत्व सगुण साकार मनुष्यरूपात मानवजातीच्या कल्याणासाठी अवतीर्ण झाले.

अशा कृष्णाला तेवढ्याच योग्यतेचा महान शिष्य लाभला. सव्यसाची हे अर्जुनाचे प्रमुख विशेषण कारण डाव्या, उजव्या अशा दोन्ही हातांनी तो शरवर्षाव करीत असे. असा धर्नुधर तोच एक होता म्हणून हे विशेषण. अर्जुन हा कुंतीला इंद्राच्या मंत्राने प्राप्त झालेला तिसरा मुलगा. व्यासांनी अर्जुनाच्या व्यक्तिमत्वाचे सर्व पैलू चित्रसेन गंधर्वाच्या मुखाने वदविले आहेत. अर्जुन हा एक आदर्श विद्यार्थी होता म्हणून द्रोणाचार्याने एक कृत्रिम गिधाड निर्माण करून ते एका वृक्षावर मांडले. अर्जुन त्याच्यावर शरसंधान करायला निघाला असता द्रोणाने त्याला विचारले, ''तुला झाड, गिधाड व मी हे सगळे दिसते काय ?'' त्यावर अर्जुन म्हणाला, ''मला दुसरे काहीही दिसत नाही, मला



फक्त गिधाडाचा गळा तेवढा दिसतो. अशी अपूर्व एकाग्रता त्याला लाभली होती. अर्जुनाची कृष्णभक्ती नि:स्सीम होती. जिकडे कृष्ण तिकडे विजय होतो. म्हणून दुर्योधनाने युद्धासाठी कृष्णाचे सैन्य मागितले पण अर्जुनाने केवळ कृष्णाला सारथी म्हणून मागितले. अर्जुनाचा महापराक्रम सर्वश्रुतच आहे. किरात वेशधारी शिवाचे व अर्जुनाचे युद्ध हे त्याच्या पराक्रमाचे मूर्धन्य उदाहरण आहे. या युद्धाच्या शेवटी साक्षात शिवाने त्याचे गुणगान केले. ''अर्जुना, तुझ्या पराक्रमावर आणि शौर्यधैर्यावर मी प्रसन्न आहे. तुझ्यासारखा दुसरा क्षत्रिय नाही.''

महाभारतात अर्जुन व कर्ण यांच्या शौर्याच्या अनेक कथा आहेत. कर्ण व अर्जुन यांची तुलना करताना कृपाचार्याने अर्जुनाचे अनेक पराक्रम अहंकारी कर्णाला ऐकविले आहेत ते म्हणतात, ''कर्णा, उत्तर कुरूवर एकट्याने स्वारी करून अर्जुनाने त्यांना जिंकले. अर्जुन व कृष्ण या दोघांनी मिळून खांडववन अग्नीला भक्षायला दिले. स्वर्गात जाऊन त्याने एकट्याने देवांकडून अस्त्रे मिळविली. एकट्याने सुभद्राहरण केले. अजिंक्य अशा चित्रसेन गंधर्वाला एकट्याने पळायला लावले. देवांनाही न आवरलेल्या कालकंज व निवातकवच या दानवांना त्याने यमलोकी धाडले.

अशा महापराक्रमी अर्जुनाला द्रौपदीपासून श्रुतकीर्ती सुभद्रेपासून अभिमन्यू चित्रांगदेपासून बभ्रूवाहन आणि उलपीपासून इरावान असे चार पुत्र झाले.

अर्जुन म्हणजे मूर्तिमंत ऋतूजा, अत्यंत सरळ मनाचा, युद्धभूमीवर आपलेच गुरु, मामा, भाऊ, आप्तेष्ट या सगळ्यांना पाहून त्याची गात्रे शिथील झाली, मुख कोरडे पडले. शरीराला कंप सुटला. . करूणेने व्याप्त अश्रूपूर्ण नेत्र आणि शोकयुक्त अर्जुनाला युद्ध करून त्यांना ठार करायचे नव्हते. अशा विजयाने मिळणारे राज्य, भोग व सुखे यांचा अर्जुनाने धिक्कार केला अशा मोहग्रस्त शोकाकुल अर्जुनाला उपदेश करण्यासाठी श्रीकृष्णाने युद्धभूमीवर गीता सांगितली. अर्जुनाला निमित्त केले व अखिल मानवजातीला दिव्य जीवनाचा महामंत्र दिला. अर्जुनाने गीतेमध्ये जे २१ प्रश्न श्रीकृष्णाला विचारले ते आपले २१ व्या शतकातलेच प्रश्न आहेत म्हणून अर्जुन हा आपला प्रतिनिधीच आहे.

संपूर्ण गीतेचा प्रवास हा अर्जुनाच्या या विषादापासून सुरू होतो व शेवटी प्रसन्नतेच्या, कृतार्थतेच्या वाटेवर संपतो. जीवनातील शोक, मोह, शंका, भीती व विकारवशता मिटल्याशिवाय हृदयातील प्रसन्नतेचा झरा सापडणार नाही. आपल्या मूळच्याच आनंद स्वरूपाला प्राप्त करायचे असेल तर अर्जुनासारखे संपूर्ण शरणागत होवून गीतेचे विचार व कृष्णनीती आचरणांत आणली पाहिजे.

कृष्णाचे संपूर्ण चरित्र अभ्यासताना मात्र, त्याचे दैवीकरण करून केवळ भक्तीचा विचार जर आपण केला तर मात्र हाती काहीच लागणार नाही. आज भगवद्गीतेची जागा देव्हाऱ्यात राहिली आहे. पूजा करून गंध पुष्प फुले वाहण्यातच आपण धन्यता मानतो. फारच झाले तर भागवत सप्ताह निष्ठेने ऐकून कृष्ण चरित्राने भावविभोर होऊन जातो. कथा पुराणे जरूर ऐकाव्यात. कीर्तन प्रवचन यातून उलगडलेले चरित्र डोळसपणे ऐकावे. पण या सर्व कथा पुराणांतून जो तत्वबोध होतो तो अत्यंत महत्त्वाचा आहे. कृष्णाला केवळ अवतार म्हणून न मानता त्याला मानवी पातळीवर पाहून त्याच्या चरित्राचा अभ्यास केला पाहिजे. कृष्ण आपल्यासारखाच जगला, आपल्याबरोबरच जगला, आपल्यासारखीच सुखदु:खे भोगली; आपल्यासारखेच खेळ खेळले, मोठा झाला विवाह केले (त्या वेळच्या बहुपत्नीक प्रथेप्रमाणे) व प्रपंचातील सुखदु:खे अनुभवली. मनुष्यासारखेच सर्व गुण–विकार धारण केले होते. पण विकारावर मात करून समत्व बुद्धीने व शांत तृप्त मनाने माणसाप्रमाणे जगून दाखविले. कोणतेही चमत्कार लोकांना अचंबित करण्यासाठी नव्हते. दैवी गुण आत्मसात करणाऱ्या गौतम बुद्ध, शंकराचार्य, छत्रपती शिवाजी, ज्ञानेश्वर, तुकाराम, विवेकानंद, रामकृष्ण यांच्यासारख्या अनेक महामानवासारखेच कृष्णही जगले.

श्रीकृष्णाने गीतेत आपला पत्ताही सांगून ठेवला आहे. अनेक ठिकाणी ''सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो.....'' ''अहं आत्मा गुडाकेश...'' ''ईश्वर: सर्वभूतांना हृद्देश्ये अर्जुन तिष्ठति.....'' अशा अनेक श्लोकांतून आपला ठाव–ठिकाणा सांगितला आहे. मी प्रत्येक भूतमात्राच्या ठिकाणी आत्मा म्हणून वावरतो. त्या परमआत्म्याचाच तो अंश आत्मा ! म्हणून प्रत्येक जण



अमृतपुत्रच आहे. जे महामानव त्या आत्म्याची अनुभूती घेतात, ज्यांना त्याचा साक्षात्कार होतो, ते नराचे नारायण होतात, ते संत महात्मे होतात. नरकरणी करे तो नरका नारायण हो जाये ।.......... आपल्या गुणांनी, कर्मांनी तो देवपुरुष, महामानव होतो, मग अशी माणसे ''कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत.. रामो भूत्वा रामं यजेत्... देवो भूत्वा देवं यजेत्'' या न्यायाने स्वत: कृष्ण, राम, देव रूप होवून कृष्णाची पूजा करतात, म्हणून संत तुकाराम म्हणतात.

**''आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणांसी ।**
**बोलिले जे ऋषी । साच भावे वर्ताया ... ।।**

खरे म्हणजे आम्ही वैकुंठात भगवंताच्या सान्निध्यात राहणारे... पण तुमची दु:खे पाहून आम्हांला कळवळा आला म्हणून तुमचे दु:ख दूर करण्यासाठी जन्म घेतला. प्राचीन ऋषी–मुनींनी सांगितलेले विचार कथन करण्यासाठी व सुखाचा, कल्याणाचा मार्ग दाखविण्यासाठी जन्म घेतला असे ते अभंगात म्हणतात. म्हणून निर्धाराने ते सांगतात,

**विठ्ठल जळी स्थळी भरला । रिता ठाव नाही उरला ।**
**अजी म्यां दृष्टीने देखिला । विठ्ठलचि, विठ्ठलचि ।।**

''भगवंत सर्वत्र भरून उरला आहे. तो नाही अशी जागा नाही. मी त्या विठ्ठलाला सर्व ठिकाणी पाहिला. आपल्याला वाटते तो केवळ पंढरपुरात आहे. पण संतांना त्याचे दर्शन आत्मरूपानेही होते व चराचरातही होते. संत ज्ञानेश्वरांना हे सर्व भूतमात्रात दिसले म्हणून ते म्हणाले.

**तैसा हृदयामध्ये मी रामू । असता सर्वसुखाचा आराम ।**
**किं भ्रातासी कामु । विषयावरी ।।**

''प्रत्येकाच्या हृदयामध्ये सर्व सुखाचा आगर असा राम आहे. सुखाचा झरा आतच असताना काम, विषय यांना का कवटाळतोस ?''

यामुळेच श्री ज्ञानेश्वरांनी निश्चयपूर्वक सांगितले.

**जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।**
**हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ।।**

प्रत्येकाच्या ह्रदयात असणाऱ्या भगवंताला पाहणे, त्याचा अनुभव घेणे हाच खरा भक्तियोग आहे. हेच तत्वज्ञान सर्व उपनिषदांनी एकमुखाने सांगितले.

ईशावास्योपनिषदातील पहिलाच मांगलिक श्लोक या सर्वांचे सार आहे.

**''ईशावास्यम् इदंसर्वं । यत्किंच जगत्यां जगत ।**
**तेन त्यक्तेन भुंजीथा: । मागृध: कस्य स्विद्धनं ।। १ ।।**

**(ईशा प्रथम श्लोक)**

''हे सर्व जग ईश्वरमय आहे. अणुरेणुत ईश्वर वसला आहे. म्हणून या जगातील भोग वस्तूंचा भोग घेताना तो त्यागपूर्वक केला पाहिजे; गिधाडासारखे त्यावर तुटून न पडता ईश्वराचे स्मरण करून धन, ऐश्वर्य भोगावे.''

अशी वस्तुनिष्ठ भूमिका आपल्या तत्वज्ञानाने घेतली आहे. त्याला ईश्वर म्हटले की त्याची जागा केवळ देव्हाऱ्यात होते व मनुष्यावतार म्हटले की आपण कृष्ण व्हायचे व कृष्णाचे जीवन तत्वज्ञान आपल्या आचरणात आणायचे हा ध्यास लागतो. कृष्णाच्या विचारांनी जगणे हीच कृष्णभक्ती; त्याची कृष्णनीती वापरून जीवन यशस्वी, तेजस्वी, आनंदी करायचे म्हणजे कृष्णमय व्हायचे.

कृष्णाने हे सर्व जगून दाखविले. हे ठरविले तर प्रत्येक मनुष्याला कृष्णरुप होणे अवघड नाही, अभ्युदय व नि:श्रेयस म्हणजे लौकिक व पारलौकिक या दोन्ही जीवनात यश, कीर्ती, साफल्य, आनंद प्राप्त करून कृतार्थ होणे. जेव्हा आपण कृष्णनीतीचा स्वीकार करतो तेव्हा त्यांच्या गुणांचा व कार्यकर्तृत्वाचा स्वीकार करतो.

**श्रवणं कीर्तनं ध्यानं हरे: अद्‌भुत कर्मण: ।**
**जन्म कर्म गुणांना च तदर्थं अखिलं चेष्टितम् ।।**

''श्रीकृष्णाच्या अद्‌भुत लीलांचे, त्याने केलेल्या अचाट कर्तृत्वाचे, चिरंतन मूल्यांची जपणूक करण्यासाठी दाखविलेल्या युद्धनीतीचे, सज्जनांचे रक्षण करण्यासाठी केलेल्या कर्मकौशल्याचे श्रवण, कीर्तन, ध्यान केलं



पाहिजे, त्याच्या जीवन-चरित्राचे पारायण केले पाहिजे. ज्या अवतार कार्यासाठी त्याने जन्म घेतला त्या जन्माचे, जन्मभर केलेल्या सत्कर्मांचे व त्यांनी जीवनात आचरून दाखविलेल्या दैवी गुणांचे चिंतन, मनन, निदिध्यासन निश्चित करावे. पण तसे जीवन आचरण्याचा प्रयत्न हीच खरी कृष्णपूजा आहे. ''मत् कर्म परमो भव'' ही प्रत्यक्ष श्रीकृष्णाची मागणी आहे. ''मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्या: पार्थ सर्वश: ।। (४.११) ''हे पार्था जे माझ्यामागून येतात ते, माझ्या मार्गाला येवून मिळतात, माझे होतात.

गीतेच्या शेवटी आपल्या लाडक्या भक्ताला अर्जुनाला जो उपदेश दिला तो उपदेश आजच्या सर्व अर्जुनासाठी आहे. अर्जुनाला श्रीकृष्ण प्रथम विचारतात, '' कच्चित अज्ञानसमोह: प्रनष्टस्ते धनंजय ।।'' (अ १८-७२) 'पार्था मी जे जे सांगितले ते तू हे एकाग्र चित्ताने ऐकलेस ना ? (मग) तुझा अज्ञानरूपी मोह हे धनंजया ! आता अगदी नष्ट झाला ना ?'' तेव्हा अर्जुनाने जे उत्तर दिले ते आपल्यालाही देता आले पाहिजे. श्रीकृष्णाचा जन्म, कर्म, गुण यांचे कीर्तन, श्रवण, ध्यान, एकाग्र चित्ताने केल्यावर भगवंतच आपल्याला हा प्रश्न विचारत आहेत. मग अर्जुनाने जे उत्तर दिले तेच आपण देऊन आपले जीवन कृतार्थ केले पाहिजे. ''स्थितो..स्मि गतसंदेह: करिष्ये वचनं तव'' ।। (१८.७३) माझ्या सर्व शंकांचे निरसन कृष्ण-कृपेने झाले आहे. मी नि:शंक झालो आहे. आता मी माझे कर्तव्यकर्म तुम्ही सांगितलेल्या वचनांप्रमाणे करीन. वरील श्लोकांतील ''तदर्थ अखिलं चेष्टितम्'' याच नीतीप्रमाणे मी माझ्या जीवनात कर्म करीन, त्याच गुणांप्रमाणे मी माझी वृत्ती, स्वभाव बदलेन. ''करिष्ये वचनं तवं'' हाच मंत्र माझा जीवनमंत्र असेल, धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांच्या प्राप्तर्व्यासाठी तुझ्याच नीतीचा, वचनांचा अवलंब करेन. श्रीकृष्ण जीवन, त्याचे तत्वज्ञान हे जीवन बदलण्यासाठी आहे.

असे जर झाले नाही तर ते महत्पाप होईल याची जाणीवही शास्त्राने करुन दिली आहे.

**अपहाय नीजं कर्म कृष्णकृष्णेती वादिन: ।**
**ते हरे: द्वेषिण: पापा: कर्माथं जन्मयत् हरे : ।।**

स्वत:चे कर्म सोडून जे केवळ ''कृष्ण कृष्ण'' जपत भगवंताची पूजा,

अर्चा, भक्ती करतात ते माझे स्तवन करीत नाहीत उलट ते पापकर्मच करतात कारण भगवंतानी केवळ कर्म करण्यासाठीच जन्म घेतला आहे. यात थोडी कठोरता जरूर आहे पण ती वस्तुस्थिती आहे.

आज जिथे तिथे भक्तीचा मळा फुलला आहे. कर्माचे प्रचंड अवडंबर माजले आहे. कर्मकांडाला ऊत आला आहे. मोठमोठ्या मंदिराचे उत्पन्न करोडो अब्जांच्या घरात जाते आहे. किलो किलोंचे सोने अर्पण पेटीमध्ये मावेनासे झाले आहे. त्यामुळे मंदिराचे वैभव स्वर्गालाही लाजवेल असे झाले आहे. सुवर्णाच्या मूर्ती, सुवर्णाचे कळस हे डोळ्यात मावेनासे झाले आहे. उत्सव, मिरवणुका, यज्ञ–याग यात तरुणांची संख्या रोज वाढते आहे. यातील श्रद्धा–अंधश्रद्धा हे थोडे आपण बाजूलाच ठेवू. माझा साधा प्रश्न एवढाच आहे की या भक्तीच्या महापुराने भक्तांचे जीवन बदलले का ? भारताच्या अध्यात्मिक श्रेष्ठत्वाबद्दल कोणालाच आक्षेप नाही पण पाश्चात्यांचा यावर एकच प्रश्न असतो की यामुळे जीवन का बदलत नाही ? भ्रष्टाचार, स्त्रीवरील अत्याचार, खून, दरोडे, हिंसा, बलात्कार यांची संख्या का वाढते आहे ? अगणित काळा पैसा परदेशी बँकातून का ठेवला जातोय ? सामाजिक नीतिमत्ता, शील, बंधुभाव, प्रेम, सेवाभाव, चारित्र्य का वाढत नाही ? अशा प्रश्नांना समर्पक उत्तरे देता येतील का ? मग आपले तत्वज्ञान, अध्यात्म केवळ काथ्याकूट करण्यासाठीच आहे का ?

भगवतं कोण व कसा आहे ? तो भक्तांकडून काय अपेक्षा करतो ? कोणते भक्त भगवंताला आवडतात ? भगवंताला कोणती भक्ती आवडते ? भक्ताच्या अंगी कोणते गुण असावेत ? भक्तीचे नेमके फळ काय ? भगवंताचा नेमका काय पत्ता ?

अशा प्रश्नांची समर्पक उत्तरे आपल्या जवळ आहेत का ? अशा प्रश्नांचे उत्तर मिळविण्याचा कितीजण निष्ठेने प्रयत्न करतात आदि शंकराचार्यांना हे प्रश्न पडले.

**कस्त्वं कोऽहं कुतो आयात:**
**का मे जननी को मे तात: ....**

''तू कोण ? मी कोण ? आम्ही कोठून आलो. माझी आई कोण ?



माझा पिता कोण ?

ज्या भगवंताची आपण पूजा करतो, त्याचा व माझा काही संबंध आहे. गीतेच्या ४ थ्या अध्यायात अर्जुनाच्या एका प्रश्नाला उत्तर देताना भगवंत म्हणतात.

**बहुनि मे व्यतीतानि जन्मानी तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ।। ५ ।।**

''हे अर्जुना ! माझे आणि तुझे अनंत जन्म होऊन गेलेले आहेत. ते सर्व मी जाणतो. तू मात्र ते जाणत नाहीस.

आम्ही कोठून आलो याचे भगवंताने स्वत: दिलेले हे उत्तर आहे. खरा पिता, खरी माता तोच आहे. तो परम आत्मा व मी त्याचा अंश आहे. मी त्याचाच पुत्र असल्याने त्याचे गुण माझ्यातही आहेत. मी अमृतपुत्र असूनही ही माझी ओळख मला नाही.

**तैसे भूतजात हे सर्व माझेचि कीर अवयव ।**
**परि मायायोगे जीवदशे आले ।**
**म्हणूनि माझेचि मी नव्हती ।**
**माझेचि मज नोळखती ।**
**अहं ममता भ्रांती**
**विषयांध जाहले ।।**

**(ज्ञाने.७.)**

का ओळख नाही याचे उत्तर संतश्रेष्ठ श्री ज्ञानेश्वरांनी वरील ओव्यांमध्ये दिलेले आहे.

गीतेच्या ७ व्या अध्यायातील १३ व्या श्लोकावरील निरूपणात हे उत्तर दिले आहे. ''संपूर्ण भूतजात हे माझेच अवयव आहेत. मायायोगाने, माझेच असून मला ओळखत नाहीत. त्यामुळेच केवळ भ्रांतीमुळे अहं, ममता, भ्रांती यामुळे विषयांध झाले आहेत.

भक्तीत याचे ज्ञान झाल्याशिवाय भक्तीला खरा रंग येत नाही. जगातील सर्व धर्मांतील संत महात्म्यांनी याची उत्तरे दिली आहेत. काही भेद जरी

असला तरी मानवी कल्याणाचा पाप-पुण्याचा, जन्म-मृत्यूचा .... विचारच त्यांनी मांडला आहे. आपल्या भारतात वेद काळापासून हे ज्ञान ओतप्रोत भरले आहे. सर्व प्रांतातल्या सर्व भाषामध्ये तेथील संत माहात्म्यांनी आपल्या ग्रंथातून जगाला संदेश दिला आहे. दक्षिणेकडील संत आलूरवायर, पुरंदर पासून उत्तरेकडे संत कबीर, संत सूरदास, संत मीराबाई, संत तुलसीदास तर संत नामदेव, समर्थ रामदास ... अशा असंख्य संतांनी या भारतभूमीला देवभूमी बनविले आहे. वेद, उपनिषदे, महाभारत, रामायण, भागवंत, सहादर्शने, अठरापुराणे .... अशा धर्मग्रंथातून हे ज्ञान मूलभूत स्वरूपात आजही उपलब्ध आहे. कर्म-विपाक सिद्धांत, पुर्नजन्म, सगुण-निर्गुण भगवंत, माया, आत्मा, अनात्मा सर्व अवतार, आत्मसाक्षात्कार, प्रारब्ध, संचित, क्रीयमाण, दैवी व असुरी शक्ती, मन बुद्धी, प्राण-जीव यांचे स्वरूप, द्वैत-अद्वैत, अनेकत्वात, एकत्वाच्या खुणा, अखिल विश्वाची रचना, पिंड व ब्रम्हांड यांचे साधर्म्य ... थोडक्यात भक्त, भगवंत भक्ती यांचे ज्ञान उपलब्ध आहे. पण आपण बुद्धीने हे समजूनच घेत नाही. यामुळे भक्तीचे जे फळ अपेक्षित आहे ते आपल्याला मिळत नाही.

भारताच्या मातीतच हे अध्यात्म, परमार्थ रूजले आहे. पुढे कधीकाळी भविष्यात हवेतल्या ध्वनीलहरींना काळानुसार संशोधन करण्यात आले तर या पूर्वेतिहासावर प्रकाश पडेल. अनेक महान विभूतींचे शब्दसुद्धा कानावर पडतील.

आपला प्रश्न असा होता की, हे एवढे असूनही आपली दिशा व दशा अशी का ? पाश्चात्यांच्या या प्रश्नांना उत्तर जरूर देता येईल.

हे अध्यात्मज्ञान होते म्हणूनच आज भारताचे अस्तित्व आहे. धर्म-संस्कृती टिकून आहे. केवळ अध्यात्म नव्हे तर आयुर्वेद, योग टिकून आहे. कोण्या एका काळी या देशाने सुवर्णयुग अनुभवले. जगाला, भारताने या तिन्ही गोष्टी दिल्या आहेत. परकीयांची अनेक आक्रमणे झाली. हिंदूची देवळे, मूर्ती, संस्कृतीची चिन्हे यांची फोडतोड करण्यात आली. धर्मांतरासाठी माणूसकीला लाजवील असे अत्याचार करण्यात आले. लाखोंची कत्तल झाली. इथले सारे वैभव, सोने-चांदी, रत्ने-मोती लुटून नेण्यात आले.



ब्रिटिशांनी तर हे लुटून नेलेच पण शिक्षणाच्या माध्यमातून इथली परंपरागत आलेली संस्कृती सुद्धा बदलण्याचा प्रयत्न केला. इंग्रज गेले पण इंग्रजीचे राज्य मात्र राहिले. संस्कृत व संस्कृती या दोन्हींचा प्रभाव मिटविण्याचा प्रयत्न केला. पण भारतीय अध्यात्मामुळे दोन्हीही अबाधित राहिल्या.

ज्या संत माहात्म्यांनी हे भक्तीचे, अध्यात्म व परमार्थाचे ज्ञान शतकानुशतके प्रत्येक घराघरात पोहोचवले त्यामुळे इथल्या माणसाचा राम व कृष्ण हे श्वास बनले. या महान धर्मग्रंथांनी पठन पद्धतीने याचे ज्ञान इथल्या मातीत पेरले. त्या सर्वांनी केलेल्या उपदेशामुळे इथला माणूस टिकला. छळ सोसले पण श्रद्धा सोडली नाही. धर्म सोडला नाही.

म्हणून संस्कृती टिकली. देश-धर्म अबाधित राहिला. भाव म्हणजे भक्ती. ''भावेवीण भक्ति शक्य नाही असे श्री ज्ञानेश आपल्या हरिपाठतही म्हणतात. जीवनाचा २/३ भाग भावांनी व्याप्त झालेला आहे. जीवनात भाव नसेल तर सर्वनाती मग ती पती-पत्नी, आई-बाप व मुले भाऊ-बहिण, मामा-काका .... अशा सर्वांना काहीच अर्थ राहणार नाही. मनुष्य हा भावाचा भुकेला आहे. देवालाही भक्ताकडून या भावाचीच अपेक्षा आहे. म्हणूनच भक्तीची व्याख्या मधूसुदन यांनी अशी समर्पक केली आहे.

**''द्रुते चित्ते प्रविष्टा: या गोविंदाकारता**
**स्थिरा सा भक्ती ।। (मधूसुदन)**

''चित्त द्रवले पाहिजे, अष्टभाव जागृत झाले पाहिजे. भगवंताला मूर्तीरूपात पाहिल्यानंतर गदगदले पाहिजे. नयन अश्रूपूर्ण झाले पाहिजेत. अशी अवस्था झाल्यानंतर भगवंताच्या आकार, अंत:करणात स्थिरावला पाहिजे, असे जेव्हा होते तेव्हा त्या अवस्थेला भक्ती असे म्हणतात.

भक्ती म्हणजे प्रेम, भगवंतावरील नि:स्वार्थ प्रेमच या अवस्थेला जाणते.

पण तो भाव आपण ज्या इष्टदेवतेवर ठेवतो तो भगवंत ज्ञानानेही जाणावा लागतो. त्या भगवंताचा दिव्यत्व, त्याचे गुण, कर्तत्व, दिव्यत्व जाणल्याशिवाय त्याच्यावरील श्रद्धा वार्धिष्णु होत नाही. भाव-प्रेम ही वाढत नाही. म्हणून भक्ताला भगवंताशी आपले नाते नेमके काय आहे हे ज्ञानानेही समजले पाहिजे.

पाश्चात्यांना भारतीय संस्कृतीची महत्ता ज्यांनी समजावली, त्या विवेकानंदाच्या भारत भ्रमणाच्या काळात घडलेली एक घटना अशी. विवेकानंद भारतातील एका संस्थानिकांच्या महालात मुक्कामाला होते. बोलता-बोलता मूर्तिपूजेच्या संदर्भात त्यांनी काही टिका केली. मूर्तीपूजेतला फोलपणा दाखविण्याचा प्रयत्न केला. स्वामी विवेकानंदांनी महालामध्ये राजांच्या वडिलांची मोठी तस्वीर पाहिली. विवेकानंद राजाला म्हणाले, ''ही तर केवळ कागद, रंग यांनी रेखाटलेली प्रतिमा आहे. यावर कोणी थुंकले अथवा विटंबना केली तर चालेल का ?'' यावर राजाने संतप्त झालेल्या अवस्थेत उत्तर दिले. ही तर माझ्या पिताजींची तस्वीर आहे. मला पूज्य आहे. यावर कोणी तसे केल्यास तो कठोर शिक्षेला पात्र होईल. मग श्री विवेकानंदानी राजाला समजावले, ''बरोबर आहे. जशी तुमची या प्रतिमेवर श्रद्धा आहे. प्रतिमा म्हणजे प्रत्यक्ष वडिल नव्हे पण प्रतिमेकडे पाहिल्यावर तुम्हांला जशी तुमच्या वडिलांची आठवण होते. तसे मूर्तीच्या पूजेचे आहे. मूर्तीला पाहून भगवंतांची आठवण होते. यासाठी त्याची शास्त्राप्रमाणे प्रतिष्ठापना केलेली असते. भक्ताची नि:स्सीम श्रद्धा त्यावर असते मग त्याने मूर्तिपूजा केली तर बिघडले कोठे ?'' राजा यावर निरूत्तर झाला.

मूर्तिपूजा समजून उमजून केली पाहिजे. मूर्ती ही सगुण-साकार आहे. सगुण साकार आहे. सगुण-साकाराकडून निर्गुण निराकाराचा हा भक्तीचा प्रवास आहे. जो सगुण आहे तोच निर्गुण आहे. म्हणून समर्थ रामदास म्हणतात,

**सगुणाचेनि आधारे । निर्गुण पाविजे निर्धारि ।**
**सारासार विचारे । संतसंगे ।। (दासबोध)**

''सगुणाचा-मूर्तिचा आधार घ्यायचा पण, भक्तीचा प्रवास मात्र निर्गुणाकडे करायचा. हे सगुण निर्गुणाकडे करायचा. हे सगुण-निर्गुणाचे तत्व नीट समजून घेण्यासाठी संताच्या विचारांचे धन, संत संगतीने पार करायचे. ज्ञानाने समजून घ्यायचे.''

म्हणून मूर्तिपूजा हे सुद्धा शास्त्र आहे. मूर्तिपूजेचे हे शास्त्रीय स्वरूप नीट समजून घेतले तर त्या भक्तीला गती प्राप्त होते. मग पूजा केवळ एक



कर्म, उपचार, विधी राहत नाही. मूर्तीकडे पाहून भाव उचंबळून आले पाहिजेत. म्हणून मूर्तिपूजा ही मनाने व बुद्धीने केली पाहिजे.

हे दोन पंख आहेत. भक्ती व ज्ञान या दोन पंखानीच भाव समृद्ध होतात. केवळ भक्ती किंवा केवळ ज्ञान हे अपुरेच आहे. भगवान आदि शंकराचार्य म्हणजे ज्ञानाची मूर्ती, प्रचंड ज्ञान ! पण त्या ज्ञानाबरोबरच त्यांची भक्ती ही भावसमृद्ध होती. म्हणूनच भावविभोर अवस्थेत त्यांनी काव्यरचना केली, असंख्य स्तोत्रे लिहिली. अद्वैतांचे प्रणेते असूनही भक्त व देव या द्वैतात त्यांनी ही अलौकिक रचना केली.

जशी मूर्तिपूजा तसे द्वैत-अद्वैत. जे द्वैत आहे तेच अद्वैतही असते. ''जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत'' हे ज्ञानेशांचे तत्वज्ञान निश्चित सिद्ध आहे. सत्य आहे. प्रत्येकात भगवंत आहे. पण अंत:करणाची जेवढी शुद्धता तेवढाच तो प्रकट असतो. ज्याचा काम, विकार जाऊन ज्याचे चित्त, मन, बुद्धी, अहंकार शुद्ध झाले त्यात भगवंत प्रकट होतो. शुद्ध चित्तातच ज्ञानही प्रसवते. संत महात्म्यांचे हे अंत:करण परिपूर्ण शुद्ध असल्यामुळे ते चालते-बोलते ईश्वरच असतात.

**ज्ञानाग्नेचि मुखे । जेणे जाळिली कर्म अशेखे ।**
**ते परब्रह्मचि मनुष्य वेरवे । ओळख तू ।।**

ज्ञानाग्नीनी ज्यांनी आपली सर्व कर्मे भस्मसात केली ते सर्वजण मनुष्यरूपातले परब्रह्मच आहेत असे ज्ञानेश्वर म्हणतात. म्हणून अद्वैत जरी मान्य केले तरी ज्ञान व शुद्धता यासाठी साधनेची आवश्यकता राहतेच.

जे जे भेटे भूत ..... म्हणून हिंस्त्र वाघाला किंवा विषाने भरलेल्या नागाला आपण जवळ करत नाही. आदिशंकरांच्या जीवनात घडलेला एक प्रसंग...

एकदा शंकराचार्यांनी गावातून भ्रमण करीत असताना एक पिसाळलेला हत्ती वाटेत आला. शंकराचार्य त्याला पाहून भीतीने तेथून पळाले. हे लोकांनी पाहिले. लोकांनी त्यांचे तत्वज्ञान अभ्यासिले होते. शंकराचार्यांना त्यांनी प्रश्न केला, ''आपण म्हणताय की केवळ भ्रांतीमुळे आपल्याला भेद दिसतो. जर असे असेल तर तुम्ही हत्तीला पाहून पळ का काढला ?'' श्री शंकराचार्यांनी

तात्काळ उत्तर दिले. ''हत्ती व माझ्यात भेद आहे असा जो भ्रम, भ्रांती आहे तसेच माझे पळणे हाही भ्रम आहे.'' व्यवहारात द्वैत–अद्वैत कसे पहायचे याचा बोध त्यांनी घटनेतून दाखविला.

म्हणूनच श्रीकृष्णाने कंस, जरासंध अशा दैत्यांना ठार केले. सत्प्रवृत्त–दुष्पप्रवृत्त अशा भेदामुळे पांडवामध्ये महाभारत घडले. हे केवळ सुष्ट–दृष्ट, ईश्वरी अंशाचे प्रकटीकरण झाले होते. पण कौरवात सैतानी पाशवी प्रवृत्तींनी थैमान घातले होते. दुर्योधनाला जेव्हा धर्म–अधर्माच्या गोष्टी समजावल्या तेव्हा दुर्योधन म्हणाला,.

**''जानामि धर्मं न च मे प्रवृत्ति ।**
**जानामि अधर्मं न च मे निवृत्ति ।**
**केनापि देवेन हृदि स्थितेन ।**
**यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि ।।**

''मी धर्म जाणतो पण धर्माप्रमाणे वागावे अशी बुद्धी मला होत नाही. मी अधर्म जाणतो. पण ते सोडण्याची बुद्धी मात्र होत नाही. कारण माझ्या हृदयातील जे गत संस्कार आहेत, ते जसे करण्यास सांगतात तसे मी करतो.''

आपल्या दुष्टप्रवृत्तींचे समर्थनही त्याने हे असे केले. म्हणून व्यवहारात द्वैत–अद्वैत व्यावहारिक बुद्धीने समजून घेतले पाहिजे.

कृष्णनीती समजून घेताना हे सर्व जाणून घ्यायची गरज आहे. कृष्णाने अनेक वेळा अनेक ठिकाणी वेगवेगळा न्याय दिला असे वरकरणी वाटते. पण त्या सर्वांत एक तर्कशुद्ध मांडणी होती.

कृष्णनीतीसंबंधी जाणून घेताना यातील 'नीति' या शब्दाचा नेमका अर्थ समजणे आवश्यक आहे. नी (नय) नेणे या धातूपासून नीति हा शब्द व्युत्पादिता येतो. नीतिशास्त्र म्हणजे आपले संपूर्ण जीवन कसे न्यावे हे ठरविण्याचे शास्त्र. जीवनात कोणती मूल्ये स्वीकारावीत, काय प्रमाण मानावे व जीवनाचे अंतिम उद्दिष्ट काय असावे हे सांगणारी प्रणाली म्हणजे नीती. चार्वाक नीती ही शास्त्रात ऐहिक दृष्टीच सांगणारी नीति आहे. अर्थ व काम हेच काय ते पुरूषार्थ आहेत. पारलौकिक सुखे व मोक्ष याचा विचार न करता



केवळ भौतिक भोग भोगावेत. तात्काळ सुख देणारी लौकिक सुखे यथेच्छ भोगावीत.

**याव ज्जीवं सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत् ।**
**भस्मी भूतस्य देहस्य पुनरागमनं कुत: ।।**

''जोपर्यंत अखेरचा श्वास येत नाही, तोपर्यंत सुखाने जगावे, कर्ज काढून का होईना पण तूप रोटी खावी. एकदा देह अग्नीत भस्म झाला की कोण परत येणार आहे ?''

चार्वाकांनी जडवाद स्वीकारला होता.

आजही २१ व्या शतकात या चार्वाक नीतीप्रमाणे वागणारे लोक आहेत. बँककडून कर्ज घ्यायचे व बुडवायचे. मिळेल त्या मार्गाने सुखाची साधने मिळवायची. पाप पुण्याचा विचार न करता पण खरेच ते सुखी होतात का ?

चार्वाकांनी हे लक्षात घेतले नाही की कोणतेही सुख भोगून झाल्यावर संपते. पूर्वी भोगलेली सुखे मिळून सुखांची रास बनत नाही. एक सुख भोगले की दुसऱ्या सुखाची अतृप्ती असतेच. ही तृष्णा कधीच संपत नाही. सुखाची साखळी सतत वाढत राहते. याचे कारण प्रत्येक सुखानुभव विनाशी आहे.

भतृहरीने याचे खूप मार्मिक वर्णन केले आहे.

**''भोगान्भुक्ता वयमेव भुक्ता ।**
**तपो न तप्तं वयम् एवं तप्ता: ।**
**कालो न यातो वयम् एव याता : ।**
**तृष्णा न जीर्णा: वयम् एवं जीर्णा: ।।**

''आपण भोग भोगत नाही, भोगाकडून आपणच भोगले जातोय. तप कधी तापत नाही. आपणच तापले जातोय. काळ कधी जात नाही. आपणच या जगातून निघून जातो. आणि तृष्णा, तहान कधीही मिटत नाही. आपणच जीर्णजर्जर होवून संपतो.''

मग जिथे अशांती आहे तेथे सुख कसे असणार ? भगवान कृष्ण म्हणतात त्याप्रमाणे ''अशान्तस्य कुतो सुखं ?'' अशांत माणसाला सुखाची

प्राप्ती कशी होईल ?

म्हणून सुख ही अमूर्त कल्पना आहे. सुखाचा झरा अंत:करणात आहे. You can not make man happy. He should learn to be happy. सुखाची साधने देवून कोणाला सुखी करता येत नाही. सुख, समाधान हे मिळविण्याची साधना शिकलीच पाहिजे, असे झाले नाही तर ''तत: किं'' 'पुढे काय' हा प्रश्न राहतोच.

व याचे उत्तर उपनिषदे, धर्मशास्त्रे यांनी विस्तारपूर्वक सांगितले आहे. श्रेष्ठ प्राप्तव्यापर्यंत घेऊन जायचे, न्यायचे हा नीतिशास्त्राचा प्रमुख विषय आहे. उपनिषदे म्हणतात की आत्मा हेच परमप्राप्तव्य आहे. आत्मा हा सच्चिदानंद स्वरूप असल्यामुळे प्रत्येकाचे 'स्वस्वरूप' हे ही आनंदरूप आहे. तोच परमात्म्याचा अंश असल्यामुळे व प्रत्येकात तोच असल्याने ''मीच सर्वत्र आहे'' याची अनुभूती घेणे म्हणजेच साक्षात्कार ! असा साक्षात्कार होणाऱ्याला ''विश्वात्मैक्याचा'' अनुभव येतो. 'हे विश्वचि माझे घर' अशीच त्याची दृष्टि होते.

म्हणून 'कृतकृत्य' ही नैतिक संकल्पना उपनिषदात आली आहे. असा कृतकृत्य झालेला माणूस आप्तकाम होतो. आत्मलाभ झाल्याने तो अहंकार शून्य, मोह, शोकरहित, निर्भय व शांत होतो. ''आनंदाचे डोही आनंद तरंग'' अशी त्याची अवस्था होते. तो नित्यतृप्त होतो. तो नराचा नारायणच होतो. त्याची दृष्टि बदलते.

**विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म ।**<br>
**भेदाभेद भ्रम अमंगळ ।**<br>
**कोणाही जीवाचा न करावा मत्सर ।**<br>
**वर्म सर्वेश्वर पूजनाचे ।।**

असे संत तुकारामांनी वर्णन केल्याप्रमाणे त्याची अवस्था होते.

असे अमृतमय, शुभ जीवन प्राप्त करणे हेच नीतिशास्त्राचे काम आहे. गीता म्हणजे सर्व उपनिषदांचे सार ! असा कृतकृत्य होण्याचा मार्ग गीता दाखविते. अमृतत्व हेच माणसाचे खरेखुरे श्रेय आहे. जीवनाची कृतार्थता यातच आहे. कठोपनिषदात ''काय मागावे'' यावरच संपूर्ण चर्चा आहे.



नचिकेताने कृतकृत्य होण्यासाठी नि:श्रेयस असलेले आत्मज्ञान यमदेवाकडे मागितले. यम म्हणाला,''आत्म्याच्या संबंधीच्या ज्ञानाविषयी तू काही आग्रह धरू नकोस. मी तुला पृथ्वीवरील सर्व ऐश्वर्य होतो. रथ, घोडे ..... सर्व काही देतो पण हे आत्मज्ञान तेवढे मागू नको.''

नचिकेताने ठामपणे सांगितले, ''तू जे देणार आहेस त्या सर्व गोष्टीने मनुष्य कधीच तृप्त होणार नाही. या सर्व अशाश्वत गोष्टी आहेत.''

या उत्तराने यम खूश झाला. त्याने सांगितले की, आयुष्यात श्रेय व प्रेम यांची गल्लत झालेली असते. बुद्धिमान व विवेकी माणूस प्रेम सोडून आयुष्य सोडून श्रेयाचा स्वीकार करतो. प्रेमाचा मोह सोडल्याशिवाय श्रेयाची प्राप्ती होत नाही.

शेवटी नचिकेतला आत्मज्ञान मिळते. स्मृति-ग्रंथातून अनेक महापुरूषांच्या कर्तृत्व व जीवनाविषयक तत्वज्ञानावरून त्या त्या प्रकारच्या नीति प्रसिद्ध आहेत. उदा. विदूरनीति, बृहस्पतीनीति, शुक्रनीति, भीष्मनीति.... पण या सर्व नीतीमध्ये कृष्णनीतीची गरज सर्व मानवजातीला आहे. अवतारपुरुष म्हणून कृष्ण चरित्राकडे न पाहता मनुष्यरुपातील कार्य-कर्तृत्वाकडे मात्र पाहण्याची गरज आहे. कृष्णाच्या सर्व कृती ह्या निश्चित काही ठाम विचारावर आधारलेल्या आहेत. या सर्व विचार-संकल्पनांतून श्रीकृष्ण तत्वज्ञान उभे राहिले आहे. संपूर्ण जीवनाची बैठक या तत्वज्ञानावर आधारित आहे. म्हणून त्याने गोकुळ, मथुरा, द्वारका, कुरूक्षेत्र, हस्तिनापूर... अशा सर्व ठिकाणी जे कर्तृत्व-शौर्य-मुसद्दीपणा-कौशल्य, समयसूचकता, दूरदर्शीपणा, न्याय-नीति, धर्म-अधर्मातून घेतलेली नीतिधर्माची बाजू या सर्वांतून श्रीकृष्णाचे गुण-वैभव दिसते. अर्जुनाला सांगितलेल्या गीतेला जीवनग्रंथच म्हटले पाहिजे. प्रथम अध्यायात विषाद योगापासून म्हणजे नैराश्यापासून सुरु झालेली गीता प्रसन्नतेच्या मार्गावर संपते. जीवनाच्या सर्व पैलूंचे दर्शन या ग्रंथातून झाले आहे. सुखाचा राजमार्ग दाखविणारी गीता श्रीकृष्ण नीतीचे वैभव आहे.

याच नीतिची आज व्यक्तीला, समाज देश जगाला... सर्वांनाच गरज आहे. कोणतेही क्षेत्र असो... राजकारण, समाजकारण, उद्योगआरोग्य, संरक्षण,

(मॅनेजमेंट) व्यवस्थापन, उत्पादन याबरोबरच शाश्वत मूल्यांवर सिद्धांतरूपाने मांडलेले विचार हे प्रत्येक मनुष्याने आत्मसात केले पाहिजेत. जीवन बदलणारे हे समर्थ विचार आहेत. जीव-जगत् व जगदीश्वर तसेच भक्त भक्ती भगवंत यावर मांडलेल्या तत्वज्ञानावर विचार हे माणसाला नि:शंक करून सोडणारे विचार आहेत. श्रीकृष्णावर काही आक्षेपही आहेत पण त्याच्या जीवनातील सर्व घटनांचा तटस्थपणे व चिकित्सक वृत्तीने अभ्यास केला तर याची योग्य ती उत्तरे आपणांस मिळतील. हिंसा-अहिंसा, प्रपंच, परमार्थ, देह-आत्मा, जन्म-मृत्यू, प्रवृत्ती-निवृत्ती, श्रद्धा-अश्रद्धा, दैवी व असुरी गुण, ज्ञान-अज्ञान, आत्मा-अनात्मा, कर्म-ज्ञान-भक्ती यांचा केलेला समन्वय, सुख-दु:ख, सत्य-अहिंसा, प्रेम हे त्रिसूत्र, आसक्ति-अनासक्ति जन्म-पुनर्जन्म, कर्मविपाक सिद्धांत, प्रारब्ध-पुरुषार्थ, आहार-विहार-विचार व कर्म यांचा असलेल्या योगाशी संबंध, द्वैत-अद्वैत या सर्वांतून मिळणाऱ्या जीवनसाफल्याच्या चार गोष्टी.. तृप्ती, शांती, निर्भयता व आनंद...

हे सर्व मिळून जे रसायन तयार होते. त्याचे नाव कृष्णनीती. कृष्णाचे संपूर्ण जीवन.. त्याचे तत्वज्ञान. कर्तत्व म्हणजे कृष्णनीती. कृष्णाचा विचार व आचार म्हणजे कृष्णनीती.

यापुढील सर्व प्रकरणांतून या सर्व संकल्पनांचा आपण आढावा घेणार आहोत. या प्रास्ताविक प्रकरणात केवळ दिशा दाखविणयचा प्रयत्न केला आहे. महाभारत, भागवत, गीता या ग्रंथातून प्रकट झालेले श्रीकृष्ण जीवनदर्शन.... श्रीकृष्णनीती... चा सर्वांतून हा अभ्यास करायचा आहे.

हे दर्शन म्हणजे एक आदर्श वस्तुपाठ आहे. ही केवळ बौद्धिक भूक म्हणून नाही, तर जीवन बदलवणारी संजीवनी म्हणून त्याचा स्वीकार आपण करावयाचा आहे. याच प्रयोजनाच्या हेतूने हे लिखाण केले आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**





# महाभारतकालीन समाज

प्रकरण २

# महाभारतकालीन समाज

महाभारतकालीन समाज–प्रदेश–प्रजा–राजे व त्यांचे आचार–विचार समजल्याशिवाय कृष्ण जन्माचे रहस्य आकलन होणे कठीण आहे. त्या काळातील धर्मविचार तसेच रूढी–परंपरा यांची स्थिती समजली की, श्रीकृष्ण जीवनदर्शन सर्व पैलूसह समजणे सोपे होते. प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णाने स्वमुखाने, मनुष्यरुपात अवतार घेण्याचे प्रयोजन स्पष्ट रुपात सांगितले आहे.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।**
**परित्राणाय साधूंना विनाशायचं दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।। (४.७ व ८)**

''हे भारता ! जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानी होऊन अधर्माचे प्राबल्य माजते, तेव्हा तेव्हा मी आपण स्वत:च जन्म घेत असतो.''

''साधूंच्या–सज्जनांच्या संरक्षणार्थ आणि दुष्टांचा नाश करण्यास युगी युगी धर्मसंस्थापनेसाठी मी जन्म घेत असतो.''

या कार्यासाठी जन्म घेतला व कार्य पुरे होताच देह सोडून निजधामी प्रयाण केले. कृष्ण जन्मापूर्वी असे मनुष्यावतार बरेच झाले आहेत. काही पूर्णावतार तर काही अंशावतार. कृष्णाने म्हटले आहे की, असे दिव्य जन्म व दिव्य कर्म यातील तत्व जो जाणतो तो देहत्यागानंतर मलाच येऊन मिळतो. असे मत्मपरायण व पूर्ण शराणागत झालेले माझे भक्त माझ्या स्वरूपाला येऊन मिळतात. अशी अनेक आश्वासने भगवंताने गीतेत दिली आहेत.

कृष्णनीती श्रद्धेने समजून घेणे ही कृष्णाची भक्तीच आहे. 'कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत्'' कृष्णाचे जीवन समरतेने अभ्यासाचे. त्याने जगलेल्या

कृतार्थ जीवनाचे आपल्या शक्ती बुद्धीनुसार आचरण करायेच व कृष्णरुप होवून जायचे हीच खरी भक्ती.

गीतेत त्यांनी सिद्धांत सांगितले व त्या सिद्धांतानुसारच जीवन जगून दाखविले. त्यामुळे कृष्णाच्या संपूर्ण जीवनात समतोल व तर्कसंगती दिसते. जे बोलले ते वागले. उक्ती व कृती यांचा मेळ दिसतो. संयमीत, अविचल, शांत, निर्भय, जीवन हे केवळ या तत्वज्ञानाने घडले आहे. म्हणून कृष्णनीती समजण्यासाठी गीतेतील अशा अत्यंत महत्त्वाच्या श्लोकांचा, पुढील एका प्रकरणांत आपण वेध घेणार आहोत. कारण विचारांनीच व्यक्तिमत्व घडत असते. त्यामुळे कृष्णकथा या कितीही अवीट गोडीच्या असल्या तरी त्यातील तत्व बोध हाच महत्त्वाचा आहे. म्हणून कृष्ण विचाराप्रमाणे जीवन जगणे ही भक्ती. मग भले तुम्ही पूजा-अर्चा, यज्ञयाग, व्रते नाही केली तरी चालतील. श्री ज्ञानेश्वरांनी कठोरतेने हे प्रतिपादले आहे. ७०० वर्षापूर्वी केवळ कर्मकांड हीच भक़्ती अशी समाजाची धारणा झाली होती. ते म्हणतात,

**तुम्ही व्रते नियमु न करावे । शरीराते न पीडावे ।**
**दुरी केंही न वचावे । तीर्थांसी गा ।। ८९ ।।**
**देवतांतरा न भजावे । सर्वथा काही न करावे ।**
**तुम्ही स्वधर्म यज्ञी यजावे । अनायासे ।। ९१ ।।**
**देखा स्वधर्माते भजाल । तरी कामधेनू हा होईल**
**मग प्रजाहो न संडील । तुमते सदा ।। ९४ ।।**

''तुम्हांला व्रते व नियम करण्याची जरूरी नाही. शरीराला पीडा देण्याची जरूरी नाही व दूर कोठे तीर्थाला जायचीही गरज नाही. स्वधर्म सोडून अन्य देवतास भजावयाचे कारण नाही. हे सर्व काही करण्याचे मुळीच कारण नाही. तुम्ही सहजगत्या प्राप्त झालेला स्वधर्माचरणरूप यज्ञ करावा. पाहा स्वधर्माप्रमाणे आचरण कराल तर हा धर्म कामधेनूप्रमाणे इच्छा पुरविणारा होईल. मग लोकहो ही स्वधर्मरूपी कामधेनू तुम्हांला कधीच सोडणार नाही.''

श्री ज्ञानेश्वरांनी त्या काळातील लोकांना कर्मकांडाची सर्व साधने, मंत्र-तंत्राचे अनुष्ठान, एका देवाने इच्छा पूर्ण केली नाही की त्या देवतेला सोडून दुसऱ्या जागृत देवाची आराधना करणे. तिथेही काही जमले नाही की



मग तिसरा देव. .......... स्वत:चे विहीत कर्म सोडून कर्तव्यच्यूत होऊन हे कर्मकांड करू नये, असे निक्षून सांगितले. स्वधर्माची कास धरावी. ''स्वे स्वे कर्मण्यभिरत: संसिद्धी लाभते नर: ।'' स्वत:च्या विहीत कर्मांमध्ये कर्तव्यामध्ये रममाण झालेल्यांना सिद्धी प्राप्त होऊ शकते. म्हणून यज्ञाला भगवंताने स्वधर्म म्हटले आहे.

दुर्दैवाने आज भक्तीच्या महापुरात हेच विसरले आहे. त्यामुळेच भक्तीने माणूस बदलत नाही. भूल दिल्यावर काही काळापुरता माणूस जसा देहभान हरपतो तसा काही काळापुरता या कर्मकांडात तो स्वत:ला विसरतो. पुन्हा त्यातून बाहेर पडला की नित्याचे व्यवहार नेहमीच्याच मनाने बुद्धीने करायचे. खरे म्हणजे भक्ती म्हणजे वृत्तीत बदल. भक्तीत माणसाला ''नित्य नवा दिस'' जागृतीचा वाटला पाहिजे. मनात विकारांची जळमटे आहे तशीच. काम, क्रोध यात काही बदलच नाही आणि मी भक्ती करतो असे म्हणायचे ही निव्वळ स्वत:शी प्रतारणा आहे. भगवंताला सुद्धा हे अपेक्षित नाही. यात परमार्थाचा, अध्यात्माचा काय दोष ?

महाभारत काळात धर्माला, नीतीला अशीच ग्लानी आली होती. जनता सत्ताधीशांच्या दुराचाराने अगतिक व भयभीत झालेली होती. पाशवी शक्तीने थैमान मांडले होते. अन्यायाला सीमा नव्हती. समाजाची स्थिती विदारक झाली होती. सर्वत्र नैराश्याचा अंध:कार पसरला होता.

महाभारत हा भारताचा राष्ट्रीय ग्रंथ आहे. भाषेची रसवत्ता आणि वर्णनाची भव्यता या दोन गुणांमुळे महाभारत हे महाकाव्य ठरले आहे. केवळ काल्पनिक किंवा अद्‌भुतरम्यता यापेक्षा तत्कालीन समाजाचे वास्तव चित्रण यात आल्यामुळे त्याला इतिहासाचे स्वरूप प्राप्त झाले आहे. म्हणून या ग्रंथाला ''भारतं पंचमा वेद:'' असे म्हटलेले आहे. याचा अर्थ महाभारताला पाचव्या वेदाचे स्थान व योग्यता प्राप्त झाली आहे. म्हणून महाभारत हा भारतीय संस्कृतीचा मूलस्तंभ आहे. अशा या भव्य ग्रंथात अनेक राजांच्या व त्यांच्या प्राचीन वंशावळीच्या कथा, गाथा, आरव्याने आलेल्या आहेतच. पण त्याशिवाय त्यात धर्म, तत्वज्ञान, व्यवहार व राजनीती यांचे जागोजाग वर्णन आले आहे. म्हणूनच ग्रंथारंभी केलेली महाभारताची प्रशंसा त्याला

यथार्थतेने लागू पडते. असे म्हटले आहे........

**धर्मेचार्थेच कामे च मोक्षे च भरतर्षभ ।**
**यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत् क्वचित् ।।**

''हे पुरुषश्रेष्ठा, धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारी पुरुषार्थाविषयी प्रस्तुत ग्रंथात जे लिहीले आहे तेच अन्य सर्व ठिकाणी आढळेल आणि जे ग्रंथात नाही ते अन्यत्र कोठेही आढळणार नाही.''

मनुष्य जन्माचे सार्थक झाले पाहिजे. त्याच्या जीवनाला निश्चित ध्येय-विचार पाहिजे. ह्यासाठी वेदव्यासांनी महाभारताची रचना केली. यात भगवंत-भक्त यांच्या नात्याची चर्चा आहे; दृष्टी आहे, तेजस्विता, आवेश, नीतिमत्ता यांनी भरलेले वर्णन आहे पण याची बैठक इतिहासाची आहे.

भगवान श्रीकृष्णांचे ऐतिहासिक चरित्र महाभारत व हरिवंशात पाहायला मिळते पण श्रीकृष्ण ''भगवान'' आहे हे भागवतात पानोपानी आढळेल. दोन्ही ग्रंथ वेदव्यासांनीच लिहीले. पण महाभारताच्या बैठकीत इतिहास आहे. घटनांचे विस्तृत वर्णन आहे. भागवताच्या बैठकीत मुख्य भर भक्ती, नीति, भगवंताच्या लीला, पूज्य-भाव यांवर दिला आहे. असे म्हटले आहे की, 'महाभारत' लिहिल्यानंतर वेदव्यासांना दु:ख झाले. नारदांचा व वेदव्यासंचा तसा संवाद आहे त्यात त्यांनी म्हटले आहे. ''जोपर्यंत मी कृष्णलीला लिहीली नाही. तोपर्यंत असाच अंशात राहणार.'' म्हणून भागवताची रचना केली. भक्तीच्या पायावर तत्वज्ञान उभे केले. विचारांच्या बैठकीत भक्ती उभी केली.

महाभारताच्या युद्धाच्या मैदानावर भगवंताने अर्जुनाला गीता सांगितली. सृष्टी सोडायची वेळ आली त्यावेळी त्यांनी उद्धवाला उपदेश केला. गीता व महाभारत यात मनुष्य जातीला मिळालेली तत्वज्ञान व भक्ती यांची अनमोल भेट आहे. तर भागवतात भागवतधर्माची विचारधारा आहे. महाराष्ट्रात वारकरी सांप्रदाय भागवत सांप्रदाय व वैष्णव सांप्रदायही आहे. गीता व भागवत दोन्ही त्यांनी प्रमाणभूत ग्रंथ मानले आहेत. कृष्णभक्तीचे अलग अलग संप्रदाय आपल्या भारतात निर्माण झाले. पण या सर्व सांप्रदायांची गंगोत्री गीता-भागवत आहे.



अशा महानग्रंथांचा कर्ता व्यास हे ऋषीतले महर्षी होते. त्यांनी वेदराशीचे विभाजन केले. म्हणून त्यांना 'वेदव्यास' म्हणतात. समस्त वैदिक आचार्यांनी त्यांना भगवान या उपाधीने गौरविले आहे. व्यास हे वसिष्ठांच्या कुळातले होते. वसिष्ठ, शक्ती, परशर, व्यास अशी त्यांची पैतृक परंपरा आहे. व्यासांचा जन्म व चरित्र हे ही तितकेच अद्‌भुतमय आहे. व्यास व कर्ण हे दोघेही कानीन म्हणजे कुमारी अपत्य. दोघेही जन्मत: टाकलेले. कर्णाने कुंतीची भेट झाल्यावेळी कुंतीचा अधिक्षेप केला पण व्यासानी सत्यवतीला कधी एका शब्दानेही दुखावले नाही. व्यासांनी इथे नियतीची सत्ता मान्य केली. व्यासांनी आपल्या जीवनातील कोणत्याही गोष्टी लपवल्या नाहीत. ते जन्मभर सत्याशी प्रामाणिक राहिले.

भारतीय संस्कृतीचे सर्वांर्थांनी सम्यक् दर्शन व्यासांच्या ग्रंथात दिसते. म्हणूनच ''व्यासोच्छिष्टं जगत् सर्वं'' अशी लोकोक्ती रूढ झाली.

महर्षी वेदव्यासांनी वेद विभाजनांचे कार्य करून चार वेदांच्या चार संहिता तयार केल्या. त्याचप्रमाणे ब्रह्मसूत्रे किंवा वेदांत सूत्रे ही व्यासांची महनीय रचना आहे. या ग्रंथात त्यांनी अध्यात्माचे सिद्धांत सूत्र रूपाने ग्रंथित केले आहेत. पुराणांची निर्मिती हे त्यांचे अलौकिक कार्य आहे.

या सर्व ग्रंथातून व्यासांनी मानवाला ठायी ठायी पुरुषार्थाची, तेजस्वीतेची, प्रेरणा दिली आहे. जे मनुष्याच्या ऐहिक व पारलौकिक उन्नतीला उपकारक ठरेल तेच खरे ही त्यांची भूमिका होती.

त्यांनी एका ठिकाणी स्पष्टच म्हटले आहे.

**''गुह्यं ब्रह्म तदिदं ब्रवीमी**
**न इह मानुषाच्छ्रेष्ठतरं हि किंचीत ।।''**

''मी हे रहस्यज्ञान तुम्हांला सांगतो. या जगात मनुष्याहून दुसरे श्रेष्ठ काहीही नाही.''

मानवी जीवनासाठी पूर्णतेकडे जायला जितकी आध्यात्मिक साधनेची आवश्यकता आहे तितकीच लौकिक, भौतिक समृद्धीची आवश्यकता आहे.

यामुळेच वेदोत्तर काळापासून आजतागायत व्यास हे भारतीय संस्कृतीचे

महाप्राण ठरले आहेत.

वेदव्यासांनी लिहीलेल्या 'महाभारत' या महान ग्रंथाचे थोडे अवलोकन करू. महाभारत हा ऐतिहासिक घटनांचा तपशील आहे. त्यामुळे श्रीकृष्ण समजायचा असेल तर थोडे महाभारतही समजले पाहिजे. केवळ विहंगमावलोकन. गीतेच्या पहिल्याच श्लोकात जेथे भारतीय युद्ध झाले त्या कुरूक्षेत्राचा उल्लेख आहे, दिल्ली ते कुरूक्षेत्र हे अंतर १५६ कि. मी. आहे. वास्तविक पाहता दिल्ली हे शहरच मुळी कुरूक्षेत्र मैदानावर वसलेले आहे.

कुरूक्षेत्राला धर्मक्षेत्र का म्हटले आहे. त्याबद्दलचा कथाभाग महाभारताच्या शल्य पर्वात आला आहे. इंद्राच्या वरामुळे कुरूक्षेत्राला धर्मक्षेत्र हे नाव पडले. पण प्रत्यक्ष श्रीकृष्ण कौरव-पांडवांच्या युद्धात धर्माचा रक्षणकर्ता श्रीकृष्ण हा प्रत्यक्ष अर्जुनाच्या रथाचा सारथी या नात्याने साक्षीदार व प्रत्यक्षदर्शी होता. धर्माचे आचरण करणाऱ्या पांडवांच्या बाजूने होता. या कारणास्तवही धर्मक्षेत्र हे विशेषण शोभून दिसते. कौरवांकडे अकरा अक्षौहिणी व पांडवाकडे सात अक्षौहिणी एवढे सैन्य होते. एका अक्षौणिहीत रथात बसून लढणारे तसेच हत्ती, घोड्यावर बसून लढणारे व पायदळ मिळून २ लक्ष १८ हजार ७ शे वीर असत. ही संख्या उद्योग पर्वात सांगितली आहे व युद्धाच्या वेळी सैन्य कसे उभे करावे, हे शांतिपर्वात सांगितले आहे.

गीतेच्या पहिल्याच श्लोकात धृतराष्टाने संजयास कुरूक्षेत्रावर युद्धासाठी जमलेल्या माझ्या व पांडूच्या पुत्रांनी काय केले असा प्रश्न केला. संजय हा सूतपुत्र होता व अंध धृतराष्ट्राचा सारथी होता. व्यासांनी संजयास दिव्यदृष्टि दिली व त्यांनी त्यामुळे बसल्या ठिकाणी युद्धाचे प्रत्यक्ष वर्णन धृतराष्ट्रास सांगितले.

गीतेतील श्रीकृष्णाचे तत्वज्ञान समजून घेण्यासाठी महाभारताची कथा साररूपाने समजणे आवश्यक आहे. कौरव पांडवांचे पितामह असलेल्या भीष्माने धृतराष्ट्र व पांडू या दोघांतून पांडूला राजसिंहासनावर बसवले. हे संघर्षाचे पहिले निमित्त. पांडवांचे हस्तिनापुरात येणे कौरवांना मुळीच आवडले नाही. त्यामुळे ते पांडवांचा सतत दुःस्वास करीत. भीम महाशक्तीशाली असल्याने त्याला ठार करण्याचा प्रयत्न युक्त्या-प्रत्युक्त्यांनी अनेक वेळा



केला. पण कौरवांना यश आले नाही.

भीष्माने त्यांना वेगळे करायचे ठरविले. धृतराष्ट्राने वारणावनात जाऊन राहण्याचा सल्ला दिला. पांडवांना जाळून मारण्यासाठी ज्वालाग्राही पदार्थांचे एक लाक्षागृह तयार केले. पण या कटाचा सुगावा विदुराला लागल्यामुळे पांडव वाचले. कौरवांना वाटले की पांडव जळून खाक झाले. म्हणून काही काळ पांडवांना अज्ञातवास घडला.

पुढे द्रुपदराजाने द्रौपदीच्या स्वयंवरात मत्सयंत्राची भेद अर्जुनाने केल्यामुळे पांडव जिवंत आहेत हे समजल्यावर धृतराष्ट्राने त्यांना हस्तिनापूरला बोलावून घेतले. भीष्माने वैर संपविण्यासाठी राज्याची वाटणी केली. पांडवांना इंद्रप्रस्थ ही राजधानी देवून त्यांना तिकडे पाठविले. काही काळ पांडवांचा सुखात गेला. या अवधीत द्रौपदीला पाच पुत्र व सुभद्रेला अभिमन्यू नावाचा पुत्र झाला.

पुढे धर्मराजाने राजसूय यज्ञ केला. यज्ञसमाप्तीच्या वेळी श्रीकृष्णाला अग्रपूजेचा मान दिला ही गोष्ट शिशुपालाला आवडली नाही. त्याने भीष्म व कृष्णाची निंदा नालस्ती केली. कृष्णाने हे निमित्त साधून त्या खलदुर्जन शिशुपालाचा वध केला.

पांडवांनी मयसभेचे आयोजन केले होते. दुर्योधन ही मयसभा पाहण्यासाठी आला होता. एका ठिकाणी भूमी समजून तो सरळ पाण्यातच पडला. सर्व पांडव हसले. द्रौपदी म्हणाली,''अंधपुत्र खराच.'' हा उपहास दुर्योधनाच्या जिव्हारी लागला. हस्तिनापुरात आल्यानंतर द्वेषाग्निने पेटलेल्या दुर्योधनाने शकुनीला बोलावून द्यूत खेळण्याचे कपट रचले.

पुढे द्युतात कपटाने पांडव हरले. द्रौपदीला सुद्धा पणाला लावले. द्रौपदीच्या वस्त्रहरणाचा किळसवाणा प्रकार घडला. केवळ राज्यच गेले नव्हे तर बारा वर्षांचा वनवास पांडवांच्या नशिबी आला.

बारा वर्षांचा वनवास संपला. एक वर्ष वनवासात घालविण्यासाठी सर्व पांडव विराटनगरीत आले. कीचकवधाची घटना घडली. कौरवांनी ओळखले की हे काम फक्त अर्जुनच करू शकतो. लगेच कौरवांनी विराटवर स्वारी केली. पांडवांचा अज्ञातवास संपल्यानंतरच दुर्योधनाला त्यांची ओळख

लागल्यामुळे कौरवांच्या पदरी खूप नैराश्य आले.

पांडवांचे राज्य पुनश्च: त्यांना मिळाले यासाठी पांडवांची सभा घेतली. कौरवांनी ''आम्ही आमचा दूत पाठवून तुम्हांला आमचा विचार कळवू'' असे सांगून टाकले.

या वाटाघाटीच्या काळात पांडवांनी आपला मुक्काम उपप्लव्य नगरात ठेवला होता. कौरव युद्धाची तयारी करत आहोत हे पाहून पांडवांनीही तयारी चालविली.

त्यासाठीच अर्जुन व दुर्योधन श्रीकृष्णाकडे द्वारकेला गेले. कृष्णाने आपल्या मदतीचे दोन भाग केले. एक समस्त यादव सैन्य व दुसरे एकटा नि:शस्त्र श्रीकृष्ण, दुर्योधनाने आपल्या स्वभावानुसार कौरव सैन्याची मागणी केली व अर्जुनाने आपला प्रिय सखा, गुरु, प्रभू अशा श्रीकृष्णाचा आनंदाने स्वीकार केला.

धृतराष्ट्राने संजयाला दूत म्हणून पांडवांकडे पाठवून दिले. धर्मराजाने संजयाला विचारले. संजयाने उत्तर दिले. ''युद्ध झाले तर मानवसंहार होईल व त्यात आप्तजनही मरतील.'' हे महापातक आहे. धर्मराज म्हणाला, ''आम्ही आपत्काली भीकही मागितली. यापुढे ही गोष्ट कधीही करणार नाही. यापेक्षा श्रीकृष्ण सांगेल तेच आमचे उत्तर असेल.'' श्रीकृष्णानेही सांगितले. ''आम्हालाही शांतताच हवी. पण ती सन्मानाने. त्यासाठी पूर्वीप्रमाणे इंद्रप्रस्थांचे राज्य कौरवांनी पांडवांना द्यावे व समेट करावा.'' धर्मराजही म्हणाला, ''मी दुर्योधनाला क्षमा करेन पण आमचा वाटा आम्हांला द्यावीत, शक्य नसेल तर निदान पाच गांवे आम्हांला द्यावीत.

पण धर्मराजाची एवढी किमान मागणी देखील कौरवांनी मान्य केली नाही. धर्माला युद्ध नको होते. शेवटचा उपाय म्हणून कृष्णाने शिष्टाईसाठी कौरवांकडे जावे अशी त्यांना विनंती केली.

त्यानुसार श्रीकृष्ण हस्तिनापुरला आला. कौरवांच्या सभेत त्याने मुद्देसूद प्रभावी भाषण केले. श्रीकृष्ण म्हणाला, ''धृतराष्ट्रा, तू अर्धे राज्य पांडवांना दे व युद्धात होणारा नरसंहार थांबव. पांडव समेटाला तयार आहेत.'' त्यावर दुर्योधन खवळून म्हणाला, ''मी पांडवांना अर्धे राज्यच



काय, पाच गावे काय, सुईच्या अग्रावर राहील एवढी मातीही देणार नाही.''

त्यावर श्रीकृष्ण तितक्याच स्पष्टपणे बोलला. ''ठीक आहे. यापुढे युद्ध झाले तर त्याचा दोष पांडवांकडे नाही. एवढे लक्षात ठेव.''

आणि कुरूक्षेत्रावर युद्धाला तोंड फुटले. कौरवांनी भीष्माला आपला सेनापती नेमले व पांडवांनी द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नला आपले सेनापती नेमले. ऐकून अठरा दिवस कुरूक्षेत्रावर हे युद्ध झाले.

महाभारतातील हे युद्ध सत्य-असत्य, धर्म-अधर्म, न्याय-अन्याय, दैवी गुण व असुरी सत्-असत् यामधील होते.

दुर्योधन म्हणजे लोभाचे प्रतिक ! आपल्या वाटणीचे राज्य भोगायचेच पण भावांच्या राज्याचा मोह सोडायचा नाही. कर्ण म्हणजे अहंकार. माझ्यापेक्षा शूरवीर कोणी नाही अशी त्याची अहंता. अर्जुनाला पराभूत करण्यास उतावीळ झालेला कर्ण आपल्यापेक्षा कोणी श्रेष्ठ नाही अशा भ्रमातच वावरत होता. भीष्म म्हणजे मोह, ममतेचे प्रतिक. केवळ मोहाने आंधळा झालेला भीष्म व ममतेने आधीच असलेला आंधळा हे दोघे सारखेच दोषी. मत्सर व इर्ष्या याचे चालते बोलते रूप म्हणजे शकुनी. अश्वत्थामा म्हणजे क्रोध. आपल्या पित्याच्या मृत्यूचा बदला घेण्यासाठी सूडाने पेटलेला अश्वत्थामा म्हणजे मूर्तिमंत क्रोध. स्वत: द्रोणाचार्य म्हणजे साकार मद-नीति अनीतितला फरक न जाणणारा, केवळ आपत्ती काळात अन्नभक्षण केले म्हणून कृतज्ञतेच्या भावनेपोटी चांगले-वाईट हे पूर्णपणे विसरून अस्मिता-आत्मभान नसल्याप्रमाणे दुर्योधनाच्या पक्षात युद्धासाठी सज्ज झाले. दु:शासन म्हणजे काम ! द्रौपदीला भर सभेत अपमानीत करून तिचा पदर धरणारा दु:शासन कामाने अंध, उन्मत्त झाला होता.

कौरवांचे हे सात महारथी म्हणजे काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, अहंकार या विकारांनी आत्मनाशाकडे निघालेले पापाचे धनी होत. तर पांडव म्हणजे दैवी गुण संपदा लाभलेले; धर्माच्या राजरस्त्याने चाललेले, सुसंस्कारित सज्जन होत. युद्ध सुरु होण्यापूर्वी धर्मराज आपल्या भावांना बरोबर घेऊन भीष्म-पितामहांचा आशीर्वाद घेण्यासाठी त्यांच्या छावणीत गेला. अभिवादन करून म्हणाला, ''पितामह, मला युद्धाची अनुज्ञा असावी.''

हे ऐकून भीष्म सद्गदीत होऊन म्हणाले, ''युधिष्ठिरा, तुझा पक्ष सत्याचा आहे आणि सत्याचाच विजय होईल असा माझा तुला आशीर्वाद आहे. विनम्रता, सद्गुण यांचा हा विजय आहे. म्हणूनच कृष्णानेसुद्धा अर्जुनाच्या रथाचे सारथ्य केले.

महाभारतात असे एकही पात्र नाही की जे प्रत्यक्ष जीवनात पहायला मिळणार नाही. महर्षी व्यासांनी मानवी स्वभावाचे सर्व कंगोरे उलगडून दाखविले आहेत. एक दुर्गुण, एक विकार सुद्धा आत्मनाशाला कारणीभूत होतो. अंतःकरणात हा गुण–दोषांचा संघर्ष सतत सुरु आहे. जन्माला येतानाच सत्–असत् या दोन्ही प्रवृत्ती तो घेऊन आलेला असतो. म्हणून अंतःकरणात व बाहेर जगात सतत युद्ध सुरु आहे. म्हणून संत तुकारामांना म्हणावे लागले,

**''रात्रीदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग ।**
**अंतर्बाह्य जग आणि मन ।।''**

हे जीवन सुद्धा कुरूक्षेत्रच आहे. या कुरूक्षेत्राचे धर्मक्षेत्र बनविणे हा खरा पुरुषार्थ आहे. विवेक संयम यांनी या विकारांना आवरून धरण्यातच जीवनाचे यश, सुख आहे. म्हणून भगवंताला सुद्धा दुष्टांचा संहार करण्यासाठी व सज्ञनांचे रक्षण करण्यासाठी अवतार घ्यावा लागतो. श्रीकृष्णाला सुद्धा हे युद्ध टाळता आले नाही त्याचे हेच कारण आहे.

५००० वर्षापूर्वीच्या भारतात घडलेल्या या घटना. महाभारतात आलेल्या आहेत. राजनीती, राजधर्माचे हे वर्णन आहे. महाभारताकडे केवळ महाकाव्य म्हणून न पाहता तो आपल्या पूर्वजांचा इतिहास आहे या दृष्टीने पाहिले पाहिजे. या महाभारतावर अवितरपणे कथा, काव्ये, कादंबरी, नाटके होत आहेत व होत राहणार. या कलाकृतींच्या अभिव्यक्तीवरून महाभारतातील नाट्यमय प्रसंगांचे कथन होत असेल पण हा ग्रंथ मूळ स्वरूपात वाचून सत्यदर्शन होते हे निःसंशय.

म्हणून श्रीकृष्णजन्माच्या वेळची विशिष्ट परिस्थिती थोडक्यात लक्षात घेतली पाहिजे. त्या काळात राजे बिघडले होते. जणू पृथ्वीवर असुर दानवच जन्म घेऊन आले होते. कृष्ण जन्मापूर्वी अशा असुरराजांनी हाहाःकार



माजविला होता. त्याचे सविस्तर वर्णन महाभारत व हरिवंशयामध्ये आले आहे. यासाठीच पृथ्वीचा भार हलका करुन प्रजाजनांना सुखी करण्यासाठी स्वतः श्री विष्णूने कृष्णरुपात यावयाचे ठरविले याचा हा वृतांत आहे. राजे अनीतिमान झाले होते; पाप पुण्याचा विचारच संपला होता. अशावेळी प्रजासुद्धा नीतिमान राहू शकत नाही. कारण ''राजा कालंस्य कारणम् । यथा राजा तथा प्रजा'' ही सर्व परिस्थिती बदलायची असेल तर भोगलोलुप, अत्याचारी राज्यव्यवस्था बदलणे आवश्यक होते. अनियंत्रित राजसत्तेला लाचावलेले राजे होते. कंस, जरासंध अशा राजांना सुधारणे हे केवळ अशक्य होते. त्यांना ठार करुन सत्प्रवृत्त लोकांच्या हाती राज्य सोपविणे हेच आवश्यक होते. कंसाने प्रत्यक्ष आपल्या पित्याला उग्रसेनाला कैद करुन राजसत्ता ताब्यात घेतली होती.

श्रीकृष्णजन्मापूर्वी राज्यसंस्थांचा हेतू धर्माचे रक्षण हा नव्हता. प्रजेचा सांभाळ व नीतीमय आचरण न राहता बळी तो कान पिळी (...............) या न्यायाने राजे वागत असत. त्यामुळे साम्राज्यवाद पसरला व गणराज्यांना भयनिर्माण झाले. महाभारतात नारदाने या गणराजांची स्तुती केली आहे. यादवांचे राज्य गणराज्य होते; उग्रसेन व बभ्रू यांचे नेते होते.

त्या पसरत चाललेल्या आक्रमणकारी साम्राज्यवादाचा नेता जरासंध अलौकिक बुद्धीमत्ता असलेला राजा होता. त्याने उग्रसेनच्या पुत्राला–कंसाला स्वतःचा जावई बनविले होते. कंस जरासंधाची विचारसरणी मानणारा होता. कंसाला आपलासा करुन यादव गणराज्याला भयभीत करुन सोडले होते. याच कंसाने नंतर आपल्या पित्यालाच तुरुंगात टाकून राज्य बळकावले. पूर्वी रघू, दिलीप, राम वगैरे राजांनी दिग्विजय करुन राज्ये जिंकली होती. पण ती आपल्या स्वतःच्या राज्याला जोडली होती. पण जरासंधाने राज्ये जिंकून तेथील राजांना तुरुंगात डांबले होते. महाभारताच्या म्हणण्यानुसार त्याने ८६ राजांची राज्ये जिंकून ती सर्व आपल्या मगध देशाच्या राज्याला जोडली होती. शंभर राज्ये जिंकल्यावर बंदिवान राजांची संख्या शंभर होताच त्यांचा नरमेघ यज्ञ करायचा.

चेदी देशाचा राजा शिशुपालही असाच दुसरा शक्तिशाली राजा होता.

या शिशुपालाला श्रीकृष्णाने भरसभेत ''दुसऱ्याच्या पत्नीकडे पापी नजर ठेवून पाहणारा कुलांगार आहेस.'' असे धिक्कारले होते.

हे सर्व राजे अनीतीने वागणारे दुष्ट तर होतेच पण ते साधूपुरुषांचे संहारक होते. त्या काळात ब्राह्मणांचे अध:पतन झाले होते. त्यागा ऐवजी भोग, विचाराऐवजी अविचार, नीतीऐवजी अनीती याचेच अनुकरण ते करीत होते. संस्कृतीचे रक्षण करणारेच जेव्हा बुद्धी भ्रष्ट होतात तेव्हा राजे-राज्यकर्ते, सत्ताधीश हे देखील पदभ्रष्ट होतात. यामुळे सामान्य जनतातून सुद्धा कर्तव्यभावना व सांस्कृतीक विचार जाऊन स्वैराचार वाढला होता. अन्यायाचे निर्मुलन करुन न्याय देणारी राजसत्ता जेव्हा भ्रष्ट होते. 'यथा राजा तथा प्रजा'' अशी परिस्थिती उद्‌भवते.

यादव गणराज्य मानत होते. त्यांचे संघराज्य होते. त्यांच्यामध्ये राजाला कोणतेही पद वा स्थानच नव्हते. पौराणिक कथेप्रमाणे राजा ययातीने शाप दिला होता की, यादवामध्ये त्यांच्या वंशात कोणी राजा होणार नाही. झाला तर तो टिकणार नाही.

शिशुपालाने भगवान श्रीकृष्णाच्या पूजेला विरोध केला होता तेव्हा हाच प्रश्न उठला होता. त्याने सांगितले होते,''यादवकुळात राजाच नाही. मग श्रीकृष्णाचे राजा म्हणून पूजन कसे करु शकणार ?'' गणराज्य म्हणजे रिपब्लिक (Republic) यादवांची राज्यव्यवस्था प्रजातंत्र. गणराज्य संघराज्याची होती. यादवांमध्ये दोन कुळे होती. एक अंधक व दुसरे वृष्णि. अंधक कुळाचे शासन मथुरेच्या आजूबाजूच्या प्रदेशात होते त्या संघाचा प्रमुख उग्रसेन होता. दुसरा संघ वृष्णि संघ. या संघाचा समकालीन प्रमुख अक्रूर होता. वसुदेव वृष्णि कुळातला होता. तो तत्कालीन प्रजामान्य प्रतिष्ठित नेता व शूर सेनाचा पुत्र होता. भगवान श्रीकृष्णाने वसुदेवाच्या घरात जन्म घेऊन वृष्णि संघाला पवित्र केले. या दोन्ही संघाना जरासंघाच्या पसरत असलेल्या आक्रमणकारी साम्राज्यवादाचे फार मोठे भय होते; त्यामुळे ही संघराज्ये एकोप्याने एकत्र येत व सुरक्षा, हित, कल्याण या सर्वांचा विचार करीत. उग्रसेन व अक्रुर या साठीच एकत्र आले होते.

जरासंघाने भेदनीती वापरून हे ऐक्य फाडण्याचा यशस्वी प्रयत्न



केला. जरासंधाने फूट पाडण्यासाठी संघप्रमुख उग्रसेनाचा पुत्र कंसाला स्वत:च्या दोन्ही मुली अस्ति व प्राप्ति देऊन त्यांचे लग्न केले. जावई बनल्यानंतर कंसाच्या पाठीमागे मगधाची शक्ती उभी केली आणि मग प्रत्यक्ष बापाला तुरुंगात टाकून कंसाने सत्ता ताब्यात घेतली. अक्रूर व वसुदेव दोघेही कंसाचे मेहुणे होते.

ब्राह्मणांचे पतन झाल्यामुळे परंपरागत चालत आलेल्या गुरुकुल शिक्षण पद्धतीला मरगळ आली होती. ऋषीमुनींवर या असुरी शक्तींचे हल्ले होत. विवाहसंस्था बहुपत्नीत्व पद्धतीची होती. विजयी झालेले राजे पराजीत राजांच्या मुलींशी विवाह करीत. या संबंधामुळे राज्य विस्तार करणे सोपे जायचे. श्रीकृष्णाची अशीच अनेक लग्ने झाली. पळवून नेलेल्या मुलींना विवाहाशिवाय समाजात स्थान नसे. अशा मुलींना बहिष्कृत केले जायचे. म्हणूनच कृष्णाने अशा सोळा सहस्त्र मुलीशी विवाह करून समाजमान्यता मिळवून दिली.

समाजातील अशा अनिष्ठ चालीरिती व रूढी यांना बदलण्याचे कार्यही कृष्णाने केले. परंपरागत चालत आलेली इंद्रपूजा बंद करुन गोवर्धन पूजा सुरु केली.

श्रीकृष्ण जन्मापूर्वीची समाजाची अशी अवस्था होती. धर्माला जेव्हा ग्लानी येते आणि अधर्माचे जेव्हा अभ्युत्थान होते तेव्हा प्रत्यक्ष भगवान मनुष्यरुपाने अवतार घेतात. म्हणून ही कृष्णजन्मापूर्वीची राजकीय सामाजिक स्थिती आपण पाहिली.

आता ही अवतार संकल्पना जाणून घेतल्यानंतर कृष्णाच्या काल पर्वाची युगसंकल्पना थोडक्यात समजून घेवू. कृत, त्रेता, द्वापर व कली ही चार युगनामे प्रसिद्ध आहेत. त्यापैकी प्रत्येक युगाचा काळ निश्चित आहे. चार युगांचे मिळून एक युग होते. अशा एक हजार महायुगांचा ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. यालाच कल्प असे म्हणतात. असा उल्लेख भगवद्गीतेतही आला आहे. कलियुग सर्वांत लहान असून या युगाला ५०९४ वर्षे झाली आहेत हे महाभारताच्या शांतीपर्वात भीष्मांनी या संकल्पनेची गुणात्मक बाजू युधिष्ठीराला समजावून सांगितली आहे.

भगवान श्रीकृष्णाचा अवतार या दोन्ही युग संकल्पनानुसार द्वापर युगाच्या अंती झाला. त्यांनी आपल्या अवतारकार्यात शेवटची ३६ वर्षे कलियुगात व्यतीत केली असे महाभारतावरुन नि:सदिग्धपणे ठरविता येते. युद्धिष्ठीराच्या राज्याभिषेकापासून कलियुगाचा प्रारंभ मानला जातो. या सर्व काळावरुन व महाभारतातील सर्व संदर्भावरून श्रीकृष्णांचा एकंदर अवतार कार्यकाल १०० वर्षांचा मानला जातो.

म्हणून भागवतात म्हटल्याप्रमाणे

**..... कलौ जनीष्यमाणांना दु:ख शोक तमोनुदम ।**
**अनुग्रहाय च भक्तांना सुपुण्यं व्यतनोद यश: ।।**

''याच कलियुगात सर्व मनुष्यांचे दु:ख, शोक दूर करण्यासाठी व भक्तांना अनुग्रह देवून त्यांचे कल्याण करण्यासाठीच भगवंतानी जन्म घेऊन आदर्श जीवनाचा वस्तुपाठ दाखवून दिला.''

कलियुगातील जीवन कशा पद्धतीने चालणार आहे याचे बारीकसारीक वर्णन भागवताच्या १२ व्या स्कंधात आले आहे. हे वाचत असताना वाटते की; हे प्रत्यक्ष पाहून आताच कोणीतरी लिहीले आहे. पती-पत्नी, बाप-मुलगा.... या सर्व नातेसंदर्भात त्यांचे संबंध कसे असतील याचे वर्णन आहे. नीती-अनीती सोडून लोक स्वैराचाराने कसे वागतील याचे वर्णन आहे. राज्यकर्ते उन्मत्तपणे व टोकाच्या भ्रष्टाचाराने जनतेची पिळवणूक करतील याचे वर्णन आहे. यासाठीच कृष्णाचे जीवन आपल्यासमोर आहे. कृष्ण विचारांच्या आचरणाने या महाभारत सदृश्य जीवनामध्ये रामराज्य येवू शकेल हा दिलासा भागवताने दिला आहे.

संपूर्ण जगाचा विचार केला तर सर्व ठिकाणी महाभारत सुरु आहे असेच वाटते. जगात आज दोनच जाती आहेत. सुर व असुर, सुष्ट व दुष्ट, सज्जन व दुर्जन... इतर जाती, धर्म, संप्रदाय अनीति, भ्रष्टाचार, अत्याचार, अन्यायांनी वागा असे सांगत नाहीत. जगातल्या प्रमुख धर्मांच्या सर्व संस्थापकांनी संपूर्ण मानवाच्या कल्याणाचा विकास साधून पारलौकिक जीवनाचा विचार करावा असे म्हटले आहे. हिंदू धर्मातील सहिष्णुता, सर्वधर्म हे एकच आहेत, देव-देवतांचे स्वरूप वेगवेगळे असले तरी एकाच परमात्म्यांची वेगवेगळ्या भूप्रदेशातील ही रुपे आहेत. म्हणून मांडलेली 'वसुधैव कुटूंबकम्' ही संकल्पना प्रेम, दया, शांती, करुणा अशा सर्व मानवी जीवन मूल्यांचा



केलेला उद्घोष.... ही सर्व उदात्त तत्वे हिंदू धर्मांनी वेदकाळापासून आचरली आहेत. जगाला बौद्धधर्माची देणगी या भारतभूमीने दिली आहे. गौतम बुद्धाच्या सर्व तत्वज्ञानात यापेक्षा काही मूर्तीपूजा, ईश्वर अशा अगोचर गोष्टी बुद्धाने ठोकरल्याही नाहीत व त्याचा पुरस्कारही केला नाही. आहे ही म्हटले नाही व नाहीही म्हटले नाही पण बौद्ध धर्माचे संपूर्ण तत्वज्ञान हे हिंदूसारखेच सर्व मानवजातीच्या कल्याणाचे आहे हे नि:संशय म्हणूनच पूर्वेकडील सर्व देशांनी बुद्ध धर्माचा स्वीकार केला. अहिंसा, शांती, प्रेम ही त्रिसूत्री सर्वच धर्मांची आहे. जैन धर्मीयांनी तर अहिंसेचा सर्वांत जास्त प्राधान्य दिले. इस्लाम चा अर्थच मुळी शांतता आहे. ख्रिश्चन धर्मांने प्रेम, करुणा, दया यांचा प्रचार जगभर केला.

या सर्व धर्मांचे तत्वज्ञान असे असून सुद्धा जगात अशांती, दु:ख, शोक का ? सैतान सुद्धा शरमिंदा होईल असे अत्याचार अनाचार सर्वत्र घडत आहेत. तालिबान, इसिस सारख्या अतिरेकी संघटना रोज हजारो निष्पाप जीवांचे बळी घेत आहेत. मुंबई, न्यूयॉर्क अशा शहरावरील अतिरेकी बॉंब हल्ल्यात हजारोंचे बळी तर घेतलेच पण अगणित संपत्तीचे अतोनात नुकसानही झाले. ज्या देशाने त्यांना पाठिंबा दिला त्यांनाच आता ते भस्मासुराची दहशत बसली आहे. स्त्रियांना शिक्षणापासून वंचित ठेवणे, कोणतेही स्वातंत्र्य न देता टी. व्ही. कॉम्प्युटर, सिनेमा, वाङ्.मयीन व कला क्षेत्रातील अभिव्यक्ती याचा वापर करण्यास बंदी करणे व हे केल्यास अमानुष छळ करणे व दहशत बसविणे हे आता २१ व्या शतकात घडत आहे.

हे महाभारत नसून महामहाभारत चालू आहे. विज्ञानांनी निर्माण केलेल्या अत्याधुनिक शस्त्रांचा वापर करुन हाहा:कार माजविणाऱ्या या नराधमांना कोण आवरणार ?

हेच आजचे नरकासुर, भस्मासुर, कालिया, कंस, जरासंध, दुर्योधन, दु:शासन नाहीत का ?

आज राजेशाही जवळ जवळ अस्त पावली. स्वातंत्र्य, लोकशाही अशा गणराज्यांचा प्रभाव वाढत आहे. लोकांना स्वातंत्र्याची किंमत समजली आहे. व्यक्तिस्वातंत्र्याचा उद्घोष सुरु आहे.

आज महाभारतकालीन ''द्रौपदी वस्त्रहरणासारखे नव्हे तर त्याहूनही विदारक अत्याचार स्त्रियांवर घडत आहेत. अगदी अल्पवयीन मुलींपासून

प्रौढापर्यंतच्या स्त्रीयांवर अमानुष बलात्कार घडत आहेत. बलात्कार करुन कायद्याच्या तावडीत सापडण्यापेक्षा त्या दुर्दैवी स्त्रीची हत्या, पुरावा नष्ट करण्यासाठी करत आहेत. राजे गेले पण सत्ता, संपत्तीच्या जोरावर शक्तीशाली झालेली माणसे नीती-अनीतिचा विचार न करता भ्रष्ट होत आहेत.

ही दयनीय अवस्था बदलण्यासाठी कृष्ण विचारांची जगाला गरज आहे. कृष्णनीती मध्ये ही सर्व परिस्थिती बदलण्याची शक्ती आहे. या सर्वांचा विचार आपण पुस्तकाच्या शेवटच्या समारोपाच्या प्रकरणात करणार आहोत.

पण त्या आधी श्रीकृष्णाचे संपूर्ण जीवन दर्शन सर्व अंगानी घेऊ.

# कृष्ण - अर्जुन

श्रीकृष्ण समजण्यासाठी कृष्ण-अर्जुनाचे नाते समग्रतेने जरी नसले तरी त्याच्या ठळक पैलूंचे दर्शन घेणे आवश्यक आहे. जेथे श्रीकृष्ण व जेथे अर्जुन तेथेच विजय, श्री नीति... हे आहेत. हे आपण या पुस्तकाच्या सुरुवातीच्याच प्रकरणात पाहिले. संपूर्ण गीतेत युद्धाचे वर्णन फक्त गीतेच्या पहिल्याच अध्यायात आले आहे. त्यानंतर कोठेही युद्धाचा उल्लेख नाही. श्रीकृष्ण-अर्जुनाच्या संवादानी, प्रश्नोत्तरांनी गीता परिपूर्ण झाली आहे.

द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगी पांडवांशी कृष्णाची गाठ पडली ती कायमचीच होऊन गेली. आपल्या धर्मकार्यासाठी पांडवांना हाताशी धरुन श्रीकृष्णाने या संस्कृतीचे रक्षण केले. पांडवांच्या राजकारणाची सर्व सूत्रे कृष्णानेच हलविली. राजसूर्य यज्ञानंतर धर्मराज त्याला म्हणाला होता, ''आता हे साम्राज्य तूच सांभाळ ! तुझ्यच कृपेने ते मला लाभले आहे.'' पण अनासक्त कृष्ण कोठेही मोहात पडला नाही.

अशा कृष्णाला तेवढ्याच योग्यतेचा महान शिष्य लाभला. तो म्हणजे अर्जुन. अर्जुन हा कुंतीला इंद्राच्या मंत्राने प्राप्त झालेला तिसरा मुलगा. व्यासांनी अर्जुनाच्या व्यक्तिमत्वाचे सर्व पैलू चित्रसेन गंधर्वाच्या मुखाने वदविले आहेत. अर्जुन हा एक आदर्श विद्यार्थी होता म्हणून द्रोणाचार्यांचे त्याच्यावर अतोनात प्रेम होते. अर्जुनाची गुरुभक्ती अलौकिक होती. द्रोण वध पाहून अर्जुनाची गुरुभक्ती उफाळून आली. धर्मराजाकडे जाऊन अर्जुन



उद्वेगाने बोलला. ''तू धर्मज्ञ असूनही हा भयंकर अधर्म केलास. वालीच्या वधामुळे रामाची अपकीर्ती जशी झाली तशीच आचार्यांना मारुन तू कायमचा अपकीर्तीचा धनी होशील.

अर्जुन निष्ठावंत चारित्र्यवान होता. महाभारतात असे अनेक प्रसंग आहेत की जे याची साक्ष देतात. एक प्रसंग असा - ''विराटाच्या राजधानीत उत्तरेला नृत्य-नाटक शिकवण्यासाठी बृहन्नडा नावाने तो राहिला होता. अज्ञातवास संपल्यानंतर विराटराजाला त्याची खरी ओळख पटली. अर्जुनाने कौरवांच्या गोग्रहण प्रसंगातून आपल्याला वाचविले. याबद्दलची कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी त्याने अर्जुनाला आपल्या मुलीशी उत्तरेशी लग्न करावयास विनविले. पण अर्जुन म्हणाला, ''राजा, उत्तरा ही माझी शिष्या आहे. गुरुला शिष्येचे पाणीग्रहण धर्मविहीत नाही तुझी तशीच इच्छा असेल तर मी माझ्या अभिमन्यूसाठी उत्तरेला सून म्हणून स्वीकार करीन.''

अर्जुनाची कृष्णभक्ती निःस्सीम होती. अर्जुन दूरदर्शी होता. एका बाजूला यादवसैन्य व दुसऱ्या बाजूला निःशस्त्र श्रीकृष्ण अशी वाटणी झाली असता अर्जुनाने कृष्णालाच मागून घेतले.

अर्जुनाचा महापराक्रम सर्वश्रूतच आहे. विरात वेशधारी शिवाचे आणि अर्जुनाचे युद्ध हे त्याच्या शौर्याचे मूर्धन्य उदाहरण आहे. त्या युद्धाच्या शेवटी साक्षात शिवाने त्याचे गुणगान केले ते असे, ''अर्जुना, तुझ्या पराक्रमावर आणि शौर्य धैर्यावर मी प्रसन्न आहे. तुझ्यासारखा दुसरा क्षत्रिय नाही.

महाभारतात अर्जुन व कर्ण यांच्या शौर्याच्या अनेक कथा आहेत. कर्ण व अर्जुन यांची तुलना करताना कृपाचार्याने अहंकारी कर्णाला अर्जुनाचे पराक्रम ऐकविले आहेत. ते म्हणतात, ''कर्णा, उत्तर कुरुवर एकस्थान स्वारी करुन अर्जुनाने त्यांना जिंकले. अर्जुन व कृष्ण या दोघांनी मिळून खांडववन अग्नीला भक्षायला दिले. एकट्याने सुभद्राहरण केले. देवांकडून शस्त्रे मिळविली. अजिंक्य अशा चित्रसेन गंधर्वाला एकट्याने पळायला लावले. देवांनाही अनाटोप ठसलेला कालरवंज व निवातकवच या दानवांना एकट्याने यमलोकी पाठविले.''

अशा महापराक्रमी अर्जुनाला द्रौपदीपासून श्रुतकीर्ती, सुभद्रेपासून अभिमन्यू, चित्रांगनेपासून बभ्रूवाहन आणि उलूपीपासून इरावान असे चार पुत्र झाले.

अर्जुन म्हणजे मूर्तिमंत, ऋजूता, सरळ स्वभावाचा गीतेमधल्या पहिल्या अध्यायात त्याच्या या स्वभावची आपल्याला जाणीव होते. युद्धामध्ये समोर ठाकलेल्या आपल्या गुरुजनांना–स्वजनांना पाहून तो करुणेने व्याकुळ झाला. त्याचे मुख कोरडे पडले. शरीराला कंप फुटला. घाम आला. अश्रूपूर्ण नेत्र व शोकाकुल झालेल्या अर्जुनाला युद्ध करुन स्वजनांना ठार करायचे नव्हते. अशा विजयाने मिळणारे राज्य, सुखे व भोग त्याला भोगायचे नव्हते. अशा मोहग्रस्त शोकाकुल अर्जुनाला युद्धाला प्रवृत्त करुन स्वधर्म पाळण्यासाठी श्रीकृष्णाने गीता सांगितली. अर्जुनाला निमित्त करुन अखिल मानवजातीला दिव्य जीवनाचा महामंत्र दिला. अर्जुन हा आपला प्रतिनिधीच आहे. महामंत्र दिला. अर्जुन म्हणजे आपणच आहोत कारण गीतेमध्ये जे २१ प्रश्न विचारले आहेत ते आजसुद्धा आपलेच प्रश्न आहेत. १८ व्या शेवटच्या अध्यायात भगवंत त्याला विचारतात,''पार्था, तू माझे म्हणणे चित्त एकाग्र करुन ऐकलेस का ? आता तरी तुझा मोह नष्ट झाला ना ?'' त्यावर अर्जुनाने उत्तर दिले, ''हे अच्युता, तुझ्या कृपेने माझा मोह नष्ट झाला. मला स्वधर्माची स्मृती प्राप्त झाली. आता तुझ्या सांगण्याप्रमाणे मी वागेन.''

त्याने म्हटले की, ''करिष्ये वचनं तवं'' हे तीन शब्द म्हणजे गीतेचा आत्मा आहे. हाच भक्तीचा मूलमंत्र आहे. संपूर्ण गीता वाचल्यानंतर शंका, मोह मिटला पाहिजे व त्या कृष्णाला अभिवचन देता आले पाहिजे की आता मला माझ्या जीवनाचा राजरस्ता मिळाला आहे. तुझ्या वचनाप्रमाणे वागून मी माझे जीवन कृतार्थ व सफल बनवीन. असे जीवनच प्रसन्न, सुखी समाधानी असते.''

यासाठीच श्रीकृष्णाच्या जीवनाचा सर्वांगाने अभ्यास करायचा व ज्या नीतीने त्यांनी हे दिव्य कर्म केले त्या नीतीचा अवलंब आपण आपल्या जीवनात करायचा.

जेथे अर्जुन व जेथे कृष्ण तेथेच विजयश्री नीती असल्यामुळे आपणसुद्धा कृष्णमय व्हायचे. अर्जुनासारखे शरणागत होऊन भक्तीही करायची व ज्ञानही प्राप्त करायचे.

**।। श्री कृष्णार्पणमस्तु ।।**






# कृष्णनीती - १

# कृष्णनीती - १

**वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनं ।**
**देवकी परमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ।।**

गर्ग संहितेत कृष्णाष्टकात आलेला हा पहिलाच महान व मांगलिक श्लोक आहे. कृष्ण भक्तांच्या पठनातील नित्य चिंतनाचा कृष्ण-चरित्राचा अत्यंत महत्वाचा असा हा श्लोक ! भगवान कसा आहे ? जगद्गुरु आहे. मनुष्यरुपात वसुदेवाच्या पोटी जन्म घेतलेला आपल्या सारखाच. अवतार घेऊनच पृथ्वीवर जन्म घेतला. पण वसुदेवसुतं. त्याला माता-पिता-बंधू अशी सर्वच नाती आहेत. त्याचे जन्मणे हेच पित्याला गौरवास्पद वाटते. 'कंस-चाणूर मर्दनम्' - कंस, चाणूर अशा असुरी दैत्यांचा पराभव करुन त्यांना यमसमदनाला पाठविणारा, पुरुषार्थ करणारा श्रीकृष्ण, जन्मत:च देवकीला आपल्या जन्मदात्री आईला परम आनंद देणारा आहे. व शेवटी तो जगद्गुरु आहे. ज्याला जीवनात कृतार्थ व्हायचे अशा जगातील कोणत्याही पुरुषाने कृष्ण-विचार, तत्वज्ञान, कृष्णनीती या सर्वांचे आचरण करावे, अर्जुनासारखे गुरुप्रेम करावे व या जगद्गुरुला वन्दन करावे.

असा या श्लोकाचा संदेश आहे. जीवनाची दृष्टी देणारा मंत्र आहे.

कृष्ण चरित्रातील कृष्णाचा जन्म व त्याचे बालपण हे एक मधुर काव्यही आहे व बालवयात केलेली भावी जीवनाची मुहूर्तमेढ आहे. असुरांचा नाश व सज्जनांचे रक्षण, धर्म संस्थापना करुन सर्व लोकांना सुखाचा मार्ग दाखविणारे हे बालपण आहे. भागवतात याला दिव्यत्व बहाल केले आहे. महाभारत, हरिवंश या ग्रंथातून त्यातील ऐतिहासिक चरित्राचे दर्शन घडविले आहे. आपण याच दृष्टीने श्रीकृष्णाच्या जन्म व बालपण याचा परामर्श घ्यायचा आहे. कृष्णनीतीचा पाया या त्याच्या बाललीलातून वृद्धीगंत झाला आहे.

जसे आपण आधीच्या प्रकरणात पाहिले की, त्या काळात ब्राह्मणत्व व राजनैतिक विचारांचे अध:पतन झालेले होते. नीतीऐवजी स्वार्थ व त्यागाऐवजी भोगाला अतोनात प्राध्यान्य मिळाले होते. सर्वत्र भोगलोलुप राजांच्या अन्यायाला जनता कंटाळली होती. अशा परिस्थितीत कृष्ण जन्म झाला.

कंसाने आपल्या मेहुण्याला वासुदेवाला कैदखान्यात ठेवले होते. कारण देवकीला होणारा आठवा पुत्र कंसाचा वध करुन यादव आणि वृष्णि कुलांचे रक्षण करणार होता. म्हणून देवकीने जन्म दिलेल्या सहा बालकांचा दुष्ट कसांने निर्घृणपणे वध केला. देवकीच्या सातव्या गर्भाचे वसुदेवाच्या दुसऱ्या पत्नीच्या रोहिणीच्या ठिकाणी आकर्षण झाले. देवकीचा पुत्र रोहिणीने वाढविला. बलराम म्हणून तो नंतर प्रसिद्ध झाला.

श्रावण महिन्यातील वद्य अष्टमीला मध्यरात्री देवकीने आपल्या आठव्या पुत्राला जन्म दिला. वसुदेवाने या आठव्या बालकाला युक्त्या-प्रयुक्त्या करुन सुरक्षितपणे नंदराजाच्या हवाली केले व तो तातडीने नुकत्याच जन्मलेल्या गोप-बालिकेला घेऊन मथुरेत स्वस्थानी परत आला. देवकी प्रसूत झाल्याची वार्ता कळताच तो कंस त्वरेने बालकाला ठार मारण्यासाठी तुरुंगात आला. आपला काळ आपल्या भीतीने कन्यारुपाने जन्माला आलेला पाहून त्याने सुटकेचा निश्वास टाकला. आकाशवाणी असत्य झाल्याच्या आनंदात त्याने जन्मलेल्या मुलीकडे दुर्लक्ष केले. कन्या त्याच्या हातातून सुटली.

अशा प्रकारे बलराम व कृष्ण दोघेही वाढत होते. कंसाचा काळ मथुरेत नंद-यशोदाच्या घरात सुखरुप होता!. भगवंताने आपले बालपण गोकुळातच घालविले. त्याच्या पदकमल स्पर्शाने गोकुळाची समृद्धी वाढू लागली. श्रीकृष्ण हळूहळू वाढू लागला. त्याच्या रुप-सौंदर्याने सर्वांना मोहिनी घातली होती. ''कर्षति इति कृष्ण:'' किंवा ''कर्षणात् कृष्ण:'' असे म्हटले जाते. आपल्या मनोहारी रुपाने तो स्वत: सर्वांचे मन आकर्षित करीत होता. त्यामुळे गोकुळातील गोप-बालक मोहित होऊन त्याच्या मागे फिरत. यामुळेच त्याला पुढे या बालकाचे नेतृत्व करायला करायला लागले. संपूर्ण गोकुळचा



तो लाडका नेता झाला.

भगवंताने एवढ्या लहान वयात लोकांच्या हृदयात स्थान मिळविले ते केवळ या असामान्य सौंदर्याने व लोकप्रियतेने नव्हे. याचे मुख्य कारण कृष्णाचे गुण, त्याची उदारता. तो स्वत:चे श्रेष्ठत्व विसरुन लोकांत मिसळला गेला होता. एकरुप झाला होता. भेदा-भेद त्याला अखेरपर्यंत शिवला नाही. त्याची निराभिमानी वृत्ती हेच त्याच्या यशाचे गमक होते. गोकुळच्या नंद राजाचा पुत्र असूनही गरीबात गरीब गोप-मित्रांच्या सहवासात रमत असे. त्यामुळे त्या सर्वांना वाटे की हा आपल्यातीलच एक आहे. लोकांचे हृदय जिंकायचे असेल तर त्यांच्या हृदयात त्यांचा बनून प्रवेश केला पाहिजे. सहानूभूतीपूर्वक लोकांच्या हृदयात डोकावल्याशिवाय व हृदयाचे प्रेम अर्पण केल्याशिवाय लोकांचे हृदय जिंकता येत नाही.

पुढच्या काळात जे प्रचंड यश श्रीकृष्णाने प्राप्त केले ते या लोकशक्तीवरच. अत्यंत निरपेक्ष भावनेने परोपकार व कोणतीही फलापेक्षा न करता कर्तव्य भावनेने केलेली कर्म तत्परता हे श्रीकृष्णाच्या पुढील संपूर्ण जीवनाचे तत्वज्ञान आहे. हीच नीती वापरून त्याने लोकोद्धार केला.

राजा परीक्षीताने शुकदेवाला विचारले, ''लोक स्वत:च्या बालकांपेक्षाही कृष्णावर अधिक प्रेम का करीत ?'' तेंव्हा शुकदेव उत्तरले, ''कृष्णाला लोक स्वत:चाच आत्मा समजत. त्यामुळे तो सर्वांचा होऊन राहात होता. अर्थात त्याला स्वत:ला विसरुन लोक पहात होते.'' भगवंताने विविध रुपात अनेक अवतार घेतले आहेत. पण श्रीकृष्ण म्हणजे मूर्तिमंत प्रेम.

बालवयात त्यांनी दाखविलेले शौर्य व निर्भयता हा कृष्णाच्या जीवनाचा अविभाज्य भाग ठरला. त्याच्या बालपणातच या श्रेष्ठतेचे अनेक पुरावे आपल्याला मिळतात. पुतना मावशीला मारले व कालयवन नागाच्या नाकात वेसन घातली. तरीही स्वत:च्या शौर्याबद्दल कधीही गर्व बाळगला नाही. उलट तो लोकात जाऊन बसे, लोकांच्या समस्या आस्थेने विचारी व समरस होऊन जाई. त्याची ही निराभिमानता हेच त्याच्या अलौकिक लोकप्रियतेचे मुख्य कारण होते.

श्रीकृष्णाने गोकुळातल्या आपल्या सर्व सवंगड्यांना एकत्र घेऊन जी

संघ भावना निर्माण केली त्याला तोड नाही. या संघ भावनेच्या बळावरच त्याने मोठ-मोठी कामे केली. पूर्वापार चालत आलेल्या चालीरिती रुढी या बदलण्यासाठी त्याला ही संघभावना उपयोगी पडली. स्वत: श्रीकृष्ण निरोगी सुदृढ, बलवान असा होता. गोकुळातल्या मुलांना या क्रीडांचे वेड त्याने लावले. सुदृढ शरीर असेल तर सुदृढ मन असते तरच जीवनात आनंद असतो. उत्साह, आनंद यासाठी क्रीडा हा मंत्र आपल्या सवंगड्यांना दिला.

म्हणूनच कृष्णाचे बालजीवन म्हटले की प्रथम आठवतात ते गाईंचे कळप, ती कृष्णाची बासुरी व गवळ्यांच्या मुलांची खेळण्या-बागडण्याची दृश्ये. ''शरीरमाद्यं खल धर्मसाधनं'' या उक्तीप्रमाणे कृष्ण स्वत: वागला व सवंगड्यांना त्याचा मंत्र दिला. 'रसो वै स:'' कृष्णाच्या जीवनात सर्व रसांचा, सोळा कलांचा पूर्ण विकास झाला होता. म्हणूनच कृष्णाला पूर्णपुरुष, पूर्णवतार अशा बिरुदावल्या लाभल्या. या जीवनाकडे भावनेने पाहिले की आपल्यातील आप-परभाव, स्वार्थ, आत्मकेंद्रीत वृत्ती निघून मैत्रभाव, प्रेम, करुणा, नि:स्वार्थता येते हे त्याने स्वत:ही जगून दाखविले.

खेळणे झाले की भूक लागते. पण सकस अन्न आपल्या गरीब, सामान्य घरातल्या मुलांना कसे मिळणार याची चिंता बाळकृष्णाला असायची. गोकुळातल्या सर्व बालकांना दही, दूध, लोणी मिळालेच पाहिजे असा त्याचा भाव होता. याच आक्रंदनातून त्याच्या मनात विचार आला की, जर मिळत नसेल तर जुलुमाने किंवा चोरी करुन हस्तगत करायचे. कारण दही, दूध मिळणे हा छोट्या मुलांचा हक्क आहे. केवळ दूधाची संपूर्ण विक्री करुन गवळी केवळ पैसा मिळवितात त्यामुळेच सकस अन्नाच्या कमतरतेमुळे हे सवंगडी, दुबळे, अशक्त आहेत अशी कृष्णाची धारणा होती.

म्हणून श्रीकृष्ण दही-लोणी चोर म्हणून प्रसिद्ध झाला. वास्तवीक तो नंदराजाचा मुलगा. त्यामुळे त्याला कशाचीच कमतरता नव्हती. पण मला जे मिळते ते सर्वांनाच मिळाले पाहिजे.

हे समतेचे, बंधूभावाचे नीतीतत्वज्ञान त्याला स्वत:च्या अनुभवातून, सहवेदनेतून मिळाले होते. आयुष्यभर हेच तत्वज्ञान त्याने निष्ठेने जपले. जीवनाच्या सर्व थरांचा अनुभव त्यांनी अगदी जवळून घेतला होता. त्यामुळेच



संकुचितपणाचा स्पर्श त्याच्या तत्वज्ञानाला कधीच झाला नाही. म्हणूनच गरीब, सामान्य गवळ्यांच्या पोरात तो त्यांचाच होऊन राहिला.

भगवंताला अन्यायाबद्दल मनस्वी चीड होती. म्हणून जिथे जिथे अन्याय होत असेल तेथे तेथे तो त्यावर सर्वशक्तीनिशी तुटून पडे. निर्भयता, अभय हे तर त्याच्या रक्तातच होते. यामुळेच गीतेमध्ये सुद्धा १६ व्या अध्यायात २६ दैवी गुणांचे वर्णन करताना ''अभय'' म्हणजे निर्भयतेला त्यांनी सर्व दैवी गुणात प्रथम स्थान दिले. गोकुळ वासियांची पाप भिरुवृत्ती टाकून देऊन, निर्भयतेने अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्ती वाढावी म्हणून कृष्णाने त्यांना प्रवृत्त केले, त्यांच्यात आत्मप्रत्यय निर्माण केला. बिजीगीषु वृत्ती निर्माण केली. ते ही या बालवयात ! निर्भयता व नीडरता या गुणांमुळे त्यांनी या बालपणातच असूरी शक्तीचा नाश करण्याचा वीडा उचलला. केशी, कालिया, पुतना, अधासूर अशा असुरांच्या छळामुळे गोकुळवासीय हवालदिल झाले होते. अन्याय, अत्याचारांना बळी पडत होते. श्रीकृष्णाने या वयात गोकुळवासी यांच्या मनात अन्यायाची चीड निर्माण केलीच पण त्यांच्यात सुप्तावस्थेत असलेल्या अस्मितेला, विजीगीषु वृत्तीला जागे केले. जर हे असूर तुमच्या वधासाठी तत्पर झाले असतील तर तुम्ही सुद्धा सर्वशक्तीनिशी त्यांचा प्रतिकार केला पाहिजे असे आवाहन त्यानी केले. त्यामुळे त्यांनी आपले दौर्बल्य सोडून असुरांच्या प्रतिकारासाठी शस्त्रे हातात घेतली. त्यामुळे साहजिकच श्रीकृष्णाला असुरांचा वध करणे सोपे झाले.

सज्जनांचे रक्षण करण्यासाठी त्यांच्यातील अस्मितेला जागे करुन आत्मप्रत्ययाची जाणीव करुन देण्याचे काम, भगवतांनी आयुष्यभर केले पण त्याची सुरुवात, या बालवयात गोकुळवासीयांकडून झाली.

ही एकप्रकारे क्रांतीच होती. थोडा मोठा झाल्यानंतर कंस, जरासंध, शिशूपाल या अत्यंत दुष्ट अशा राजांचा वध करताना त्याने हीच नीती वापरली. लोकांत कंसाबद्दल मनस्वी तिरस्कार होता या सर्व पापी, अन्यायी राजाच्या कंटाळलेल्या प्रजेला जागृत केले. नवी संजीवनी दिली. ज्यावेळी जनमत जागृत व्हायचे तेंव्हा श्रीकृष्ण आपल्या सर्व शक्तीनिशी व युक्त्या-प्रयुक्त्यांनी त्यांच्यावर हल्ला करुन त्यांना ठार करायचा. अधर्माशी लढून

धर्मस्थापना करायचा. हेच त्याच्या जीवनाचे ध्येय होते.

बालवयात असतानाच लोकांचे नेतृत्व करण्याची जबाबदारी कृष्णासारख्या नि:स्पृह, निराभिमानी व नि:स्वार्थ अशा नेत्यावर पडली या त्याच्या लोकप्रियतेचा फायदा त्याने समाजात पूर्वापार चालत आलेल्या अनिष्ठ रुढी बदल करण्यात करुन घेतला. गोवर्धनपूजा हे त्याचे एक प्रातिनिधीक उदाहरण.

इंद्रपूजा ही गोकुळवासीयांची एक परंपरागत रुढी होती. गतानुगतिक चाललेली ही पूजा बंद करण्याचे श्रीकृष्णाने ठरविले. कृष्णाने लोकांना समजावले. ''तुम्ही दूर राहणाऱ्या इंद्राची पूजा का करता ? इंद्राने आपल्याला काय दिले ? आपण गोवर्धनाची पूजा करुया.'' लोकांनी ते मान्य केले व इंद्रपूजा सोडून गोवर्धन पूजा सुरु केली.

तशी ही घटना सामान्य नाही. राजनीती करीत असतांना, लोकमानसावर प्रचंड प्रभाव असेल, तरच ती यशस्वी होते. कृष्णाला ते सतत यश लाभत गेले ते कोणत्या चमत्कारामुळे नव्हे तर त्याच्या या लोकप्रियतेने. म्हणूनच सात पिढ्यात चालत आलेली परंपरा लोकांनी तात्काळ सोडून दिली. श्रीकृष्ण जेंव्हा असे पराक्रम करीत होता तेंव्हा त्याने कौमारावस्थेत प्रवेश केला आणि या अवस्थेत त्याची प्रज्ञा प्रगल्भ होती. आता त्याचे पराक्रम केवळ बाल्यावस्थेतील राहिले नाहीत बाल्यावस्थेतले ते पराक्रम आता राज्य व राजे यांना बदलणारी नीती ठरत होती.

कंस, जरासंघ अशा राजांना सुद्धा वचक बसेल अशी त्याची लोकप्रियता होती. त्यामुळे भीतीने त्यांनी कृष्णाला नामोहरम करण्याचे ठरविले. यासाठी दोनच मार्ग होते. एक गोकुळवर चढाई करायची व दुसरा श्रीकृष्णाला मथुरेत बोलावून कुस्ती खेळून त्यात तो मेला असे दाखवायचे. कंसाने हा दुसरा मार्ग पत्करुन आपल्या विनाशाला निमंत्रण दिले.

श्रीकृष्णाला मारण्याच्या सर्व योजना तयार झाल्या. अक्रूर सारख्या सर्वमान्य माणसाला, श्रीकृष्णाला पाचारण करण्यासाठी पाठविले. धनुष्ययाग नावाच्या महायज्ञाचे आमंत्रण बलराम व कृष्णाला देण्यासाठी अक्रूर गोकुळात पोहोचला.



निमंत्रणानुसार श्रीकृष्ण मथुरेला आला. मथुरेची जनता देखील श्रीकृष्णाला आपला मानीत होती. कंसावरचा असंतोष असल्यामुळे जनता चिडून होती व श्रीकृष्ण मथुरेला आला तेंव्हा त्याचे वय साधारणत: चौदा वर्षाचे होते. पण गोकुळ सोडले ते पुन्हा परत गोकुळात जाण्यासाठी नव्हे तर भावी क्रांतीची सुरुवात मथुरेपासून करण्यासाठी.

श्रीकृष्ण लहानपणापासूनच राजनीतीनिपुण होता. आता त्याच्या मुत्सद्दीपणाला व बुद्धीला प्रचंड क्षेत्र लाभले होते. मथुरेला पोहोचतात श्रीकृष्णाने एकामागून एक असे पराक्रम करायला सुरुवात केली.

शत्रूचा मुख्य युद्धापूर्वी आत्मविश्वास डळमळीत करणे व त्याचे मानसिक खच्चीकरण करणे ही कृष्णाची रणनीति होती. म्हणून कंसाने जेंव्हा ऐकले की, जे धनुष्य कोणी उचलू शकत नाही ते कृष्णाने सहजतेने उचलून त्याचे तुकडे तुकडे केले तेंव्हा कंसाचे अवसान गळाले, त्याचा आत्मविश्वास डळमळीत झाला. अक्रूराने कंसाची सर्व योजना कृष्णास समजावली होती. राजसभेत प्रवेश करताच दारु पाजून मदोन्मत बनवलेला हत्ती सामोरा आला. सावध श्रीकृष्णाने त्या हत्तीचा वध केला व वीराप्रमाणे सभेत प्रवेश केला. त्यानंतर श्रीकृष्णाला मल्लयुद्धासाठी मुष्टिर व चाणूर यांनी आव्हान दिले. दोघेही सामोरे आल्यानंतर श्रीकृष्णाने एकाच घावात चाणूराला यमसदनी पाठविले. हे पाहून कंसाने क्रोधाने कृष्णाला बाहेर काढण्याचे फर्मान सोडले पण तत्क्षणीच कृष्णाने कंसाचेच केस पकडून त्याला सुनावले, ''हे राज्य तुझे एकतंत्री राज्य नाही. हे संघराज्य आहे. हा जुलूम चालू देणार नाही.'' असे म्हणून आपल्या मामाशी युद्ध सुरु केले या युद्धात भाच्याने आपल्या सत्तालोलुप, उन्मत्त, अत्याचारी कंसाला ठार मारले. कंसाच्या अत्याचाराला सर्वजण बळी पडले होते. श्रीकृष्णाचा कोणीच विरोध केला नाही. वसुदेव, उग्रसेन व अक्रूर यांच्या आनंदाला पारावर राहिला नाही. श्रीकृष्णाने उग्रसेनाला पुनश्च त्याचे राज्य दिले. सर्वांनी श्रीकृष्णाला मथुरेचा राजा बनण्याचे आवाहन केले. श्रीकृष्ण म्हणाला, ''राज्यलोभामुळे मी हे युद्ध केले नाही. मी लोकांसाठी हे केले आहे. हे राज्य उग्रसेनाचे असल्यामुळे राज्याची सूत्रे मी त्यांच्या हाती सोपवतो.''

एवढ्या लहान वयात मथुरेचे राज्य हाती येऊन सुद्धा कोणताही मोह न बाळगता अत्यंत संयमाने व अनासक्तीने उग्रसेनाला यथोचित न्याय दिला. कृष्णाची राजनीती, मुत्सद्दीपणा याचा हा विजय होता. त्याच्या न्यायप्रिय, आदर्श वर्तनाने त्याने मथुरेच्या जनतेच्या हृदय सिंहासनावर मात्र आपले नाव कोरले.

कंसाचा वध करुन कृष्णाने जरासंघाचा मात्र रोष ओढवून घेतला. कारण कंस हा महापराक्रमी राजा जरासंघाचा जावई होता. त्यामुळे दुसऱ्या युद्धाला आता तोंड फुटले होते. कृष्णाच्या दूरदृष्टीला आता जरासंधाच्या आक्रमणाचे मेघ दिसू लागले.

कंसाने आपल्या पित्याला तुरुंगात बंदी बनवून जरासंघाच्या सल्याने व सहकार्याने राज्य आपल्या हाती घेतले होते. अशा क्रूर राजाने वसुदेव-देवकीलाही तुरुंगात टाकले होते. आठवा गर्भ आपला काळ बनून येणार म्हणून सर्वांची हत्या करुन टाकली. कंस आपल्या पापकृत्यांनीच कृष्णाकडून मारला गेला. पण जरासंघ व इतर त्याला मानणाऱ्या राजांना भीती वाटली की उद्या कृष्ण आपला अशा प्रकारे नाश करील. अशा सर्व राजांच्या सहकार्याने मथुरेवर फार मोठे आकमण केले. निष्ठावान व दैवी विचारांचे मथुरेतील अल्पसंख्याक सैनिक व दुसऱ्या बाजूला मद, मत्सर, द्वेष यांनी भरलेले जरासंघाचे सैन्य. श्रीकृष्णाने आपल्या संघटन कौशल्याचे व लोकजागृतीचे दर्शन घडविले. मनापासून लढलेल्या सैनिकांनी जरासंघाला पळवू लावले.

जरासंघाने एकूण सतरा वेळा मथुरेवर आक्रमण केले व श्रीकृष्णाच्या अधिपत्याखाली ते परतून लावले. जरासंघाच्या जोर त्याच्या पक्षातील हंस व डिंभक यांच्यावर होता. म्हणून चतुराईने त्या दोघांना आधी मारुन टाकले. हंस व डिंभक यांच्या मृत्युमुळे जरासंघाने धास्ती घेतली व त्याचे सैन्यही हिंम्मत हारले. मथुरावासीयांनी सतरा वेळा अशा सैन्यांबरोबर सामना केला. जरासंघाने पुन्हा सर्व तयारीनिशी शेवटचे अठरावे आक्रमण केले. आता मात्र वारंवार झालेल्या आक्रमणाने मथुरावासीयांचे जनजीवन पार उखडून गेले होते. त्यामुळे यादवांची भौतिक शक्ती पार उधळून गेली होती.



कृष्णप्रेमाने भारावलेले लोक कृष्णाच्या पाठीशी होते पण कांही यादव मात्र नाईलाजाने कृष्णाला या सत्यपरिस्थितीची जाणीव करुन देत होते. याचा परिणाम असा झाला की, श्रीकृष्णाच्या पित्याने-वसुदेवांनी सुद्धा या विचारांना पाठींबा देत कृष्णाला वस्तुस्थितीची जाणीव करुन दिली.

त्यामुळे जरासंघाच्या आक्रमणाचे आपणच मुख्य कारण आहोत म्हणून, आपणच मथुरा सोडून गेले पाहिजे असा दृढ विचार झाला. सर्वांच्या प्रेमाबद्दल कृष्णांनी सर्वांचे आभार मानले. त्याने यादवांची दुसरी वसाहत निर्माण करण्याचा निर्णय घेतला.

इकडे जरासंघाने कालयवनाला मदतीला घेऊन मथुरेवर पुन्हा आक्रमण केले. श्रीकृष्णाने तात्काळ विचार केली की, कालयवन स्वत:च्या सैन्यानिशी आपला पाठलाग करील तेंव्हा आपण लढल्याशिवाय पलायन करावे. त्यामुळे मथुरा युद्धाच्या आपत्तीतून वाचेल.

ही कृष्णाची युद्धनीतीच होती. कोणत्यावेळी यशस्वी माघार घ्यायची असा निर्णय घेण्याची त्याची विचारशक्ती अद्‌भूत होती. कृष्णाने हे पलायन केले म्हणून त्यावर टीकाही करण्यात येते. पण कृष्णभक्तामध्ये कृष्णाचे हे रणछोडदास नाव अतिशय भक्तिभावाने घेतले जाते. पण अत्यंत अचूक क्षणी घेतलेल्या या निर्णयामध्ये, मथुरावासीयांचे कल्याण तर होतेच पण भावी काळात जरासंघाची युद्ध करुन त्याला ठार करण्याची योजना कृष्णाच्या मनात होती.

श्रीकृष्ण यादवसेनेबरोबर गिरनार पर्वत ओलांडून सौराष्ट्रमधल्या काठियावाडीमध्ये तिथलाच रहिवासी म्हणून राहतो. तेथे सौराष्ट्रात प्रभास पाटणपासून वीस मैलावर असलेल्या एका स्थळी तो द्वारकापुरी सुवर्णनगरी वसवितो.

नवनिर्माण करण्याची क्षमता असल्यामुळे दूरदृष्टीने स्वत:चे म्हणून राज्य निर्माण केले. इतर राजांप्रमाणे वंशपरंपरागत आलेले हे राज्य नव्हते. तेथे त्याने यादवांची नवीन वसाहत वसविली.

आजही श्रीकृष्णाच्या या द्वारकानगरीच्या अस्तित्वाच्या खाणा-खुणा, अवशेष समुद्राच्या तळाशी दिसतात.

युद्ध क्षेत्रावरील दाखविलेल्या या युद्धनीतीमुळे, कृष्णाचे युद्धतंत्र, दूरदृष्टी, निराश न होता. अधिक आशादायी होऊन नवनिर्माण करणारा, बुद्धिमान सेनापती म्हणून नावाजला गेला. पुढे घडणाऱ्या महाभारताच्या युद्धात कृष्णाने याच युद्ध नीतीचा पुरेपुर वापर केला.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**





# कृष्णनीती २

प्रकरण ४

# कृष्णनीती २

## श्रीकृष्ण - मूर्तिमंत - राजनीती

महाभारत युद्धापूर्वी श्रीकृष्ण गृहस्थाश्रमात प्रवेश करतात. द्वारकानगरी वसविली. आता तो तरुण झाला होता. त्या काळातील कोणीही राजाने त्याला जावई म्हणून वरले असते. वसुदेव-देवकी यांनाही आता कृष्णाच्या विवाहाची काळजी लागली होती. अशा वेळी फक्त एक उत्तम सुवर्णयोग आला. भीष्मंक राजाची मुलगी रुक्मिणी ही कृष्णाला सर्वार्थाने अनुरुप होती. तिने मनोमन कृष्णाला आधीच वरले होते. राजाची मुलगी म्हणून येणाऱ्या जाणाऱ्या थोरा-मोठ्यांकडून कृष्णाच्या अवर्णनीय रुपाचे, गुणांचे, शौर्य-कर्तृत्वाचे वर्णन तिने ऐकले होते.

परंतु भीष्मक जरासंघाचा विचार आश्रित होता व त्याचा पुत्र रुक्मि जरासंधाचा जिवलग मित्र होता. त्यामुळे रुक्मिचा या लग्नाला विरोध होता. पण भीष्मक सात्विक वृत्तीचा राजा होता. त्याच्या मनात कृष्णाविषयी आदरच होता. कारण तो राजा जरी नसला तरी राजा बनवणारा होता.

पण जरासंधाला रुक्मिणीचे लग्न शिशुपालाशीच झाले पाहिजे असा होता. अशा परिस्थितीत श्रीकृष्ण स्वयंवरासाठी तेथे जातो. पण त्याला पाहून रुक्मि ते स्वयंवरच रद्द करतो. यामुळे सर्वराजांच्याप्रमाणे तो ही द्वारकेला परततो.

रुक्मिणीला आपला भाऊ रुक्मि व जरासंध यांच्या श्रीकृष्ण-विरोधाची कल्पना येते. त्यामुळे खूप विचार करुन श्रीकृष्णाला प्रेमपत्र लिहायचे ठरविते. बहुतेक जगाच्या इतिहासातील ते पहिले प्रेमपत्र असावे. या पत्रात ती आपले मन प्रकट करते. श्रीकृष्णाला शेवटी आवाहन करते की, देवदर्शनाच्या निमित्ताने मी मंदिरात आले असता, सर्वांसमक्ष तुम्ही मला घेऊन जावे. रुक्मिणीहरण कसे करावे याची संपूर्ण योजना तिने या पत्रात लिहिली.

श्रीकृष्णानेही रुक्मिणीच्या सौंदर्याचे व गुणांचे वर्णन ऐकलेले होते. कृष्णाने रुक्मिणीला या धर्मसंकटातून वाचवायचे ठरविले. त्याप्रमाणे सर्वांसमक्ष श्रीकृष्ण तिला उचलून घेऊन जातो. श्रीकृष्ण द्वारकेला येतो. नंतर मोठ्या थाटामाटात दोघांचे लग्न होते.

'रुक्मिणी–स्वयंवर' व 'रुक्मिणीचे प्रेमपत्र' या विषयावर कवी–लेखकांनी काव्ये–नाटके लिहून भक्तांना रिझविले आहे.

या विवाहानंतर श्रीकृष्णाच्या जीवनात एक महत्त्वाची घटना घडली. नरकासुराने प्रागज्योतिष राज्यातील शेकडो तरुणींना स्वत:च्या राजमहालात बंदिवान करुन ठेवले होते. श्रीकृष्णाने तेथे जाऊन नरकासुरचा वध केला व त्य सर्व युवतींना बंदिवानातून मुक्त केले. नरकासुराचा पुत्र भगदत्त याला राजसिंहासनावर बसवून श्रीकृष्ण द्वारकेला परत आला.

गृहस्थाश्रमात स्थिरस्थावर झाल्यावर कृष्णाच्या, मनात धर्मसंस्थापनाचे विचार येवू लागले. सज्जनांच्या रक्षणासाठी दैत्य–दानवांचा नाश केला. पण या अधर्माचा नाश करुन धर्मस्थापनेचे मुख्य काम राहून गेले होते. हेच आपले ध्येय आहे याची जाणीव सतत होतीच. पण त्याची कार्यवाही होण्यासाठी नियतीने कोणते साधन द्यायचे आहे याचा शोध कृष्णाने घ्यायला सुरुवात केली.

काही दिवसातच या धर्मसंस्थापनेच्या कार्याची दिशा श्रीकृष्णाला मिळाली. या पुण्यकार्यात कृष्णाने पांडवांनाच साधन म्हणून निवडले. पांडव सर्व दृष्टीने सत्प्रवृत्त होते. न्यायी, त्यागी होते आणि पांडव सुद्धा श्रीकृष्णाच्या न्यायी व दुर्जनांचा नाश करण्याचे जीवित कार्य समजणाऱ्या व्यक्तिमत्वावर प्रसन्न होते. शिवाय कुंतीमातेशी तर कृष्णाचा आत्या–पुतण्याचा संबंध होता.

पण हा संबंध दृढ झाला तो द्रुपदाच्या राज्यसभेत द्रौपदीच्या स्वयंवराच्या निमित्ताने अनेक राजे त्यात भाग घेण्यासाठी आले होते. या स्वयंवरात पाच ब्राह्मण वेषधारी तरुण हजर होते. श्रीकृष्ण ही तेथे आला होता. त्या काळात पांडव गुप्त वेशात फिरत होते.



या प्रसंगानंतरच महाभारत अधिकाधिक दिव्य व तेजस्वी बनत गेले. कृष्णाची अलग अलग रूपे त्यात आहेत. कृष्णाची राजनीती, त्याची चतुराई, मुसद्दीपणा, समयसूचकता व दूरदृष्टी अशा अनेक पैलूंचे दर्शन या द्रौपदी स्वयंवरात व त्यानंतर घडणार आहे. त्याच्या विविध गुणांचे दर्शन या सर्व प्रसंगातून मिळणार आहे. या गुणांचा अभ्यास म्हणजेच कृष्ण–चरित्र. कृष्णाची राजनीती समजण्यासाठी हे गुणदर्शन मोलाचे ठरते.

द्रौपदी–स्वयंवराच्या निमित्ताने अर्जुन श्रीकृष्णाचा सखा बनला. सुहृद असावा तर कृष्णासारखा गुरु असावा कृष्णासारखा, सारथी असावा. कृष्णासारखा .... अशा अनेक रुपांचे दर्शन महाभारतातल्या प्रमुख घटनांवरुन घेण्याचा हा प्रयत्न आहे. महाभारत कथा, ग्रंथ, काव्य, नाटक, सिनेमा, दूरदर्शन वरील मालिका इ. माध्यमातून आपण पाहात आलो आहे. या ग्रंथात ही सर्व कथा विस्तृतरुपाने मांडणे हे अशक्य आहे. पण कृष्णनीतीची सर्व ठळक वैशिष्ट्ये ज्या ज्या घटनांतून न्याहाळता येतात त्या त्या सर्व घटनांचे विहंगावलोकन आपण करणार आहोत.

या स्वयंवराच्या घटनेपासून ही सुरुवात होत आहे. पंडूचा मृत्यू झाल्यानंतर धृतराष्ट्र राजा झाला. धृतराष्ट्र खलपुरुष होता त्याचे पुत्रही त्याच वृत्तीचे होते. नीतीनुसार व न्यायानुसार सर्व राज्य युधिष्ठिराला दिले पाहिजे असे धृतराष्ट्राला भीष्म, द्रोण असे सर्वजण सांगतात तेव्हा धृतराष्ट्राने सल्ला दिला की, पांडवांचे आपल्या मुलांबरोबर पटणार नाही. म्हणून राज्याचे विभाजन करुन दोन राज्ये निर्माण करावीत. गांधारीचा भाऊ शकुनीने धूर्त डाव टाकला. त्यानुसार कौरवांनी पांडवांना वनविहारासाठी वनगृहात राहण्याचा आग्रह केला. या घराला आग लावून सर्वांनाच भस्मसात करण्याचा कुटील डाव कौरवांनी रचला. त्याचवेळी हे कारस्थान विदुराला कळले. विदुरांनेच पांडवांना या धोक्याची कल्पना दिली. यामुळेच पांडव सहीसलामत अरण्यांतून बाहेर पडू शकले. जळून बाहेर निघालेल्या पांडवांचे तर लोकांनी श्राद्धही करुन टाकले. ते पांडव गुप्त वेशात स्वयंवराच्या वेळी द्रुपदाच्या सभेत दिसले. श्रीकृष्ण हे सर्व पाहत होता. त्याने पांडवांची भेट घेतली. या सर्वांना कृष्णाने केवळ सांत्वना दिली नाही तर त्यांना आत्मभान दिले. कृष्ण

म्हणाला,''धर्म व न्यायाचे राज्य स्थापण्यासाठीच तुमचा जन्म आहे. मी तुमच्यासोबत आहे. श्रीकृष्णाच्या या पाठिंब्यामुळे पांडव जीवनभर विदुर व श्रीकृष्णाच्या कृतज्ञतेत राहिले.''

स्वयंवरात अर्जुनाने मत्स्यवेध केला. व दुर्योधन-जरासंध यासारख्या उद्दाम राज्यासमोर द्रौपदीला जिंकले.

श्रीकृष्णाची या सर्व प्रसंगात एक दीर्घदृष्टी होती. पांडवांना द्रुपदाची शक्ती, यादवांचा पाठिंबा व संपत्ती यांचे पाठबळ मिळाल्यामुळे ते बलवान होणार होते. राजनीती व अर्थशास्त्र यांचा योग्य तो वापर त्याला धर्मकार्यासाठी करायचा होता. म्हणून कृष्णाची पावले आता त्या दिशेने पडू लागली.

या स्वयंवरात दोन महत्त्वाच्या घटना घडल्या. द्रौपदीच्या स्वयंवरासाठी आलेल्या कर्णाचा, 'सुतपुत्र' म्हणून, द्रौपदीने त्याला अपमानित करुन नाकारले. यामुळे दुर्योधनाने कर्णाला मदत करुन अंग देशाचा राजा व क्षत्रियत्व त्याला प्रदान केले.

पांडव द्रौपदीला जिंकून जेव्हा घरी आले त्यावेळी कुंतीमातेने नेहमीप्रमाणे आणलेली भिक्षा पाच जणात समान पद्धतीने वाटून घेण्यास सांगितले. पण कृष्ण वेळीच तिथे पोहोचला. त्याने सर्व परिस्थिती आपल्या बुद्धीकौशल्याने हाताळली. ही प्रारब्ध, नीयतीची योजना असून, ते सर्व पूर्वनियोजित आहे असे समजावले. काही निर्बंध, नियम घालून सर्वांना द्रौपदीचा व आपला स्वत:चा सन्मान राखावा असे सुचविले. पुढे द्रौपदीने पांडवांना सुखी करण्यासाठी सर्व प्रकारची दिव्ये पार केली. म्हणूनच महाभारताची नायिका म्हणून ती प्रसिद्ध झाली.

## शिशुपाल-जरासंध वध

धर्मराजाला राजसूय यज्ञ करण्याचा विचार आला. श्रीकृष्णाचा सल्ला व परवानगी घेण्यासाठी युधिष्ठिर कृष्णाकडे आला. कृष्णाच्या धर्मस्थापनेच्या कार्यात याची नितांत गरज होती. आपल्या राजनीती कौशल्याने कृष्णाने हे धर्मकार्य असून ते पांडवांनी आपल्या शौर्याने पूर्ण करावे असे समजावले. स्वत:च्या राज्यस्थापनेसाठी कृष्ण व अर्जुनाने खांडववनातील विस्तीर्ण



भूभाग घेऊन इंद्रप्रस्थ नगरी उभी केली.

या राजसूय यज्ञात सर्वांत मोठा अडसर जरासंघाचा होता. अन्यायाने व अधर्माने मगधाचे प्रचंड राज्य त्याने उभे केले. सैन्याची उभारणी केली अशा शक्तीशाली राजाविरुद्ध आपला टिकाव लागणार नाही. म्हणून धर्मराज भयभीत झाला होता. त्याने १८ वेळा मथुरेवर आक्रमण करुन श्रीकृष्णाला युद्धभूमी सोडून जाण्यास भाग पाडले होते. अशा जरासंघाशी युद्ध करण्याची धर्मराजाची तयारी नव्हती.

या धर्मसंकटातून कृष्णनीतीने वाचविले. भयभीत झालेल्या धर्मराजाला श्रीकृष्णाने समजावले, ''जरासंधासारख्या अत्यंत बलवान शत्रूशी सन्मुख होऊन युद्ध करु नये ही बुद्धिमानांची नीती आहे आणि हीच नीती मला योग्य वाटते. हीच खरी युद्धनीती आहे. माझ्याकडे नीती आहे. भीमाजवळ बळ आहे. आणि अर्जुन आम्हां दोघांचे रक्षण करणारा आहे. आम्ही तिघे मिळून जरासंधाला ठार करु. आमच्यापैकी भीमाशी युद्ध करण्यासाठी जरासंघ उद्युक्त होईल आणि या द्वंदयुद्धात तो ठार मारला जाईल.''

भीम-जरासंधाचे गदायुद्ध झाले. हे युद्ध चालू असताना श्रीकृष्णाने युक्तीच्या काही गोष्टी सांगितल्या. भीमाने आपल्या महाबलाने या युद्धात जरासंघाला ठार केले. जरासंघाचे शरीर राजभवनाच्या दारावर ठेवून त्या तिघांनी कैदखान्यात जाऊन बंदिवान राजांना मुक्त केले.

जरासंघवधानंतर युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञाचा मार्ग मोकळा झाला. सर्व दिशांना जाऊन अनेक राजांना त्यांनी आपल्या अधिपत्याखाली आणले. राजांनी प्रेमपूर्वक दिलेल्या धन-रत्नांच्या भेटी घेऊन ते सर्वजण इंद्रप्रस्थाला परतले.

राजसूय यज्ञातील अग्रपूजेचे कार्य तेवढे बाकी राहिले होते. पण जरासंघानंतर धर्मराजाला शिशुपालाचे मोठे भय होते. त्या अग्रपूजेचा मान श्रीकृष्णाला मिळाला. पण शिशुपाल आक्षेप घेतो की श्रीकृष्ण राजा नसताना राजोचित पूजेचा अधिकारी होऊ शकत नाही. धर्मराजाने शिशुपालाला समजवण्याचा प्रयत्न केला पण प्रयत्न व्यर्थ झाले. शिशुपालाचा काळ व वेळ भरत चालली होती. म्हणूनच भर सभेत शिशुपालाने युद्धाचे आव्हान दिले. श्रीकृष्णाने आपल्या सुदर्शन चक्राने शिशुपालाचा शिरच्छेद केला.

जरासंघ व शिशुपाल या दोघांचाही वध झाल्यानंतर श्रीकृष्णाने दोघांच्याही पुत्रांना राजगादीवर बसविले. दोघांच्याही मृत्यूनंतर देशोदेशांतील सर्व लहान मोठे राज्ये मंडलीक झाले. श्रीकृष्णाच्या मार्गदर्शनाखाली युद्ध न करता केवळ राजनीतीच्या कौशल्यामुळे धर्मराज्याची मुहूर्तमेढ रोवली. त्यानंतर श्रीकृष्णाने आपल्या द्वारकानगरीला प्रस्थान केले.

युधिष्ठिराच्या अधिपत्याखाली धर्मसत्तेचा उदय झाला व श्रीकृष्णाला जसा न्यायप्रिय, नीतीमान, प्रजाहितदक्ष राजा पाहिजे होता तसा राजा मिळाला, प्रजेलाही शांती-समाधानाचे व नीतीचे राज्य मिळाले. असुरी शक्ती मात्र संधीची वाट पाहत होती. केवळ नाईलाजाने धर्मराजाचे अधिपत्य त्यांनी स्वीकारले होते. द्वारकेला जाताना श्रीकृष्ण व वेदव्यास या दोघांनी या परिस्थितीची जाणीव करुन दिली होती. सावध राहण्याच्या सूचना दिल्या होत्या.

आणि झालेही तसेच. अत्यंत सद्‌गुणी राजाच्या समोर असुरी शक्तींनी कपटांनी आपले जाळे टाकायला सुरुवात केली. राजसूय यज्ञाच्या समाप्तीनंतर युधिष्ठिराचा निरोप घेऊन श्रीकृष्ण द्वारकापुरीत आले. तेव्हा पांडवांनी इंद्रप्रस्थ नगरी वसवायला सुरवात केली, तेव्हा कृष्णाने द्वारकेच्या संपत्तीतील आपला हिस्सा पांडवांना दिला. प्रत्येक प्रसंगी पांडवांना सर्व शक्तीनिशी बळ दिले. श्रीकृष्ण किती अनासक्त व वैराग्यपूर्ण होता हे त्याच्या अर्थनीतीवरुन समजून येते. पराभूत केलेल्या राजांच्या धनाची कधीही त्याने अभिलाषा केली नाही. स्वत:ला कोणतेही पद न घेता राज्ये त्यांच्या त्यांच्या पुत्रांच्या हवाली करुन मोकळे झाले.

द्वारकेत श्रीकृष्ण आपल्या राज्याच्या प्रशासनाची व्यवस्था करण्यात मग्न असताना धर्मराजाला मात्र मोठ्या धर्मसंकटाला सामोरे जावे लागले. सर्व अलौकिक गुण असताना सुद्धा केवळ एका दुर्गुणाने मनुष्यांचा सर्वनाश कसा होतो याची अनेक उदाहरणे इतिहासात आहेत.( शेक्सपीअरच्या सर्व उदात्त नायकांची चरित्रे अशाच प्रकारची आहेत.) धर्मराजाच्या अंगी एकच दोष होता. त्याला द्युत खेळण्याचे वेड होते. द्युत म्हणजे जुगारच. कौरवांना या गोष्टींची पुरती जाणीव होती. दुर्योधनाने कपटाने युधिष्ठिराला द्यूत खेळण्यास



बोलावले. शकुनीचे षडयंत्र त्यामागे होते. नीतीमार्गाने धर्मराजाला पराभूत करता येणार नाही म्हणून द्यूत खेळण्याचे कारस्थान रचले. त्यानुसार धृत्रराष्ट्राचे निमंत्रण धर्मराज कधीही अव्हेरणार नाही याची खात्री होती. कौरवांबरोबर द्यूत खेळणे हा अधर्म असूनसुद्धा धर्मराजा द्यूत खेळण्यासाठी आला. द्युत खेळणे हे अधर्म आहे हे तो जाणत होता. पण तो आला कारण पितृतुल्य धृतराष्ट्राचे निमंत्रण त्याला नाकारणे अवघड गेले. या खेळात तो हरला. सुरुवातीस राज्य पणाला लावले. मग स्वत:चे भाऊ व सर्वात शेवटी द्रौपदी पणाला लावली.

सर्व पांडव हताशपणे हे सर्व पाहात होते. दु:शासनाने द्रौपदीला अंत:पुरातून सभेत बळजबरीने आणले. तेथे असलेल्या सर्वांसमक्ष तो तीचे वस्त्रहरण करु लागला. अशा वेळी अगतिक होऊन ती कृष्णाचा धावा करु लागली. कृष्ण द्रौपदीचा खास सखा होता. तिची खात्री होती, की कृष्ण आपल्याला सोडवेल झालेही तसेच कृष्णाने अखंडपणे वस्त्रपुरवठा केला. शेवटी दु:शासन थकला. अखेरीस त्याने हे घृणास्पद कृत्य थांबविले. दुर्दैव म्हणजे पांडवांच्या सारखे द्रोणाचार्य, भीष्म, कर्ण, कृपाचार्य अशी मंडळीही निष्क्रीयपणाने हे सर्व केवळ पाहात होती. अखेरीस तेथे उपस्थित असलेल्या भीमाने भीमगर्जना केली की या लज्जास्पद व शरमेने माना खाली घालायला लावणाऱ्या निंद्य कृत्यास जबाबदार असणाऱ्या दुर्योधन, दु:शासन यांना यमसदनी पाठविल्याशिवाय स्वस्थ राहणार नाही.

द्युताच्या अटीप्रमाणे पांडव व द्रौपदी यांना बारा वर्षांचा वनवास भोगावा लागणार होता. व एक वर्ष अज्ञातवासही.

## श्रीकृष्ण-पांडव भेट

श्रीकृष्ण द्वारकेत असताना पांडवांच्या वनवासाचे वृत्त त्यांना समजले. म्हणून पांडवांना भेटण्यासाठी ते वनात गेले.

श्रीकृष्णाने युधिष्ठिराला नमस्कार करुन सर्वांसमोर अतिशय स्फूर्तीदायक सल्ला दिला. ते म्हणाले. ''दुर्योधन, कर्ण, दु:शासन, शकुनी या सर्वांचे रक्तपान भूमी करील. युद्धात त्यांच्या सर्व अनुयायांना व त्यांना

पाठिंबा देणाऱ्या सर्वांना परास्त करुन आपण सर्वजण युधिष्ठिराला पुन्हा सम्राट पदावर अभिषिक्त करु. ज्यांनी कपट नीतीने व धोका देऊन धर्मराजाला व पांडवांना दु:ख भोगावयास लावले. अशांचा वध केला पाहिजे. हे धर्म सांगतो, शास्त्र सांगतो.''

श्रीकृष्णाच्या या आवेशपूर्ण वक्तव्याने द्रौपदीने आनंदली. पण तिने आपली व्यथा कृष्णासमोर मांडली ती म्हणाली,''श्रीकृष्णा तू माझी लाज राखलीस, पण माझे सर्व पती माझे रक्षण करु शकले नाहीत. सर्व कौरवांनी माझी जी निर्भत्सना केली. कर्णाने माझा जो उपहास केला त्यामुळे मी खूप शोकाकुल झाले आहे.''

द्रौपदीच्या या धर्मयुक्त भाषणाने प्रसन्न होऊन श्रीकृष्ण भावी युद्धाच्या वेळी होणाऱ्या कौरवांच्या दुर्दशेची कल्पना द्रौपदीला देतो. सर्व प्रकारे दैवी गुणांचा, न्यायाचा व सत्याचा विजय होईल याची ग्वाही देतो.

द्युत प्रसंगी आपल्या अनुपस्थितीचे कारण सांगून श्रीकृष्ण म्हणाला, ''त्यावेळी मी जर हस्तिनापुरला असतो तर एक तरी द्युत खेळणे झाले नसते किंवा दुर्योधन जिवंत राहू शकला नसता, बांध नष्ट झाल्यानंतर पाण्याला रोकणे शक्य नसते तसे.

या सांत्वनापर वक्तव्यानंतर युधिष्ठिरांची आज्ञा घेऊन श्रीकृष्ण आपल्या राजधानीला परत गेले.

स्वत:च्याच हाताने उभ्या केलेल्या धर्मराजाचा नाश त्याच्या डोळ्यासमोर झाला. पण त्याने संयम सोडला नाही. कृष्णाच्या युद्धनीतीत याचेच महत्त्व आहे. शिशुपालाचे जसे शंभर पापे झाली व मगच त्याचा वध केला. शंभर पापे भरल्याशिवाय मी शिशुपालाचा वध करणार नाही असे वचन त्याने शिशुपालाच्या आईला दिले होते. युद्ध जरी असले तरी शास्त्र, नीती नियम पाळणारा तो योद्धा होता. अमर्याद शक्ती असूनही त्याचा वापर योग्य वेळी व योग्य ठिकाणी करण्याचे कौशल्य त्याच्यापाशी होते. थांबा व वाट पाहा ही त्याची युद्धनीती होती. म्हणूनच बारा वर्षे त्याने वाट पाहिली आणि पुनश्च 'हरि: ॐ म्हणत धर्मराज्याच्या स्थापनेखाली तेवढ्याच उत्साहाने सुरुवात केली.



श्रीकृष्ण म्हणजे प्रेम. द्रौपदीशी जसे सख्य होते तसेच अर्जुनाशी होते. त्याकाळच्या प्रथेप्रमाणे राजाचा पराभव झाला की, राजा आपल्या उपवर मुलीचा विवाह जेत्याशी करण्याची विनंती करत असे. त्याप्रमाणे त्याने सत्यभामेशी लग्न केले. रुक्मिणी क्षत्रिय होती. पण सत्यभामा वैश्य वर्णातील होती. तर जांबुवंती ही आदिवासी समाजातील होती. जांबुवंताने आपल्या कन्येशी विवाह करण्याची विनंती केली हे त्यामुळे जात-पात, वर्ण न मानणारा तो क्रांतीकारक होता. हे सर्व नाते संबंध जोडण्यासाठी त्याने कधीही आडकाठी केली नाही. बाल्यावस्थेत जसे गोकुळातील सर्व थरांच्या सर्व जातीतील मुलांशी समान वागणूक ठेवली तशीच गृहस्थाश्रमात प्रेमभावनेने आपली कर्तव्ये पार पाडली. गरीब, सर्वसामान्य जनतेसाठी कृष्णाचे प्रेम विलक्षण होते. कृष्णाच्या बासुरीच्या मधुर आवाजात गोपी घरदार विसरुन त्याच्या भेटीसाठी येत. रासलीलासंबंधी विविध मते जरी असली तरी सत्य हे की, जेव्हा गोपी कृष्ण प्रेमात बुडाल्या, तेव्हा कृष्णाचे वय अवघे दहा वर्षाचे होते.

'सुदामा-कृष्ण' या जीवलग मित्रांच्या प्रेमाची कथा कवी-लेखकांच्या काव्याचा विषय ठरली आहे. मित्रप्रेम असावे तर कृष्ण-सुदाम्यासारखे. सुदामा हा कृष्णाचा बालमित्र अत्यंत गरीब व सालस ब्राह्मण ! कृष्ण तर. द्वारकाधीश आर्थिक अडचणीमुळे त्याला कृष्णाची आठवण आली. कृष्णाला देण्यासाठी त्याच्याकडे केवळ पोह्यांची पुरचुंडी होती. कृष्णाचे वैभव पाहून विस्मयचकीत झालेल्या सुदाम्याला पोह्यांचा विसरच पडला. कृष्णाने ही गोष्ट बरोबर हेरली. आग्रह करुन ती कृष्णाने मागून घेतली. रुक्मिणीने व कृष्णाने ते पोहे आनंदाने खाल्ले. सुदामा काही दिवस कृष्णा बरोबर राहिला. कृष्णाने सुदाम्याची बडदास्त उत्तम ठेवली. असा राजेशाही पाहुणचार घेऊन जेव्हा तो घरी आला, तेव्हा सारेच काही बदलले होते. कुटूंबीय दागदागिन्यांनी मढले होते. घर, धन-संपत्तीने भरले होते. या सर्वांपेक्षा सुदामा मात्र मित्रप्रेमाने भारावून गेला होता. त्याला धन्य-धन्य वाटत होते.

हीच प्रेमनीती सर्वांना जखडून ठेवत होती. म्हणूनच ''कर्षाति इति कृष्ण:'' हे नामाभिधान सार्थ ठरले. जो आकर्षित करुन घेतो तो कृष्ण !

याच प्रेमनीतीमुळे अर्जुनासारख्या उत्तम शिष्याला, मित्राला आपली बहीण सुभद्रा हिने वर म्हणून अर्जुनाला निवडावे असे वाटत होते. आधीच असलेले सख्य, या नातेसंबंधामुळे दृढ करायचे होते. तसे ते आते-मामे भाऊ होतेच. पण यात अडचण होती ती बलरामाची. बलराम हा दुर्योधनाचा गुरु. गदा कौशल्य शिकवणारा. सुभद्रासारखी स्त्री आपली पत्नी व्हावी यासाठी दुर्योधन मनसुबे रचत होता. त्याला वाटत होते की, यात बलराम निश्चित मदत करेल. पण हे ओळखून श्रीकृष्णाने बलरामाला सर्व तऱ्हेने पटवून दिले की, सुभद्राला अनुरुप अर्जुनच आहे. इथे अर्जुनाने श्रीकृष्णाकडे बलरामाला सर्व तऱ्हेने पटवून दिले की, सुभद्रेला अनुरुप अर्जुनच आहे. इथे अर्जुनाने श्रीकृष्णाकडे वास्तव्यास असताना सुभद्रेला पाहिले होते. तिच्या सौंदर्याने अर्जुनाला सुद्धा भुरळ घातली होती. हे ओळखून श्रीकृष्णाने त्याला सुभद्रा ही आपली बहीण आहे, असे सांगून अर्जुनाने तीचे अपहरण करुन तिच्याशी लग्न करण्याचा सल्ला दिला. अर्जुनाने तसेच केले. दुर्योधन व बलराम यांच्यामुळे त्याला कोणताही धोका स्वीकारायचा नव्हता. सुभद्रा हरणाने संतप्त झालेल्या बलरामाला कृष्णाने समजावलं की, पुरुवंशासारख्या अलौकिक वंशाशी यादव-वंशाचे नाते संबंध जोडले तर, कोणाला वाईट वाटेल ? उलट क्षत्रियाला शोभेल असाच पराक्रम अर्जुनाने केला आहे.......... अशा भाषणाने कृष्णाने बलरामाचे मन जिंकले. त्याला ते पटले. त्यामुळेच सर्व पांडवांना भेटून, अर्जुन सुभद्रा यांचे लग्न यादवांनी थाटामाटात केले.

श्रीकृष्णाच्या या प्रेमनीतीने, अर्जुनासारखा योद्धा धर्मसंस्थापनेसाठी कायमचा मिळाला. पांडवांना आता द्रव्याची गरज होती. या विवाह निमित्तामुळे यादवांनी पांडवांना अमाप संपत्ती दिली. धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे पुरुषार्थ जसे श्रीकृष्णाने स्वत: अंगिकारले, तसेच चारी वर्णांचा स्वीकार करुन अभेदनीतीचा पुरस्कार केला. धर्मराज्याच्या स्थापनेसाठी या नीतीचा खूप उपयोग झाला. श्रीकृष्णाला याचसाठी पूर्णपुरुष म्हटले जाते.

## श्रीकृष्ण शिष्टाई

न्याय व नीतीने तेरा वर्षाचा वनवास पूर्ण करुन पांडव परत आले. वनवास भोगून परत आल्यानंतर त्यांचे राज्य परत द्यायचे असे ठरले होते.



पण कृष्णाला जाणीव होती की, कौरव दिलेल्या वचनाचे पालन करणार नाहीत. कौरवांशी युद्धकेल्याशिवाय आपल्याला आपले हक्क मिळणार नाहीत हे पांडवांनाही माहीत होते.

असे असूनसुद्धा पांडवांनी कौरवांशी बोलणी करुन काही तडजोड निघते हा हे पाहावे असे श्रीकृष्णाला वाटत होते. याप्रमाणे कृष्णाने पांडवांना सल्ला दिला.

हा सल्ला म्हणजे कृष्णाच्या युद्धनीतीचे दर्शन घडविणारी मोठी घटना आहे. कृष्णाला शांतिदूत म्हणून जायचे होते. पण ज्यांच्याशी आपण वाटाघाटी करायच्या त्यांच्या नीतीवर कृष्णाचा विश्वास नव्हता. ज्या युधिष्ठराला धर्मराज्यस्थापनेसाठी पुर्नस्थापित करायचे, त्यालाही शांततापूर्ण तोडगा काढायची इच्छा होती. इकडे धृतराष्ट्राने एक धूर्त खेळी खेळली. संजयाला संदेश घेऊन पाठविले. युधिष्ठिराच्या धर्म-स्वभावाची पुरती जाणीव असल्यामुळे युद्धाच्या भीषण परिणामांची कल्पना देऊन त्याला सल्ला दिला की, या नश्वरजगात या नश्वर भूमीसाठी लढणे, हे कोणाही सत्पुरुषाला शोभत नाही. धृतराष्ट्राचा हा संदेश ऐकून युधिष्ठिराचे हृदय न द्रवले तरच नवल. धृतराष्ट्राने आपणांस युद्धापासून वाचविले, अशीच त्याची भावना झाली.

यावेळी त्या जागी कृष्ण होता म्हणूनच हे सर्व षडयंत्र फसले. श्रीकृष्णाने संजयला धृतराष्ट्रासाठी संदेश दिला, ''तुझा संदेश उत्तम तत्वज्ञानाने भरला आहे. पण याची सर्वप्रथम सुरुवात तुझ्यापासूनच व्हावी.

संजय जे बोलला ती एक कुटील राजनीती होती. पण श्रीकृष्णाने आपल्या मुसद्दीपणामुळे याला उत्तर दिले व आपणही कौरवांच्या सभेला येत नाही असा निरोप दिला.

## श्रीकृष्ण शांतिदूत

पांडवांचा प्रतिनिधी म्हणून जरी गेला तरी शांतिदूत म्हणूनच त्याची भूमिका होती. स्वतंत्र प्रज्ञेने अचूक निर्णय घेणारा राजदूत असा तो प्रतिनिधी होता. कारण कौरवांच्या कुटिलनीतीला शह देण्यासाठी योग्य ती पावले

कृष्णाला उचलायची होती.

श्रीकृष्ण जेव्हा शिष्टाईला गेला तेव्हा दोन्हीही पक्षाचे राजे तेथे हजर होते. पण कौरव पक्षाच्या राजांना कृष्णाचे एकतंत्री राज्यव्यवस्थेबद्दल असणारा प्रखर विरोध माहित होता. कंसवध करुन ''राजा या इहलोकातही दंडनीय आहे.'' हे कृष्णाने दाखवून दिले होते. म्हणून कौरवांचे राज्य टिकावे यासाठी असे राजे कौरवांचा जयजयकार करीत होते. उघडउघड हा कृष्णालाच विरोध होता.

अशा परिस्थितीत कृष्णाने आपल्या वाक्चातुर्याने सर्व सभेला पांडवांच्या शक्तीची पुरेपूर कल्पना दिली. जर युद्ध झाले तर पांडवांचाच विजय होईल याची खात्री दिली. वनवासात तेरा वर्षे काढल्यामुळे पांडव हतबल व निराश झाले असतील अशी कौरवांना खात्री होती, म्हणून कृष्णाला हे सांगणे भाग पडले. कृष्णाची सावधनीती एवढी पक्की होती की, कौरवांच्या अन्नाला स्पर्श न करता स्वत: आणलेल्या अन्नधान्याचा त्याने वापर केला. कौरवांनी केलेल्या दांभिक सत्काराचा असाच तटस्थतेने स्वीकार केला. धृतराष्ट्राने कृष्णाची राहण्याची व्यवस्था दु:शासनाच्या महालात केली होती. पण त्याने ही सर्व व्यवस्था नाकारली होती. कोणत्याही क्षणी कौरव दगा देवू शकतात हे कृष्णाला लाक्षागृहाच्या प्रसंगावरुन पुरेपूर माहित होते.

श्रीकृष्णाच्या व्यवहार कुशलतेचे हे उत्तम उदाहरण आहे. शिष्टाई करणाऱ्या व्यक्तीने कोणाचाही पाहुणचार न स्वीकारणे, ही कृष्णाची नीती होती. म्हणून हस्तिनापुरात जेव्हा कृष्णाचे भव्य स्वागत करण्यात आले. त्यावेळी कौरवपक्षातील भीष्म, द्रोण अशा श्रेष्ठ व्यक्तींच्या बरोबरही सावधगिरीने पण कोणालाही न दुखावता ते स्वागत-कौतुक स्वीकाराले. ही कृष्णाची राजनीती त्याला यशाचा राजमार्ग दाखविणारी ठरली.

युद्ध टाळण्यातच उभय पक्षाचे हित आहे हे श्रीकृष्ण वारंवार सांगतात. कौरवांचे मत प्रथम जाणून घ्यावे, यासाठीच मी येथे आलो आहे आणि यातूनही युद्ध अपरिहार्य असेल तर ते केलेच पाहिजे, पण याचा परिणाम कौरवांच्याच नाशात होईल अशी स्पष्ट भूमिका श्रीकृष्ण मांडतात पण हे ही सांगतात की कौरव व पांडव यांचे आपल्याशी समान संबंध आहेत. पांडवांच्या



न्याय व नीतीच्या वागणुकीमुळे श्रीकृष्ण जरी त्यांच्याच पक्षाचे असले, तरी ते स्वत:ला या वाटाघाटीमध्ये बांधून घेऊ इच्छित नाहीत. म्हणून पुढील कार्यवाहीची सर्व सूत्रे ते द्रुपद व विराट यांच्याकडे सोपवितात व स्वत: द्वारकेला प्रयाण करतात. युद्धाची तयारी करण्याचे कार्य ते द्रुपदावर सोपवितात आणि युद्धसाहाय्यार्थ राजांना आमंत्रित करायचे ठरलेच तर आपल्याकडे सर्वात शेवटी निरोप पाठवावा असे ते म्हणतात. धूर्त, बुद्धिवंत पुरुषाप्रमाणे केलेले हे वक्तव्य आहे. हे पूर्णपणे त्यांचे सहजाचरण आहे.

द्वारकेला निघण्यापूर्वी मात्र धृतराष्ट्र, भीष्म व द्रोण व कर्ण आणि दुर्योधन या सर्वांना सर्वपरीने युद्ध टाळण्यासाठी समजावले. फटकारले, धर्म-अधर्म, नीती-अनीती, सत्य-असत्य, सज्जन-दुर्जन, न्याय-अन्याय यांची स्पष्ट भूमिका मात्र मांडली. भीष्म व द्रोण यांना श्रीकृष्ण म्हणाले, ''हे युद्ध धर्मयुद्ध असेल, त्यामुळे या युद्धात अधर्माची बाजू घेणे हे तुम्हांला शोभणार नाही. युद्ध टाळण्याची बाजू घेणे हे तुम्हांला शोभणार नाही. युद्ध टाळण्याची शक्ती एका भीष्मात आहे म्हणून या संहारापासून सर्वांचे रक्षण करण्याची जबाबदारी तुमची आहे.

धृतराष्ट्राला दुसऱ्या दिवशीच्या सभेत शेवटचा निर्णय विचारला. ''सत्य जाणत असूनही तू खोट्या पक्षाची बाजू घेऊन बसला आहेस, असे खोटे काम करणाऱ्यांना दंड देणे, नि:पात करणे हे सत्कर्म आहे. हाच धर्म आहे. केवळ भोगलोलप वृत्ती ठेवून, असुरांचे जीवन जगणाऱ्यांना शिक्षाही होणारच. पण या सगळ्यांचे मूळ तूच आहेस. तूच खरा युद्धाला कारण होशील.''

श्रीकृष्णाने दुर्योधनाला विचारले, ''तुझ्या मनात असेल ते सांगून टाक. पण परिणामाचा पूर्ण विचार कर. अर्जुन-भीम यांच्याशी युद्ध करुन तू कदापी विजयी होणार नाहीस. कर्ण तुला वाचवू शकणार नाही. धर्मराजाला द्युत खेळायला निमंत्रण धाडले. द्रौपदीसारख्या शीलवान स्त्रीचे वस्त्रहरण केलेस,.... या सर्व निंद्य कृत्याला तू जबाबदार आहेस आणि आता तू तुझ्या या पापांचे चुकीचे समर्थन करतोस !

द्वारकानगरीला जायच्या पूर्वी कृष्णाने कर्णाला आपल्या रथात घेतले. श्रीकृष्णांनी कर्णाला आत्मियतेने समजावले, ''कर्णा, तू कुंतीचा पुत्र आहेस.

तरी तू तुझ्या सख्या भावांशी लढणार ? कौरवांना मदत करुन तू अधर्माची बाजू घेणार ? तू शौर्याचा पुतळा असून सुद्धा भ्याडासारखा कौरवांची बाजू घेत आहेस.''

श्रीकृष्णाने सर्वांच्या अंत:करणाला आवाहन केल्यामुळे त्याला अपेक्षित तेच घडले. कृष्णाची राजनीती-भेदनीती बरीच यशस्वी ठरली. कर्णाने कृष्णाला वचन दिले की, ''मी अर्जुनाशिवाय दुसऱ्या कोणाशीही लढणार नाही.'' धृतराष्ट्राला आपल्या मुलांना दोष द्यावा लागला. ही मुले माझे काही ऐकत नाहीत अशी कबुली कृष्णाकडे द्यावी लागली.

## शिष्टाईची फलश्रुती

दुर्योधनाचे उद्धट उत्तर व उद्दाम भाषा हीच या शिष्टाईची फलश्रुती होती. दुर्योधनाने दिलेले युद्धाचे आव्हान हेच याचे फळ होते. दुर्योधन म्हणाला होता, ''आम्ही कोणत्याही भयंकर कर्माला अथवा भयानक वचनाला घाबरुन, क्षत्रिय धर्मापासून च्युत होऊन साक्षात् इंद्रापुढेही नतमस्तक होणार नाही. भीष्म, द्रोण, कृपाचार्य आणि कर्ण यांना तर देव देखील युद्धात जिंकू शकत नाहीत मग पांडवांची गोष्टच काय ? आमच्या स्वधर्माचा विचार करता, युद्धात आम्ही शस्त्राघाताने मरण पावलो तरी ते आम्हाला स्वर्ग प्राप्तीकरच होईल.'' इंद्रप्रस्थाच्या राज्याविषयी दुर्योधन म्हणाला, ''श्रीकृष्णा ! पूर्वी देखील जो राज्य भाग पांडवांना दिला गेला होता तो त्यांना देणे उचित नव्हते. परंतु त्यावेळी मी पराधीन होतो. म्हणून अज्ञानाने अथवा भयाने जे कांही त्यांना वाटणीच्या स्वरुपात दिले होते तो भाग सुद्धा मी पुन्हा प्राप्त करीन. मी जीवंत असेपर्यंत पांडवांना हे प्राप्त होऊ शकणार नाही.'' असे म्हणून उद्दामपणे शेवटी कृष्णाला म्हणाला, ''हे केशवा, यावेळी मी महाबाहु दुर्योधन, जिवंत असेपर्यंत तीक्ष्ण सुईच्या अग्रभागावर बसेल इतकी भूमीही पांडवांना दिली जाणार नाही.''

इथेच महाभारताच्या युद्धाला तोंड फुटले. श्रीकृष्णाने शांतपणे ऐकून घेतले. श्रीकृष्ण धृतराष्ट्राला म्हणाले, ''राजन ! दुर्योधनाला कैद करुन पांडवांशी संधी कर. एका व्यक्तीमुळे समस्त क्षत्रियांचा विनाश होत असेल



तर हे केलेच पाहिजे. गांधारीने सुद्धा दुर्योधनाला नैतिक उपदेश केला व भीष्म, द्रोण, विदूर जे काही सांगत आहेत त्याचा स्वीकार कर. शेवटी सांगितले, ''तू कृष्णाला शरण जा. ते प्रसन्न होतील व दोन्ही पक्षांना सुखी करतील. पण दुष्ट दुर्योधनाने हे काहीच जुमानले नाही.

## दुर्योधन व अर्जुन यांची श्रीकृष्ण भेट

अर्जुन व दुर्योधन दोघेही द्वारका नगरीस आले. कृष्ण झोपलेले असताना त्यांनी शयनगृहात प्रवेश केला. दुर्योधनाने प्रथम प्रवेश केला. श्रीकृष्णाच्या शीर्षभागी असलेल्या एका उत्तम आसनावर तो बसला. अर्जुन श्रीकृष्णाच्या चरणाजवळ उभा राहिला.

श्रीकृष्णाला जाग आल्यानंतर त्याने अर्जुनाला आपल्या चरणाजवळ पाहिले. दुर्योधनाला येण्याचे प्रयोजन विचारले. दुर्योधन म्हणाला, ''माझ्याशी व अर्जुनाशी तुमचे समान सख्य आहे. युद्धासाठी सहाय्य मागावयास मी आलो आहे. मी प्रथम आलो आहे. पूर्व पुरुषांचा सदाचार असा आहे की, प्रथम येणाऱ्यांची साहाय्यता प्रथम करावी.

श्रीकृष्ण म्हणाले, ''मी प्रथम अर्जुनाला पाहिले. शास्त्रानुसार लहानांना प्रथम प्राधान्य द्यावे ही रीत आहे, तरी मी तुम्हा दोघांना मदत करीन. माझ्याजवळ बलवान गोपांची नारायण सेना आहे वा दुसरीकडे मी स्वत: ! मी ना युद्ध करीन ना शस्त्र धारण करीन.

अर्जुनाने श्रीकृष्णाला निवडले व दुर्योधनाने नारायण सेना मागून घेतली. अर्जुनाला व कृष्णाला जणू आपण फसविले या थाटात तो बलरामाकडे मदतीसाठी गेला. पण बलरामाने त्याला मदत करण्यास नकार दिला. श्रीकृष्णाला सोडून मी क्षणभरही रहात नाही असे बलरामाने उत्तर दिले.

श्रीकृष्णाला अर्जुनाने आपल्या रथाचे सारथ्य करावे, अशी इच्छा व्यक्त केली. श्रीकृष्णाने हे आनंदाने मान्य केले.

या सर्व घटनांतून शिष्टाई करुन श्रीकृष्णाने आपली स्थिरबुद्धी, अलोलुपता, सर्वहितकारी व सावध दूताचे दर्शन घडविले आहे. दूरदृष्टीचे व कुशाग्र प्रज्ञेचे दर्शन घडते. कोणत्याही स्थितीत अचल व स्थितप्रज्ञ राहणारा

श्रीकृष्ण कौरवांच्या मोहाच्या जाळ्यात कधीच अडकला नाही. कृष्णाचा भव्य सत्कार करुन त्याला वश करण्याची धृतराष्ट्राची व इतर सर्व कौरवांची राजनीती अयशस्वी झाली. ती याच कारणाने. हे सर्व समजल्यावर विदूराने व भीष्माने सर्वांना सुनावले की, कृष्ण समजण्यासाठी तुम्हाला दुसरा जन्म घ्यावा लागेल. कृष्णाला वित्त, स्त्री, मान-सन्मान, सत्कार किंवा कोणत्याही उपायांनी वश करता येणार नाही.

## श्रीकृष्ण पांडवांना भेटतात

हस्तिनापूरहून निघून श्रीकृष्ण इंद्रप्रस्थला येतात. घडलेला सर्व वृतांत यथावत सांगतात.

या दान व दाम नीतीचे स्पष्टीकरण कृष्णानी केले. ते युधिष्ठिराला सांगतात, ''मी दुर्योधनाला म्हटले की पांडव जरी शौर्य संपन्न असले तरी ते सर्वजण अभिमान सोडून भीष्म, धृतराष्ट्र आणि विदूर यांच्या हाताखाली राहू शकतात. ते आपले राज्यही तुम्हाला देतील. तू पांडवांना पाच गावेच दे. कारण पांडवांचे भरण-पोषण करणेही तुझ्या पित्याला परम आवश्यकच आहे. परंतु त्या दुष्टात्म्याने राज्याचा कोणताही भाग तुमच्यासाठी सोडण्याचे नाकारले म्हणून कौरव युद्धाशिवाय तुम्हांला राज्य देणार नाहीत. आता त्या सर्वांच्या विनाशाचे कारण उपस्थित झालेले आहे.''

याचे सर्व महाभारतात विस्तारपूर्वक वर्णन आले आहे. श्रीकृष्णाचा हा वृतांत ऐकून, सर्व बंधूना युधिष्ठिरांनी युद्धास तयार होण्याचे आवाहन केले. आपली सात अक्षौहिणी सेना अवश्यच आम्हाला विजयश्री प्राप्त करुन देईल युधिष्ठिरांनी सात सेनांच्या सेनापतींची नावे घोषित केली.

श्रीकृष्णांनी स्पष्ट सांगितले की, आपण युद्ध टाळण्यासाठी शक्य ते सर्व प्रयत्न केले. युधिष्ठिराचे प्रिय करण्यासाठी शांतिस्थापनेचा महान प्रयत्न केला होता. त्या योगे आपण धर्माच्या ऋणातून मुक्त झालो आहोत. दोषदृष्टि लोकही आता आमच्यावर दोषारोपण करु शकत नाहीत अशी आपली न्याय बाजू आहे.



# श्रीकृष्ण नीतीवरील आक्षेप

श्रीकृष्णावर सतत एक आक्षेप घेतला जातो. श्रीकृष्ण युद्ध थांबवू शकले असते. मग त्यांनी हे युद्ध का थांबवले नाही ? युद्धात होणारी हिंसा व लाखो सैनिकांचे प्राण ते वाचवू का शकले नाहीत ? युद्ध हा कांही एकमात्र पर्याय नाही. यामुळे अहिंसावादी लोकांना हे प्रश्न सतत पडत असतात.

दुष्टांचे दुष्टपण घालवावे की, दुष्टांनाच संपवावे ! ज्या श्री ज्ञानेश्वरांनी गीतेवर भावार्थ दीपिका म्हणजे ज्ञानेश्वरी लिहीली त्यात विश्वशांतीसाठी पसायदान लिहीले. यात त्यांनी या प्रश्नाचे उत्तर दिले आहे. ते म्हणतात,

**जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।**
**भूता परस्परे पडो । मैत्र जीवाचे ।।**

खळांचा, दुष्टांचा, कुटीलपणा नाहीसा व्हावा, आणि त्यांची सत्कर्माच्या ठिकाणी आवड वाढावी व सर्वांची एकमेकाशी जीवाभावापासून मैत्री व्हावी.''

''गीतेपेक्षा महान असा हा विचार आहे. दुष्टांचे दुष्टपण जाऊन त्यांच्यात सत्कर्म करण्याची बुद्धी व्हावी म्हणून त्यांच्यातले खलत्व जावे.'' हा विचार म्हणून, नक्कीच महान आहे. पण व्यवहारात, प्रत्यक्षात असे घडते का ? सातशे वर्षापूर्वी समाजासमोर त्यांनी ही प्रार्थना केली. पण गेल्या सातशे वर्षात किती परकीय आक्रमणे झाली ? किती महायुद्धे झाली ? किती अतीरेक्यांनी विनाकारण निष्पाप लोकांच्या हत्या केल्या ? ब्रिटीशांच्या कुटीलनीतीने, राष्ट्राचे विभाजन करुन, धर्माधर्मांत लाखो लोकांच्या हत्या घडवून आणल्या. आजही महाभारत घडतेच आहे.

मग कृष्णाने ही नीती का वापरली ?

वास्तवीक कृष्णाबरोबर विदूरानेसुद्धा युद्ध टाळावे म्हणून खूप प्रयत्न केले. दुर्योधनाने मात्र वैरत्व संपविण्यासाठी, वैऱ्यांनाच संपविण्याचे लाक्षागृहासारखे अनेक प्रयोग केले. जो माणूस स्वत:च म्हणतो की, ''जानामि धर्मंनच मे प्रवृत्ती...'' मी धर्म जाणतो पण धर्माने वागण्याची वृत्तीच माझ्यात होत नाही. ज्याने सतत पांडवांचा छळ केला तो पांडवांना सुईच्या अग्रावर

राहील  एवढी जमीन सुद्धा द्यायला तयार नाही. कृष्णाने युद्धाचा परिणाम म्हणून कौरव वंशच संपून जाईल असा इशारा देऊन सुद्धा दुर्योधन मागे हटला नाही. उलट देवांना सुद्धा पराजीत करु शकतील असे सेनानी माझ्याजवळ आहेत तिथे पांडवांचा काय पाड ? अशी दर्पोक्ती त्याने कृष्णाजवळ केली. वास्तवीक कृष्ण शांतिदूत म्हणून शिष्टाई करायला गेला होता. युधिष्ठिराला सुद्धा हे युद्ध नको होते. 'द्युत', द्रौपदी हरण, लाक्षागृह... असे सर्व प्रकार हे केवळ पांडवांच्या नाशासाठी केलेल्या योजना होत्या. पण सुदैवाने ते वाचले. हे माहित असून सुद्धा शेवटी उदरनिर्वाहासाठी पाच गावांची मागणी केली. तीही अमान्य केल्यानंतर कोणता पर्याय शिल्लक राहतो ?

गीता पूर्ण वाचल्यानंतर कळते की, फक्त पहिल्या अध्यायात युद्धाचा उल्लेख आहे. पण स्वधर्म म्हणून क्षत्रियाने युद्ध टाळू नये हे सांगण्यासाठी बाकी सर्व मानवतावादी, सत्य, अहिंसा, प्रेमाचे तत्वज्ञान कृष्णाने सांगितले आहे.

जसे ऑपरेशन थिएटरमध्ये डॉक्टर हातात हत्यार घेऊन पेशंटच्या शरीरातील टाकावू भाग कापून काढतो. पेशंट बरा होतो. डॉक्टरांचे सर्वजण आभार मानतात, त्यांना देवही मानतात.

तसे टोकाला गेलेल्या विकारांनी भरलेल्या, मानवतेच्या शत्रूंचा नाश करण्याची नीती श्रीकृष्णरुपी डॉक्टरांनी स्वीकारली. दुर्योधनाचा अतिलोभ, कर्णाचा अहंकार, भीष्माचा मोह व ममता, धृतराष्ट्राचाही मोह, शकुनीचा मत्सर व ईर्ष्या, अश्वत्थाम्याचा क्रोध, दु:शासनाचा काम, द्रोणाचार्यांचा मद हे सर्व विकार त्यांना स्वत:चाही नाश करणारे होते व दुसऱ्यांचीही हत्या करणारे होते म्हणून या सात महारथींचा - काम, क्रोध, मोह, मद, मत्सर, अहंकार, लोभ या शत्रूंचा नाश करणे म्हणजेच ऑपरेशन युद्ध.

पण हे केवळ युद्ध नव्हे तर ते धर्मयुद्ध होते. धर्माच्या संस्थापनेसाठी सज्जनांच्या रक्षणासाठी व दुर्जनांच्या नाशासाठी केलेले अपरिहार्य यद्ध होते. कृष्णनीती ही मानवतेच्या कल्याणासाठीच आहे. कारण कृष्णाने ''इदं न मम'' या अनासक्तीने केलेले हे कार्य होते. यात कृष्णाचा काहीही स्वार्थ नव्हता.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**





# कृष्णनीती - ३

प्रकरण ५

# कृष्णनीती - ३

## युद्धनीती

प्रत्यक्ष युद्ध १८ दिवस चालले. श्रीकृष्ण शिष्टाई अयशस्वी झाली. महाभारतात या प्रत्येक दिवसाचे चढ-उतार, विजय-पराजय व शौर्याच्या कथा तपशीलासह आल्या आहेत. ''युद्धस्य कथा रम्या'' असे जरी म्हटले असले तरी हे युद्ध दोन विचारांमधील युद्ध होते. सत्य-असत्य, असुरी-दैवी शक्ती, विकार-गुण, सज्जन-दुर्जन यामधील हे महायुद्ध होते. युद्धापूर्वी शेवटचा संदेश म्हणून दुर्योधनाने अर्जुनाला जो संदेश पाठविला त्यात कौरवांची नीती, वृत्ती यांचे स्पष्ट दर्शन होते. दुर्योधन अर्जुनाला पाठविलेल्या संदेशात म्हणतो, ''अर्जुना, श्रीकृष्णाच्या अथवा तुझ्या भयाने मी राज्य परत देणार नाही. तू श्रीकृष्णासह येऊन युद्ध कर. हजारो श्रीकृष्ण व शेकडो अर्जुन देखील अमोघ बाण असलेल्या मज वीराच्याजवळ येऊन, दहाही दिशांना पळून जातील.''

या उद्धट उत्तराला सर्व पांडवांनी उलुकाजवळ दुर्योधनाला उत्तर दिले ते अत्यंत संयत वाणीने व क्षत्रियोचित वृत्तीने पण श्रीकृष्णाने आपल्या युद्धनीतीचे प्रत्यक्ष बोल सुनावले, ते या संदेशात म्हणतात, 'मूढा, तू जे समजत आहेस की, मी सारथी होणार असल्यामुळे युद्ध करणार नाही म्हणून तुला माझे भय वाटत नाही. पण लक्षात ठेव, मला वाटले तर मी या सर्व नरेशांना आपल्या क्रोधाग्नीने तृणवत जाळून टाकू शकतो. परंतु युद्धाच्या शेवटापर्यंत असे करण्याचा अवसर न मिळो हीच माझी इच्छा आहे.

श्रीकृष्णाजवळ अलौकीक दैवी शक्ती असूनसुद्धा त्याचा वापर न करता, त्याला केवळ सारथ्य करायचे होते. युद्धाचे सर्व नियम, संकेत, प्रथा पाळायच्या होत्या. जोपर्यंत नीती-धर्माचे युद्ध चालले आहे तोपर्यंत याचे उल्लंघन कोठेही होणार नाही. पण अधर्माने युद्ध कराल तर याद राखा

असाच संदेश सर्व पांडवांनी व श्रीकृष्णाने दुर्योधनाला दिला.

यानंतर कुरुक्षेत्रात कौरव पांडवांची दोन्ही सैन्ये विजयाची आकांक्षा ठेऊन एकमेकांसमोर उभी राहिली. व्यूहरचना झाली. कौरवांचे अकरा अक्षौहिणी सैन्य व पांडवांचे सात अक्षौहिणी सैन्य यांच्या शौर्याची ही कथा आहे.

युद्धाचा विजय विधीलिखीत होतात. 'मया एव एते निहता: पूर्वमेव....'' हे प्रत्यक्ष श्रीकृष्णाने आधीच सांगून ठेवले होते. ''यतो धर्म: ततो जय:'' जेथे धर्म, नीती आहे तेथेच विजय आहे. शिवाय ''यत: कृष्ण: ततो जय: ।'' जेथे कृष्ण तेथे विजय. आणि या युद्धात तर कृष्णाबरोबर महापराक्रमी अर्जुन देखील होता. म्हणून, ''यत्र योगेश्वरो कृष्णो यत्र पार्थो धनुर्धर:....'' जिथे कृष्ण व जिथे अर्जुन तेथेच श्री, विजय, ऐश्वर्य व नीती असते.

असे असूनसुद्धा श्रीकृष्णाने आपल्या दैवी शक्तींचा वापर कोठेही केला नाही. सर्वत्र मनुष्य रुपातला श्रीकृष्ण सर्वांसारखा वागत होता. पण जेव्हा अधर्म, अनीती याचा वापर कौरवांनी केला तेव्हा मात्र कृष्णाला आपली युद्धनीती दाखवावी लागली.

दोन्ही पक्षाकडे अतीरथी–महारथी होते. अनेक राजे आपापल्या सेना घेऊन त्या त्या पक्षाकडून लढत होते. सर्वजण निकराने लढत होते. आपले शौर्य पणाला लावत होते. विजयाचे पारडे घड्याळाच्या लंबकाप्रमाणे कधी कौरवांच्या बाजूला तर कधी पांडवांच्या बाजूला झुकत होते. त्याप्रमाणे दु:ख–आनंद, हर्षोल्हास, नैराश्य यांच्या लाटा युद्धभूमीवर उसळून येत होत्या. आज या राजाचा मृत्यु, तर उद्या दुसऱ्या, आज या पक्षाच्या सैन्याची एवढी हानी तर उद्या दुसऱ्या पक्षाच्या सैन्याची.....

पण या महाभारत युद्धात, सर्वात मोठे पराक्रम ज्या सेनापतीकडून होत होते, त्यांचा मृत्यू ही त्या त्या पक्षांची प्रचंड हानी ठरत होती. असा मृत्यू झाला की, त्यावर शोक, आक्रंदन, विलाप व्हायला पण त्यावर विचार–मंथन होऊन त्याजागी पुन्हा उत्साह, पुन्हा नवी आशा येऊन सौन्य हिरीरीने लढायचे.

या सर्व युद्धात भीष्मपतन, जयद्रथ वध, घटोत्कचाचा मृत्यू व द्रोण–



वध, कर्ण–वध व शेवटी शल्य आणि दुर्योधन–वध यांचे मृत्यू किंवा निर्वाण हे महायुद्धाच्या विजयाचे निर्णयाचे घटक ठरत होते.

या प्रत्येक घटनेमागे, कृष्णनीतीचा सर्वात प्रभाव असायचा. कृष्णाची युद्धनीती हेच या पतनाला कारण असायचे. अत्यंत मोक्याच्या ठिकाणी श्रीकृष्णाने केलेला उपदेश त्यांनी प्रत्येकाच्या आत्मतेजाला, अस्मितेला केलेले आवाहन, सांगितलेल्या युक्त्या–प्रत्यक्त्या या सर्व, पांडवांना यशाकडे घेऊन जात होत्या. यश मिळाले की, युधिष्ठीर व इतर पांडव कृष्णाची मुक्त कंठाने प्रशंसा करायचे व कृतज्ञता व्यक्त करायचे.... सर्व यशाचे श्रेय कृष्णालाच द्यायचे.

म्हणून महाभारत युद्धातून जर कृष्णाला वगळले तर युद्धाचा आत्माच हरविल्यासारखे होईल. म्हणून या प्रकरणात कृष्णाच्या युद्धनीतीचे पैलू आपण पाहणार आहोत. कारण महाभारत युद्धाचा विजय हा या कृष्णनीतीचा विजय होता. हा धर्माचा, नीतीचा, सत्याचा खऱ्या अर्थाने विजय होता. कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र होण्याचा हा राजमार्ग होता. कंस, जरासंघ यांचा वध करुन, त्यांच्या राज्यावर त्यांच्याच निकटच्या व्यक्तीना राजे बनवून एकतंत्री दुराचारी राज्य व्यवस्थेला दिलेली तिलांजली होती. महाभारत युद्धात सुद्धा युधिष्ठिराच्या रुपाने धर्म संस्थापना करुन असुरी शक्तीचे निर्दालन करण्याचे हे अवतार कार्य होते.

ही कृष्णनीती–युद्धनीती नेमकी कशी होती याचे विहंगावलोकन करणे म्हणजे, महाभारत युद्धाचा इतिहास सारभूत रुपाने अवलोकन करण्यासारखे आहे.

## भीष्मपतन

युद्धापूर्वी युधिष्ठिरांनी रीती–नीतीनुसार पितामह भीष्माकडे जाऊन युद्धाची परवानगी मागितली. भीष्मानी स्पष्ट केले की, आपणाला युद्ध भूमीत कोणीही जिंकू शकणार नाही. तसा माझा मृत्युकाळही जवळ आला नाही. हे ऐकून युधिष्ठिराने पुनश्च प्रश्न केला, '' तर मग युद्धात शत्रूकडून आपण कसे मारले जाल ?'' भीष्मानी उत्तर दिले की, या प्रश्नाच्या उत्तरासाठी पुन्हा आपल्याकडे ये.

अशीच प्रश्नोत्तरे द्रोणाचार्यांबरोबर झाली असता द्रोणाचार्य म्हणाले, ''युधिष्ठिरा, मी जेव्हा शस्त्र खाली ठेऊन अचेत झाल्यासारखा होऊन प्रायोपवेशनाला बसेन, तेव्हा त्या अवस्थेतच कोणी श्रेष्ठ योद्धा युद्धात मला ठार मारु शकेल. दुसरे असे की, एखाद्या विश्वसनीय पुरुषाकडून युद्धभूमीत एखादा अत्यंत अप्रिय समाचार ऐकेन, तर मी शस्त्र खाली ठेवीन.''

ही सर्व प्रश्नोत्तरे श्रीकृष्ण ऐकत असताना झालेली आहेत.

वास्तविक श्रीकृष्णाने अर्जुनाला मी आधीच भीष्म व द्रोण यांना मारलेले आहे असे सांगितले असताना देखील आपल्या पितामहाशी तो पूर्ण शौर्याने लढत नव्हता. हे पाहून श्रीकृष्ण क्रोधीत झाले व अर्जुनाला म्हणाले, ''तुझ्या या संथगतीमुळे आता मीच माझी प्रतिज्ञा मोडून हातात शस्त्र घेईन'' हे ऐकून अर्जुन घाबरला. तो म्हणाला, ''आपण पांडवांचे परम आश्रय आहात. आता मी आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे कर्तव्याचे पालन करीन.'' या वचनाप्रमाणेच अर्जुनाने भीष्माशी घनघोर युद्ध केले. भीष्म-द्रोणासह कोणीही महारथी अर्जुनापुढे टिकाव धरु शकत नव्हता.

श्रीकृष्ण अशा तऱ्हेने अर्जुनाला मधून मधून प्रोत्साहीत करीत, सूचना करीत व काही योग्य वाटेनासे झाले तर क्रोधीत होत व तो क्रोध व्यक्त करीत. अपेक्षित परिणाम दिसला की प्रसन्न होत. अर्जुनाने महापराक्रम करुन सुद्धा भीष्म मागे हटेनात तेव्हा युधिष्ठिरांनी कृष्णाला विनवणी केली की, भीष्मांनी आपला युद्धभूमीत मृत्यू कसा होईल हे जाणण्यासाठी पुन्हा येण्याची सूचना केली होती. मला वाटते, ती वेळ आता आली आहे. आपण सर्वजण पुनश्च भीष्मापितामहाना भेटावयास जाऊ. श्रीकृष्ण म्हणाले, ''अवश्य जाऊ. केवळ तूच असल्यामुळे तुझ्यासमोर सत्य तेच निवेदन करतील.''

याप्रमाणे सर्व पांडव कृष्णासह पितामह भीष्माकडे गेले. युधिष्ठिराने दीन भावाने त्यांना विचाराले, ''पितामह, युद्धात आमचा विजय कसा होईल ? आपणच आपल्या वधाचा उपाय आम्हाला सांगा.'' यावर भीष्म म्हणाले, ''द्रुपदपुत्र महारथी शिखंडी शौर्यसंपन्न आहे. पण तो पूर्वी स्त्री होता म्हणून मी त्याच्यावर कोणत्याही प्रकारे प्रहार करणार नाही. या गोष्टीचा लाभ घेऊन शूरवीर अर्जुनाने शिखंडीला पुढे करुन स्वत: तीक्ष्ण



बाणांनी चारी बाजूनी माझ्यावर आक्रमण करावे आणि मला मारुन पाडावे. याच प्रकारे तुमचा विजय होऊ शकतो.''

श्रीकृष्णासहीत पांडवांनी भीष्मांना प्रणाम केला आणि ते आपल्या शिबिरात परत आले. भीष्माचे ते भाषण ऐकून अर्जुन शोकसंतप्त व लज्जीत झाला. पुन्हा व्याकुळ झाला. मोहवश झालेल्या अर्जुनाला पुन्हा एकदा क्षात्रधर्माची, स्वधर्म-कर्तव्याची आठवण करुन दिली. अर्जुनाच्या मनातील शंका नि:शेष दूर करण्यासाठी एक शास्त्रवचनही सांगितले. ते म्हणाले, कोणी श्रेष्ठ गुरुजन, वृद्ध आणि सर्वगुणसंपन्न पुरुषही जर शस्त्र उचलून आपला वध करण्यासाठी येत असेल तर त्या आततायी मनुष्याचा वध अवश्य केला पाहिजे. शाश्वत क्षात्रधर्मही हेच सांगतो.

हे ऐकून अर्जुन शांत झाला व शिखंडीला पुढे करुन भीष्माशी युद्ध करुन त्यांना ठार मारण्याचा निर्धार त्याने व्यक्त केला.

श्रीकृष्णासह सर्व पांडव प्रसन्न झाले. श्रीकृष्णाच्या या कौशल्यामुळे नि:शंक होऊन अर्जुन युद्धास तयार झाला. दहाव्या दिवसाचे युद्ध भीष्मावधाचे लक्ष्य ठेऊनच केलेले निकराचे युद्ध होते. त्या दिवशी पांडव सैन्य शिखंडीला पुढे करुनच रणक्षेत्राकडे निघाले. युद्धाला प्रारंभ झाला. शिखंडीला पुढे करुन अर्जुनाने भीष्मावर आक्रमण केले. भीष्मांनी देखील नाना अस्त्राशस्त्रांनी निकराचा प्रतिहल्ला चढविला आणि अनेक महारथींचा वध केला.

हे पाहून शिखंडीने क्रुद्ध होऊन भीष्मावर बाणांचा वर्षाव केला. अर्जुन शिखंडीचा उत्साह वाढवीत होता. अर्जुनाने भीष्मांना मूर्छित केले. पुन्हा उठून भीष्माने पुन्हा युद्ध सुरु केले. भीष्म व अर्जुन यातील अखरेचा संग्राम सुरु झाला.

भीष्मांनी विचार केला की, ''श्रीकृष्ण जर पांडवांचे रक्षण करत असतील तर त्यांचा कोण वध करु शकेल ? मी आता पांडवांशी युद्ध करणार नाही. कारण ते पांडूचे पुत्र असल्यामुळे मला अवध्य आहेत, दुसरे माझ्यासमोर शिखंडी आला आहे.'' याचवेळी भीष्मांना पित्याने आपणाला दिलेल्या इच्छामरणाच्या वराचे स्मरण झाले. मला वाटते आता ती वेळ आली आहे की स्वेच्छेनेच मला मरण पत्करले पाहिजे. त्याचवेळी अर्जुनाने

बाणांचा प्रचंड वर्षाव केला. थोडा दिवस उरला असताना सर्वांच्या देखत पूर्व दिशेला मस्तक करुन भीष्म पितामह रथातून खाली पडले. भीष्मांच्या शरीरात सगळीकडे बाण रुतलेले होते म्हणून खाली पडूनही त्यांच्या शरीराला धरतीचा स्पर्श झाला नाही. भीष्माचे असे हे दिव्य पतन झाले.

सर्व कौरव व पांडव तसेच अन्य राजे हे शस्त्रे खाली ठेवून भीष्माजवळ आले. त्यांना प्रणाम करुन ते सर्वजण उभे राहिले.

अशा प्रकारे युद्धाचे हे भीष्मपर्व समाप्त झाले. या युद्धातील एका महान शक्तीचा असा दिव्य अंत झाल्यामुळे कौरव बिथरले.

महाभारत ग्रंथात हे सर्व वर्णन बारीक सारीक तपशीलासह आले आहे. यात कृष्णाने प्रत्यक्ष जरी काही केले नाही तरी, भीष्माचा अंत होईपर्यंत सर्व सूत्रे अत्यंत मुत्सद्दीपणाने हालविली; धोरणात्मक व्यूह रचून युद्धातील सर्वात मोठा अडसर दूर केला.

## जयद्रथ वध

भीष्मांच्या पतनानंतर आचार्य द्रोण कौरवांचे प्रधान सेनापती झाले. त्यांनी पाचच दिवस युद्ध केले. या काळात पांडवावर अनेक संकटे आली. पण यातून श्रीकृष्णानीच त्यांची मुक्तता केली. युद्धात कौरवांनी युद्धाचे नियम पाळले नाहीत अधर्माने व्यवहार केला. अभिमन्यू वध हा अन्याय परंपरेचा कळस होता.

पांडवांची पिछेहाट होत होती. त्यातच भगदत्त नामाच्या राजाने आणलेल्या सुप्रतीत नामक भयानक व महोन्मत्त हत्तीने, पांडवसेनेत घुसून हाहाकार माजविला. अखेर ब्रह्मास्त्रांचा वापर करुन अर्जुनाने त्या हत्तीला यमसदनी पाठविले. भगदत्ताचाही वध झाला. इकडे अभिमन्यूला अधर्माने मारण्यात राजा जयद्रथ, द्रोणाचार्य, कर्ण, दु:शासनपुत्र अशा सर्वांनी कट करुन अभिमन्यूचा वध केला. हे सर्व समजल्यावर अर्जुनाने प्रतिज्ञा केली की, राजा जयद्रथाला मी उद्या अवश्य मारीन.

अर्जुनाने अशी प्रतिज्ञा केली की, त्याचा भार सहजच श्रीकृष्णावरच आला. जयद्रयाच्या वधावेळी श्रीकृष्णाने आपल्या योगसामर्थ्याने सूर्याला



झाकण्याचा प्रयोग केला. हा प्रयोग यशस्वी ठरला. सूर्यास्त झाला आहे असे समजून सर्व कौरव निश्चिंत झाले. जयद्रथाला वाटले, ''माझा वध करण्याची आजची वेळ टळली.''

एवढ्यात श्रीकृष्णाने अर्जुनाला जयद्रथाचा वध करण्यास उद्युक्त केले. अर्जुनाने आपल्या प्रतिज्ञेचे पालन करीत जयद्रथाचा वध केला. जयद्रथ मारला गेल्यानंतर श्रीकृष्णाने तो अंधार आवरुन घेतला तेव्हा कौरवांना कळले की, अंधाराच्या रुपाने श्रीकृष्णाने पसरविलेली ही माया होती. नंतर ''हा सूर्य व हा जयद्रथ'' समजावून अर्जुनाने प्रतिज्ञा पूर्ण केली.

अर्जुन व युधिष्ठिर या दोघानीही या यशाचे श्रेय श्रीकृष्णालाच दिले. परंतु श्रीकृष्णाने हे सर्व श्रेय युधिष्ठिराच्या तपस्येला व साधुतेला दिले. युधिष्ठिराच्या तपस्येने, परमधर्माने जयद्रथ मारला गेला असे अत्यंत नम्रतेने सांगितले. कृष्णाची युद्धनीती यशस्वी ठरली. अधर्मांशी केलेला हा प्रतिकार होता.

## द्रोणवध

कृपाचार्यांनी श्रीकृष्णाला 'युद्धविशारद' असं एक विशेषण लावले आहे ते सर्वथा सत्य आहे. महाभारत युद्धात पावलो-पावली या युद्धनीतीचा वापर कृष्णाने केला आहे. द्रोण वधापूर्वीची एक घटना, अत्यंत महत्वाची अशी ठरली आहे. ती म्हणजे घटोत्कच-कर्ण युद्ध !

श्रीकृष्ण अर्जुनाला कर्णापुढे जाऊ देत नाहीत. ते अर्जुनाला म्हणाले, ''महापराक्रमी कर्ण या युद्धात अतिमानुष पराक्रम प्रकट करीत सर्वत्र संचार करीत आहेत. या युद्धात तू किंवा घटोत्कच यांच्याशिवाय अन्य कोणीही कर्णाशी सामना करु शकत नाही. यावेळी रक्षक्षेत्रात कर्णाशी युद्ध होणे मी उचित मानीत नाही. कारण त्याच्याकडे इंद्राने दिलेली शक्ती आहे. ती अद्भूत शक्ती त्याने तुझ्यावर प्रयोग करण्यासाठीच राखून ठेवली आहे. म्हणून माझ्या मते महाबली घटोत्कचानेच कर्णाशी सामना करावा. घटोत्कचाजवळ सर्व प्रकारची दिव्य शस्त्रे आहेत. कृष्ण अर्जुनाने घटोत्कचास कर्णाशी युद्ध करण्यास आवाहन केले. घटोत्कच आनंदाने तयार झाला.

# कर्ण–घटोत्कच युद्ध

कर्ण व घटोत्कचाचे महाभयानक युद्ध झाले. घटोत्कच आवरत नाही असे पाहून कर्णाने एक भयंकर अस्त्र प्रकट केले. सर्व कौरव घटोत्कच्या महापराक्रमाने गर्भगळीत झाले. सर्वांनी कर्णाला गळ घातली. ''कर्णा, या राक्षसाचा वध करण्यासाठी तुझ्या जवळील इंद्राने दिलेली शक्ती वापर.'' अर्जुनाचा वध करण्यासाठी राखून ठेवलेली ती इंद्रदत्त शक्ती कर्णाने घटोत्कचासाठी वापरली. त्या शक्तीने घटोत्कच निष्प्राण होऊन पडला. या वार्ता ऐकून पांडव दु:खी झाले, पण श्रीकृष्ण मात्र हर्षभरीत. कारण कृष्णाची युद्धनीती अर्जुनाला कर्णाविरुद्ध यश मिळवून देणार होती. आता कृष्ण निश्चिंत होता. अर्जुनाने कृष्णाच्या हर्षाचे कारण विचारल्यानंत कृष्णाने स्पष्ट केले, ''धनंजया, इंद्राची शक्ती कर्णाकडून खर्ची झाल्यामुळे तुझा विजय आता निश्चित झाला. कवच–कुंडले व शक्ती यांच्याशिवाय कर्ण आता पूर्वीचा अजिंक्य कर्ण राहिला नाही. केवळ तूच कर्णाचा आता वध करु शकशील.'' ''तरीही त्याचा वध जेव्हा त्याच्या रथाचे चक्र भूमीत रुतून बसेल तेव्हांच तुला हे शक्य आहे. अशा वेळी मी तुला संकेत देईन तेव्हाच तू कर्णाचा वध कर.''

आणि घडलेही तसेच. अगदी महत्त्वाच्या क्षणी रथाचे चक्र चिखलात रुतून बसेल असा शाप एका ब्राह्मणाने कर्णाला दिला होता. अर्जुनाशी लढताना या शापाने कर्णावर असाच प्रसंग ओढवला. तेव्हा कृष्णाने कर्णाला ठार कर असा संकेत दिला. पण अर्जुन धर्मयुद्धाच्या नियमांची आठवण करुन देत होता. पण कृष्णाने आपली तीव्र प्रतिक्रिया केली. कृष्ण म्हणाला, ''ज्यावेळी द्रौपदी वस्त्रहरण झाले व तिची विटंबना चालली होती तेव्हा कृष्णाचा धर्म कोठे गेला होता. पांडवांविरुद्ध कट, कारस्थान करुन त्यांना जीवे जाळण्याचे प्रयत्न होत असताना कर्ण हा निष्क्रीय होता. अशा अधर्माने वागणाऱ्या सुतपुत्राबाबत तू धर्म–अधर्माच्या गोष्टी करतोस ? आता क्षणभरही वेळ न दवडता कर्णाला ठार कर.'' अर्जुनाने कृष्णाच्या सूचनेप्रमाणे कर्ण वध केला.

कौरवांच्या सेनेचे सेनापती झालेले द्रोणाचार्य यांचा युद्धातील आजचा



पाचवा दिवस होता. आचार्य द्रोण व महारथी अर्जुन या गुरु–शिष्यामध्ये युद्ध झाले. ब्रह्मास्त्रांचा प्रयोग दोघांनीही केला. द्रोणाचार्यांनी पांडवसेनेची वाताहात केली. श्रीकृष्णाने अर्जुनाला उपदेश केला. ते म्हणाले, ''द्रोणाचार्य सर्व धनुर्धरात श्रेष्ठ आहेत. इंद्रासह सर्व देवही त्यांना युद्धात हरवू शकत नाहीत. जेव्हा आचार्य युद्धात शस्त्रे खाली ठेवतील तेव्हाच त्यांचा वध होऊ शकतो. अश्वत्थामा मारला गेल्यास ते युद्ध करु शकणार नाहीत असे मला वाटते. कोणीतरी जाऊन त्यांना सांगावे की, अश्वत्थामा युद्धात मारला गेला.'' अर्जुनाला हे आवडले नाही पण युधिष्ठिर मात्र मोठ्या कष्टाने तयार झाले.

नंतर भीमाने आपल्याच सैन्यातील मालव–राजाचा अश्वत्थामा नामक विशाल हत्ती मारला. आणि मोठ्या कष्टाने द्रोणाचार्यांच्याजवळ जाऊन म्हटले की, 'अश्वत्थामा' मारला गेला.

हे एकून द्रोणाचार्य शोकाने व्याकुळ झाले. पुत्र वधाचा समाचार खरा की खोटा हे जाणून घेण्यासाठी युधिष्ठिराला विचारण्याचे द्रोणाचार्यांनी ठरविले. कारण युधिष्ठिर त्रेलोक्याच्या राज्यासाठी देखील असत्य बोलणार नाहीत असा द्रोणाचार्यांचा दृढ विश्वास होता.

श्रीकृष्णाच्या सांगण्यावरुन युधिष्ठिराने अर्धसत्य सांगितले, 'अश्वत्थामा मारला गेला' हे मोठ्याने सांगितले आणि 'हत्ती मारला गेला' हे हळू आवाजात बोलले.

पहिले अर्धवचन ऐकून आचार्य पुत्र शोकाने संतप्त झाले. पण जीवीताविषयी निराश मात्र झाले. त्यावेळी धृष्टद्युम्नाला समोर पाहूनही ते निष्क्रीय राहिले. अशा अवस्थेत असताना संधी साधून आचार्यांचे मस्तक खड्गाने कापून टाकले.

# अश्वत्थामा नारायणास्त्र सोडतो

पिता द्रोण यांच्या वधाचा वृत्तान्त ऐकून अश्वत्थामा शोक सागरात बुडाला. पण लगेच भानावर येऊन त्याने दृष्टद्युम्नाच्या कृत्याची निंदा केली. पण युधिष्ठिरालाही असत्य भाषणाबद्दल दोष दिला. क्रोधाच्या आवेशात

येऊन त्याने गर्जना केली, ''धृष्टद्युम्नाला व युधिष्ठिराला त्यांच्या दुष्ट कृत्याची फळे मिळतील. दोघांचेही रक्त पृथ्वी प्राशन करील.'' अशा शब्दात त्याने प्रतिज्ञा घेतली. आपल्याजवळ असलेल्या दिव्य नारायण अस्त्राने मी रणभूमीत पांडव, पांचाल अशा सर्वांचा नाश करीन अशी शपथच त्याने घेतली.

अश्वत्थाम्याचे उद्‌गार ऐकून कौरवसेना आनंदली. अश्वत्थाम्याने नारायण अस्त्राचा वापर करुन हाहाकार माजविला.

पण एवढ्यात कृष्ण पुढे आला. त्याने सर्वांना त्वरीत शस्त्रे खाली ठेवून आपल्या वाहनांवरुन खाली जमिनीवर उतरण्यास सांगितले. कृष्णाने सूचना दिली, ''भूमीवर नि:शस्त्र उभे राहिलेल्या तुम्हाला हे अस्त्र मारणार नाही. उलट जे कोणी मनाने का असेना त्याला प्रतिकार करतील तर ते अस्त्र त्यांना जिवंत ठेवणार नाही. भीम सोडून सर्व योध्दयांनी कृष्णाच्या सांगण्यावरुन आपापली शस्त्रे खाली ठेवली. पण अर्जुन व श्रीकृष्ण यांनी, कठोर शब्दात भीमाला सुनावल्यानंतर त्यानेही रथातून जमिनीवर उडी घेतली, तेव्हा कुठे ते नरायण अस्त्र शांत झाले.

कृष्णाने पुन्हा आपल्या युद्धनीतीने यातून मार्ग काढला व पांडव सैन्याला वाचविले. अश्वत्थामा चरफडत राहिला.

पण युद्ध समाप्तीनंतर याच द्रोण-पुत्राने द्रौपदीच्या पाचही मुलांना ते झोपलेल्या अवस्थेत असताना ठार केले. अश्वत्थाम्याने ब्रह्मास्त्राचा वापर केला. याच अस्त्राचा वापर करुन अभिमन्यूची पत्नी उत्तरा हीच्या गर्भाचाही नाश केला.

कृष्णाने आपल्या दैवी शक्तीने तो गर्भ सुरक्षित ठेवला. म्हणून जन्माला आल्यानंतर त्या मुलाचे नाव ठेवले परिक्षित. श्रीकृष्णाने अश्वत्थाम्याला शाप दिला, ''सर्व सत्पुरुष लोक तुला भ्याड म्हणतील. तुला बालहत्या करणारा पापी समजतील. या पापकर्माची तू फळे भोगशील. तू एकटाच या पृथ्वीवर भटकत राहशील. तुझ्या शरीराला दुर्गंध असल्यामुळे निर्जन स्थानांत एकटाच भटकत राहशील.'' असे म्हणून त्याच्या कपाळावरील तो मणी काढून घेतला. त्यामुळे जखम झालेल्या कपाळावरुन ते रक्त वाहत राहिले.

पांडवांना मणी देऊन अश्वत्थामा उदास मनाने वनात निघून गेला.



# कर्णवध

द्रोणाचार्यांच्या वधानंतर दुर्याधनाने कर्णाला सेनापती पदावर आरुढ केले. युद्धाचा हा सोळावा दिवस होता. सतराव्या दिवशी कर्णाचा वध झाला. म्हणजे केवळ दोनच दिवस तो सेनापती होता. परंतु या दोन दिवसात त्याने महापराक्रम केला.

कर्ण-अर्जुन युद्ध हेच या दोन दिवसांच्या युद्धाचे मुख्य लक्ष होते. दुसऱ्या दिवशी दुर्योधनाला त्यांनी आपली प्रतिज्ञा सांगितली की, एक तरी या युद्धात अर्जुन जिंकेल अथवा मी. असे सांगून दोघांच्याही शक्तीची तुलना केली. फक्त एवढेच की, अर्जुनाच्या रथाचे सारथ्य श्रीकृष्ण करतात. त्यामुळे अर्जुनाचेही रक्षण होते. कर्णाच्या रथाचे सारथ्य शल्यराजा करीत होता.

युद्ध सुरु झाले. कर्णाने घनघोर युद्ध केले. युधिष्ठिरासह इतर सेनापतीना जेरीस आणले. कौरवांच्या सेनापतीसमोर अर्जुन आपले संपूर्ण कौशल्य प्रकट न करत असल्यामुळे युधिष्ठिरांनी अर्जुनाला संतप्त होऊन दूषणे दिली. यामुळे व्यथित झालेल्या अर्जुनाने आपली संभ्रमावस्त्रा सांगून मला योग्य ते मार्गदर्शन करावे असे सांगितले.

पुन्हा एकदा कृष्णाने अर्जुनाला धर्माधर्म नीट समजावून सांगितला. अर्जुन शांत झाला. अर्जुनाने युधिष्ठिराची क्षमा मागितली व घोर प्रतिज्ञा केली की मी आज कर्णाचा निश्चित वध करेन. पण अर्जुनाची चिंता दूर झाली नव्हती. प्रत्यक्ष युद्धाच्या वेळी, तो चिंतेने व्याकुळ झाला. सूतपुत्र असला तरी कर्ण अर्जुनाचा भाऊच होता. त्याची ही अवस्था पाहून कृष्णाला पुन्हा एकदा धर्म-अधर्म, सत्य-असत्य याचा उपदेश करुन त्याला मनापासून युद्धास त्यांनी प्रवृत्त केले, प्रोत्साहीत केले. कृष्ण म्हणाले, ''गांडीवधारी अर्जुना ! तू आपल्या धनुष्याने भीष्म, द्रोण, भगदत्त.... अशा महारथींचा पराभव केलास. तुझ्याजवळ दिव्य अस्त्रे आहेत. मला तरी असे वाटते की कर्णसुद्धा तुझ्यासारखाच अतुल पराक्रमी, आहे. अर्जुनाशिवाय तो कोणाचाही पराभव करु शकेल म्हणून विनाकारण पांडवांना सोडून कौरवांच्या साथीने

लढणाऱ्या दुरात्मा, पापाचारी, क्रूर अशा कर्णाचा वध करुन धर्मराज युधिष्ठिराला प्रसन्न कर. याच कर्णाच्या आश्रयाने दुर्योधन स्वत:ला वीर मानतो त्यामुळे कर्णच सर्व पापांचे मूळ आहे. म्हणूनच पांडवाप्रती सदा पापबुद्धी ठेवणाऱ्या अत्यंत नीच कर्णाला आपल्या तीक्ष्ण बाणांनी मारुन टाक अशी मी तुला आज्ञा देतो.''

श्रीकृष्णांच्या या वचनाप्रमाणे अर्जुनाने अतामविश्वासाने सांगितले की यात माझाच निश्चित विजय होईल कारण तू माझ्यावर प्रसन्न आहेस.

कर्ण व अर्जुन यांच्यात भयंकर अस्त्रयुद्ध झाले. सर्व प्रकारच्या अमोघ शस्त्रांचा दोघांनीही वापर केला. आघात, प्रत्याघात, अस्त्र-प्रत्यस्त्र ..... चालूच होते. अशा वेळी कर्णाचा रथ डगमगू लागला. पण त्याने युद्ध चालूच ठेवले. काही वेळाने चाक पूर्णपणे रुतले. कर्णाने अर्जुनाला म्हटले, ''थाब मला हे फसलेले चक्र वर काढू दे. तू कसलाही कपट व्यवहार करु नकोस. जो युद्धातून विमुख झाला आहे, हात जोडून जो शरण आला आहे अशा पुरुषावर कोणीही सदाचारी व युद्ध धर्म जाणणारा योद्धा कदापीही प्रतिकार करणार नाही.''

कर्णाने असे आवाहन जेव्हा केले तेव्हा कृष्णानेच त्याचे उत्तर दिले ! श्रीकृष्ण म्हणाला,

''तेव्हा गेला होता कोठे राधासुता, तुझा धर्म ?''

या प्रसंगाने कृष्णाने आपली उत्कृष्ठ रणनीती तर सांगितलीच पण धर्म-अधर्म यांचा विवेकही स्पष्ट केला.ते म्हणाले, ''कर्णा, आता तुला धर्म आठवायला लागला ही मोठी भाग्याची गोष्ट आहे. नीच मनुष्य संकटात सापडल्यानंतर देवाचीच निंदा करतात, आपल्या कुकर्माची नाही. कृष्णाने कर्णाच्या पापकर्मांचा आणि अधर्माचरणाचा पाढा त्याच्यासमोर वाचला. कौरवांच्या प्रत्येक पापात तूच सहभागी होतास. तेव्हा त्या त्या वेळी तुझा धर्म कोठे गेला होता ? त्या प्रसंगी जर हा धर्म नव्हता तर आज येथे धर्माची ओरड करुन कंठ शोष का करतोस ? आता येथे कितीही धर्म कार्य करशील तरी जिवंतपणी तुझी सुटका होणार नाही.'' असे म्हणून अर्जुनाला आज्ञा दिली की, जोपर्यंत कर्ण रथावर बसत नाही तोपर्यंत त्याचे मस्तक



वेगळे करुन टाक. हे ऐकून अर्जुनाने सूर्यास्ताच्या वेळी एक अत्यंत तेजस्वी बाण सोडून कर्णाचे मस्तक धडापासून वेगळे केले.

कर्णाचा वध होताच पांडववीर हर्षभरीत झाले. श्रीकृष्ण कृतकृत्य झाला. कारण केवळ कर्णच अर्जुनाचा खरा प्रतिस्पर्धी होता. युधिष्ठिरानी याचे सर्व श्रेय कृष्णाला दिले.

## दुर्योधन वध

कौरवांना कर्ण वधानंतर आपण निराधार झाल्याची जाणीव होत होती. कृपाचार्यांनी दुर्योधनाला पांडवांशी संधी करावी असा सल्ला दिला. पण दुर्योधनाने तो सफशेल नाकारला. पण कृपाचार्यांना तो म्हणाला, ''आम्ही शरणागतीसाठी गेलो तरी पांडव व स्वत: कृष्ण हे स्वीकारणारच नाहीत कारण आम्ही त्यांच्याशी अत्यंत कपटनीतीने सर्वच व्यवहार केला आहे.'' सर्व अपराधांची दुर्योधनाने स्पष्ट कबुली दिली व अशा परिस्थितीत जो या सर्वांचे मूळ आहे अशा पापी माणसाला कोण क्षमा करील ? म्हणून आता उत्तम युद्धाच्या द्वाराच मी स्वर्गलोकाला जाईन.

युद्धाचा आज १८ वार दिवस उजाडला दुर्योधनाने महाधनुर्धर मद्रराज शल्याला कौरवांचा सेनापती बनवले. श्रीकृष्णाच्या सूचनेनुसार युधिष्ठिराने शल्याशी युद्ध केले. युद्धात युधिष्ठिराचा विजय होऊन शल्य मारला गेला. शेवटच्या दिवशी अर्जुन, भीम या सर्वांनीच महापराक्रम केला.

दुर्योधनाने कवच धारण केले, शिरस्त्राण घातले, गदा हातात घेऊन तो म्हणाला, ''पांडवांनो, तुमच्यापैकी कोणीही माझ्याशी गदायुद्ध करावे. मी कोणाशीही युद्धास तयार आहे. भीमसेनाने ते आव्हान ताबडतोब स्वीकारले. द्युतप्रसंगी भीमाने केलेल्या भीष्मप्रतिज्ञेची आठवण कृष्णाला झाली. भीमाची प्रतिज्ञा होती की, दुर्योधनाच्या मांड्या मी गदेने विदीर्ण करीन. कारण दुर्योधनाने द्रौपदीची विटंबना केली होती. श्रीकृष्णाचा अभिप्राय अर्जुनाच्या लक्षात आला व त्याने भीमसेनाला तसा संकेत दिला.

भीमसेनाने यानुसार दुर्योधनाशी घनघोर युद्ध केले. भीमाने मांड्यावर प्रहार केले. गदा वज्राप्रमाणे प्रहार करत होती. थोड्याच अवधीत दोन्ही

मांड्याचा चक्काचूर झाला. दुर्योधन जमिनीवर पडला. याही परिस्थितीत दुर्योधनाने कृष्णाला दोष दिला. दुर्योधनाने श्रीकृष्णाला या भीमाच्या कृत्याबद्दल दोष दिला. कृष्णावर आक्षेप घेताना, दुर्योधन म्हणाला, ''भीमाला माझ्या मांड्या तोडण्याचा संकेत देण्यास तूच अर्जुनाला सांगितलेस. भीष्म, द्रोण, कर्ण यांना कसे मारवलेस ते मला ज्ञात नाही काय ? या सर्वांशी सरळ रितीने तुम्ही युद्ध केले असते तर खचितच तुमचा विजय झाला नसता.''

दुर्योधनाच्या आक्षेपांना श्रीकृष्णांनी शांतपणाने, गंभीर वाणीने सविस्तर उत्तर दिले. ''दुर्योधना, तू पापाच्या मार्गावर पाऊल ठेवले होतेस म्हणूनच इतरांसारखाच तूही मारला गेला आहेस. वीर भीष्म आणि द्रोणाचार्य तुझ्या दुष्कर्मामुळेच मारले गेले आहेत. कर्ण देखील तू म्हणशील त्याप्रमाणे दुष्कर्म करीत होता. अरे मूढा ! तू शकुनीचे मत मान्य केलेस व मी मागितलेली पांडवांच्या पैतृक संपत्तीची पाच गावे सुद्धा द्यावयास नकार दिलास, भीमाला विष चारलेस, लाक्षागृहात जाळण्याचा प्रयत्न केलास, द्युत प्रसंगी द्रौपदीचा अपमान व छळ, अभिमन्यूचा अधर्माने वध..... या सर्वच कारणांसाठी तूही आज मारला गेला आहेस. तू आता आमची अनुचित कार्ये म्हणून जी दाखवीत आहेत ती सर्व तुझ्या महान दोषांमुळेच केली गेली आहेत. तू अत्यंत प्रबळ लोभ आणि तृष्णा यांना वश होऊन न करण्यायोग्य कार्ये केली आहेस. त्याचा परिणाम आता तूच भोग.'' यानंतर मात्र दुर्योधन काहीही बोलला नाही.

दुर्योधनाच्या आक्षेपामुळे पांडवसुद्धा चलबीचल झाले होते. शोकाकुल व चिंतामग्न झालेल्या पांडवांना सुद्धा श्रीकृष्णाने आपल्या अमोघ वाणीने समजावले, ''ज्यांना तुम्ही मारलेत ते सर्व महारथी होते. त्यांना धर्मानुकूल सरलतापूर्वक युद्धाने तुम्ही मारु शकला नसता. तुमचे हित इच्छिणाऱ्या मीच माझ्या शक्तीचा वापर करुन अनेक उपायांनी युद्धभूमीत त्यांचा वध केला. मी जर असे केले नसते तर तुम्हाला तुमचे न्याय हक्क म्हणून विजय, राज्य, धन कसे प्राप्त झाले असते ? हे मारले गेलेले सर्व योद्धे महाबली होते. दुर्योधनसुद्धा युद्धात थकणारा नव्हता. याला दंडधारी काळ सुद्धा धर्मानुकूल युद्धाने मारु शकला नसता. पुष्कळसे अतिशक्तीशाली शत्रू नाना



प्रकारच्या कूट नीतीनेच मारण्या योग्य असतात. असुरांचा नाश करणाऱ्या देवादिकानी याच मार्गाचा अवलंब केला आहे. श्रेष्ठ पुरुष ज्या मार्गाने गेले त्याचे अनुसरण सर्व लोक करतात. म्हणून तुम्ही कोणत्याही प्रकारे अपराधी नाही हे पक्के लक्षात ठेवा. दुष्टांच्याविषयी अतिरेकी आणि अनाठायी दया अयोग्य आहे. आणि धर्माच्या विजयासाठी क्वचित अधर्माचाही अवलंब करावा लागतो.''

अशी विवेक व नीती कृष्णाने पांडवांना सांगितली. हे सर्व ऐकून पांडव नि:शंक झाले. प्रसन्नतेने सर्वांनी श्रीकृष्णाला कृतज्ञतेने अभिवादन केले.

अशा तऱ्हेने दुर्योधनाचाही अंत झाला. कृष्णाने आपल्या युद्ध नीतीने कुरुक्षेत्रावरील महाभारत युद्ध जिंकले. कृष्णाने निर्णय घेतले व अर्जुन, भीम, युधिष्ठिर..... या सर्वांनी त्याची कार्यवाही केली. अर्जुनाच्या रथाचे केवळ सारथ्य केले नाही. तर संपूर्ण युद्धाचेच सारथ्य केले. म्हणून संजयाने म्हटल्याप्रमाणे, जेथे कृष्ण व जेथे अर्जुन तेथेच श्री विजय, ऐश्वर्य, नीती हे असणारच. कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र झाले. धर्माच्या सज्जनांच्या रक्षणासाठीच हा असुरांचा नाश झाला. कृष्णाने आधीच अर्जुनाला सांगून टाकले होते की मी या सर्वांना आधीच मारले आहे. तू फक्त निमित्तमात्र हो. पांडवांना निमित्त बनवून श्रीकृष्णाला धर्म स्थापना करावयाची होती.

## श्रीकृष्ण हस्तिनापुरला जातात.....

१८ व्या दिवशी पांडवांनी युद्ध जिंकले. यानंतर सर्व पांडव कृष्णासह आपल्या शिबिरांकडे प्रस्थान पावले. जातांना एक अभूतपूर्व घटना घडली. सर्वजण आपापल्या रथातून उतरत होते. तेव्हा कृष्णाने अर्जुनाला आपल्या गांडीव धनुष्यासह उतरावयास सांगितले. याप्रमाणे अर्जुन आपल्या धनुष्य व भात्यासह खाली उतरला. श्रीकृष्ण जेव्हा रथातून खाली उतरले तेव्हा तो विशाल रथ अचानक पेटून भस्मसात झाला. सर्व पांडव चकीत झाले. अर्जुनाने कृष्णाला या अचानक जळण्याचे रहस्य विचारले.

कृष्ण म्हणाले, ''हा रथ नाना प्रकारच्या अस्त्रांनी पूर्वीच दग्ध झाला

होता. परंतु माझे अधिष्ठान राहात असल्यामुळे तो युद्धभूमीवर भस्म होऊ शकला नाही. आज तुझे कार्य पूर्ण झाल्यावर मी रथाला सोडले. म्हणून ब्रह्मास्त्रांच्या तेजाने पूर्वीच दग्ध झालेला हा रथ आता नष्ट होऊन गेला. तुम्ही सर्वजण युद्धातून वाचलात ही नीयतीची मोठी कृपा आहे.''

हे ऐकून युधिष्ठिरसुद्धा कृतज्ञतेने कृष्णाला म्हणाला, ''द्रोणाचार्य व कर्ण यांनी ज्या ब्रह्मास्त्रांचा प्रयोग केला होता त्याला तुझ्याशिवाय अन्य कोणीही प्रतिकार करु शकला नसता. तुझ्याच अनुग्रहाने सर्वांच्यासह अर्जुनही युद्धात कधीही पराङमुख झाला नाही. त्याला कधीही अपयश पाहावे लागले नाही. तुझ्याचमुळे आमच्या कार्याची सिद्धी झाली आहे. पूर्वी उपप्लव्य नगरात कृष्ण द्वैपायनाने मला सांगितले होते की, ''यतो धर्मः ततः कृष्णो यतः कृष्णो ततो जयः।'' याप्रमाणे ''जिथे धर्म तेथे कृष्ण व जिथे कृष्ण तेथे जय' हेच आम्ही युद्धात अनुभवले.''

युधिष्ठिराच्या सांगण्यावरुन दुसऱ्या दिवशी, गांधारी व धृतराष्ट्र यांना भेटून सान्त्वना करण्यासाठी कृष्ण हस्तिनापुरला गेले. गांधारीला व धृतराष्ट्र ाला भेटण्याचे व त्याना शांत करण्याचे काम दुसऱ्या कोणीही केले नसते.

त्या ठिकाणी कृष्णानी हे कार्य कसे केले व त्यात आपले वर्तन व केलेले भाषण हा त्यांच्या नीती-निपुणतेचा एक आदर्श नमुना आहे. शिष्टाईच्या प्रसंगी केलेल्या भाषणाप्रमाणे प्रभावकारी आहे.

दोघांना भेटून शांत करण्याचा प्रयत्न कृष्णाने केला. काही वेळाने कृष्ण धृतराष्ट्राला म्हणाले, ''सर्व पांडव नेहमी तुझ्या इच्छेनुसार वागणारे आहेत. आपल्या कुळाचा व क्षत्रिय समुहाचा विनाश होऊ नये म्हणून त्यांनी पुष्कळ प्रयत्न केला. आपल्या पैतृक संपत्तीची मागणी त्यांनी केली. तरी त्यांना कपटाने, द्युतात हरवून वनवासाला पाठविले. अज्ञातवास घडल्यामुळे खूप यातना त्यांना सोसाव्या लागल्या.

''युद्धाचा अवसर प्राप्त झाला तेव्हा मी स्वतः येऊन शांती स्थापन करण्याचा पूर्ण शक्तीनिशी प्रयत्न केला. त्यासाठी सर्व लोकांच्या समक्ष तुझ्याजवळ केवळ पाच गावे मागितली होती. पण पुत्रप्रेमाचा मोह व लोभ यामुळे तू पाच गावेही दिली नाहीस. या तुझ्या अपराधाने सर्व क्षत्रियांचा



विनाश झाला. भीष्म, द्रोण, कृप व विदुरानेही तुझ्याजवळ शांतीची याचना केली होती पण तेही तू केले नाहीस.

यामुळे सर्व अपराधांचे मूळ तूच आहेस. आता निदान पांडवावर तरी दोषारोपण करु नकोस. धर्म, न्याय, नीति या कोणत्याही दृष्टीने पांडवांचा यात थोडासाही अपराध नाही. त्यामुळे पांडवांप्रती निदान यापुढे कोणतीही दोषदृष्टी ठेऊ नकोस.

युधिष्ठिराच्या मनात तुझ्याविषयी किती भक्ती व स्नेह आहे ते तू जाणतोसच. आपल्या अपराधी शत्रूंचा संहार करुन तो शोकाग्नीत जळत आहे. त्यामुळे तो अशांत आहे. आता यापुढे तुम्हा दोघानाही त्यांचाच आधार आहे.

गांधारीशी बोलताना कृष्ण म्हणाले, ''तुझ्यासारखी तपोबल स्त्री दुसरी कोणी नाही. माझ्या समक्ष तू दोन्ही पक्षाना हितकारक व धर्म, नीतीयुक्त असा उपदेश तू केला होतास. पण दुर्दैवाने पुत्रांनी तो मानला नाही. तू दुर्योधनाला कठोरपणे म्हणाली होतीस की, ''जेथे धर्म असतो तेथेच विजय असतो.'' ''तुझे तेच वचन आज सत्य ठरले आहे. असे जाणून तू आता शोक करु नकोस.''

दोघानीही कृष्णाची सर्व वचने लक्ष्यपूर्वक ऐकली. गांधीरीने कृष्णाला कृतज्ञतापूर्वक सांगितले, ''तू जे म्हणतोस ते यथार्थ आहे. तीव्र शोकामुळे आमची बुद्धी विचलीत झाली होती पण, तुझी ही सान्त्वनापर केलेली वाक्ये ऐकून बुद्धी स्थिर झाली आहे. क्रोध शांत होत आहे. आता सर्व पांडवासमवेत तूच आमचा आधार आहेस.''

श्रीकृष्ण कृतकृत्य होऊन हस्तिनापूरहून निघाले आणि पांडवांच्याकडे आले. त्यांना भेटून त्यांनी सर्व समाचार सांगितला.

## श्रीकृष्ण-गुणदर्शन

श्रीकृष्ण मनुष्यावतारात या जगात अवतरला. अलौकिक दैवी शक्ती असताना सुद्धा त्याचे प्रकटीकरण प्रत्येक ठिकाणी त्याने केले नाही. सर्वांच्यात

सर्वासारखा वागला. सर्वांच्या सुखदु:खात आत्मीयतेने भाग घेतला. बालपणापासून अखेरच्या क्षणापर्यंत धर्मसंस्थापना, दुर्जनांचा नाश व सज्जनांचे रक्षण या अवतार कार्यापासून कुठेही ढळला नाही. हे अलौकिक कार्य करताना जी नीती सर्वत्र वापरली त्याचे एकच कारण कृष्णाचे अलौकिक, आदर्श गुण ! या गुणांप्रमाणेच कृष्णाचे आचरण होते ! एकाच पुरुषामध्ये अशा दिव्य गुणांचा अविष्कार एकाच जन्मामध्ये होणे दुर्लभ आहे. मानवी इतिहासात अशा अलौकिक गुणांनी मंडित असलेले जे महान पुरुष होऊन गेले, त्यात कृष्णासारखा युगपुरुष एखादाच.

कृष्णाने संपूर्ण मानवजातीला जे तत्वज्ञान दिले त्याचा आधार हे महान गुणच होते. ते तत्त्वज्ञान प्रत्यक्ष जगून दाखविले. या गुणांचा अविष्कार कृष्णाच्या आचारधर्मात झाला आहे. म्हणून ते तत्वज्ञान गीतेच्या रुपाने प्रकट झाले व गीता हा जीवन ग्रंथ बनला. म्हणून जोवर पृथ्वीवर मनुष्यजात अस्तित्वात आहे तोपर्यंत हे तत्वज्ञान व कृष्णाचे गुण दीपस्तंभासारखे अखिल मनुष्यजातीला मार्गदर्शन करीत राहील.

अर्जुनाला निमित्त बनविले पण खरे म्हणजे आपण सर्वचजण अर्जुन आहोत. गीता हा गुणदर्शनाचा ग्रंथ आहे. म्हणून जे गुण माणसाला विषादापासून दु:ख, नैराश्यापासून प्रसन्नतेकडे नेतील अशा गुणांची चर्चा निम्म्या-अधिक श्लोकात केली आहे. हे गुण धारण करुनच कृष्णाने आपली जीवन नीती घडविली. व हे सिद्ध करुन दाखविले की, याच जीवननीतीनेच मनुष्याला धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांची प्राप्ती होऊ शकते. अभ्युदय म्हणजे भौतिक विकास व नि:श्रेयस म्हणजे परमार्थ प्राप्ती या दोहोंची पूर्ती घडू शकते. मनुष्याच्या जीवनाची कृतार्थता या गुणांमुळे प्राप्त होऊ शकते. म्हणून श्रीकृष्णाच्या गुणांचे अवलोकन करणे हे त्याच्या नीती धर्माच्या संदर्भात आवश्यक आहे.

कृष्णाच्या गुणांमुळेच तो आबालवृद्धांच्या आकर्षणाचा विषय ठरला होता. म्हणूनच कर्षति इति कृष्ण: । जो आकर्षून घेतो तो कृष्ण असे नामाभिधान झाले. आणि हे आकर्षण जसे गोकुळातल्या सर्व थरातल्या गोप-सवंगड्याना झाले तसे ते गोपीनाही झाले. राम व कृष्ण हे भारतीयांच्या



श्वासात आहेत. पण अखिल जगतातील लोकांनाही आपल्या तत्वज्ञानाने आकर्षित करुन घेतले आहे.

या गुणांनी जीवन आचरुन पांडव यशस्वी झाले व यातील एकही गुण ज्यांनी धारण केला नाही त्यांचा पराभव झाला. दैवी गुणांचा विजय झाला व असुरी गुणांचा केवळ पराभव नव्हे तर नाश झाला. आजही जगाची विभागणी या दोनच प्रकारच्या गुणांमध्ये झाली आहे. घड्याळाच्या लंबकाप्रमाणे कधी आसुरी शक्तीचे प्राबल्य वाढते तर कधी सत्य, अहिंसा, प्रेम, सज्जनता.... या मानवी मूल्यांची प्रभा झाकोळली जाते. पण इतिहास मात्र साक्ष देतो की, शेवटी सत्याचाच, सज्जनतेचाच विजय होतो.

याचसाठी कृष्ण नीतीचा विचार करताना या गुणसंपदेचे निदान विहंगावलोकन करणे आवश्यक आहे.

कृष्ण अर्जुनाच्या रथाचा सारथी होता. रथरुपी देहाचे सारथ्य सुद्धा बुद्धीच करते. बुद्धी स्थिर व विवेकी असेल तर रथ राजमार्गावरुन चालतो व बुद्धी भ्रष्ट झाली की, रथ कोलमडतो. आयुष्याचा नाश होतो. संपूर्ण महाभारतात श्रीकृष्णाच्या अचाट बुद्धीवैभवाचे दर्शन घडते. एकटाच शिष्टाई करण्यासाठी जातो. धृतराष्ट्र, भीष्म, कर्ण, द्रोण यासारख्या महारथींना आपल्या शब्द सामर्थ्याने व प्रभावी भाषणांने युद्धापासून परावृत्त करण्यात यशस्वी होतो. सर्वांनी कृष्णाच्या बाजूने कौल दिला. प्रत्येकाने दुर्योधनाला समजावले पण दुर्योधन एक तसुभरही ढळला नाही. सुईच्या अग्रावर राहील एवढी जमीन देण्यासही जेव्हा तो तयार झाला नाही तेव्हा युद्ध अटळ ठरले.

शस्त्र धारण न करताही केवळ बुद्धीसामर्थ्यावर पांडवांना सर्व अडचणींच्या प्रसंगातून सोडविले. मग तो लाक्षागृहातला प्रसंग असो किंवा सुभद्राहरणाच्या वेळचा यादवांचा संताप, शांत करण्याचा प्रसंग असो. प्रत्येक वेळी प्रसंगाचे चित्रच बदलून टाकले. महाभारतात अशा प्रकारचे खूप प्रसंग आहेत. कार्य-अकार्य, नीती-अनीती, प्रवृत्ति-निवृत्ती, सत्य-असत्य, धर्म-अधर्म अशा अनेक द्वंद्वातून नेमके हितकारक सत्य शोधन करण्याचे अचाट सामर्थ्य कृष्णाच्या विवेक बुद्धीत होते.

कृष्ण म्हणजे निर्भयता. म्हणून अभयाला कृष्णाने सर्व गुणात प्रथम

स्थान दिले आहे. बालपणापासून देह सोडण्याच्या अखरेच्या क्षणापर्यंत कृष्ण कोठेही, कधीही घाबरला नाही. इंद्रपूजा सोडून गोवर्धन पूजा सुरु करण्यासारखा प्रसंग असो नाही तर कालिया मर्दनाचा प्रसंग असो, बालपणात तो कोठेही डगमगला नाही. मोठेपणी कंस, जरासंघ या सारख्या असुरी प्रवृत्तीच्या दुष्टांचा संहार करण्यात कुठेही कचरला नाही. कधी युक्तीने तर कधी बुद्धीने पण निर्भयतेने सर्व प्रसंगाना कृष्ण सामोरे गेले. अर्जुनाला युद्धात गर्भगळीत झालेला पाहून प्रत्येक वेळी त्याला कधी कठोर शब्दात, तर कधी स्नेह प्रेमाने त्याला भयभीत अवस्थेतून शूर-वीर भूमिकेत आणायचे. भीतीनेच दुर्बलता व नैराश्य येते दुर्बलता हाच मृत्यू व बल हेच जीवन हा कृष्ण जीवनाचा सिद्धान्त आहे. व्याधाचाबाण लागलेला असताना न घाबरता निघून जाण्याचा सल्ला व्याधाला दिला. अशा निर्भयतेनेच धर्म संस्थापनेचे कार्य कृष्णाला करता आले.

जशी निर्भयता तशीच नम्रता. राजसूय यज्ञात कृष्णाने पत्रावळ्या काढल्या. पांडवांचा खूप आग्रह असतानासुद्धा यज्ञाचे यजमानपद स्विकारले नाही. उलट गुरु-जनांचे पाय धुण्यापासून पडेल ते काम अत्यंत नम्रतेने केले. एवढी राज्ये जिंकली पण कुठेही गर्व तर नाहीच पण नम्रताने ते ते राज्य योग्य त्या वारसांच्या हाती निष्काम भावनेने परत केली. महाभारतातील पानापानात कृष्णाच्या या सर्व गुणांचे व्यासानी वर्णन केले आहे. हे सर्व गुण मनुष्याला आपल्या जीवनात आणणे शक्य आहे. हे केवळ अवतार पुरुषांनीच धारण करायचे नाहीत. यातील एकेका गुणानी माणसाचे जीवन परिपूर्ण होऊ शकते. आज २१ व्या शतकात, या गुणांची आवश्यकता या जगाला निर्माण झाली आहे. जीवनात पुरुषार्थ करण्यासाठी जशी या गुणांची गरज आहे तशीच जीवन सुखी करण्यासाठी सुद्धा हे गुण आवश्यक आहेत. नम्रता असलेला सधन किंवा सज्ञानी पुरुष, हा परिपक्व फळांनी बहरलेल्या पण फळांच्या भारानी झुकलेल्या फांद्यासारखा असतो. अभिमान असावा पण दुराभिमान मात्र हानीकारक असतो. आपल्याजवळ असलेल्या ज्ञानाचा, सत्तेचा अभिमान जरुर असावा पण त्याबरोबर नसलेले गुण सुद्धा आहेत म्हणून भासविणाऱ्या दांभिक माणसांना खरे सुख कधीच प्राप्त होत नाही.



खऱ्या ज्ञानाने माणसाला खरोखर नम्रता येते. जसे फुल पूर्ण उमलले की, त्याचा सुगंध आपसुक सर्वत्र दरवळतो, भुंग्याना सांगावे लागत नाही.

## व्यवहार निपुण श्रीकृष्ण

तत्वज्ञानी व्यवहारात कच्चा असतो असे म्हणण्याचा प्रघातच आहे. पण कृष्णासारखा तत्वज्ञ व्यवहारात अत्यंत कुशल होता. समोरच्या माणसाला अचूक ओळखून, समयसूचकतेने त्याच्याशी योग्य तो व्यवहार करण्याची कृष्णाची नीती होती. द्रोणांची दुर्बलता नेमके ओळखून, अश्वत्थामा मरण पावला हे सांगण्यासाठी केवळ धर्मराजाची योजना केली. कारण द्रोणांचा पूर्ण विश्वास सत्यनिष्ठ, तत्वनिष्ठ अशा धर्मराजावरच होता. म्हणून 'नरो वा कुंजरा वा' असे बोलायला भाग पाडले. कृष्णानेच हे व्यवहार चातुर्य दाखविले. राजसूय यज्ञाच्या वेळी युधिष्ठिराने कृष्ण-विचाराप्रमाणे यज्ञाचे यजपानपद घेतले. अर्जुनाने सुभद्राहरण केले तेव्हा, यादवांचा क्रोधाचा पारा खूप चढला होता पण कृष्णाने यादवांचे हीत हे स्वीकारण्यातच कसे आहे हे समजावल्यामुळे यादव शांत झाले व शेवटी सुभद्रेचा विवाह थाटामाटात यादवांनी आनंदाने केला. कोणत्याही धर्मसंकटात अचूक मार्ग काढण्याचे हे विवेक कौशल्य केवळ कृष्णात होते. गीतेसारखा वैश्विक ग्रंथ लिहिणारा तत्वज्ञ श्रीकृष्ण व्यवहारकुशल होता. म्हणूनच कृष्णाची राजनीती यशस्वी झाली.

याचे आणखीन एक उदाहरण म्हणजे कृष्णाच्या व्यावहारिक बुद्धीमत्तेचा एक उत्कृष्ठ नमुनाच आहे. काहीही झाले तरी कुरुक्षेत्रावरील धर्मयुद्ध कृष्णाला विजयी करायचे होते. ज्यावेळी युद्धनिर्णय झाला तेव्हा दुर्योधन व अर्जुन कृष्णाला भेटावयास आले. त्यावेळची रुढी अशी होती की, जो प्रथम यायचा त्याला मदत मागण्याचा पहिला हक्क. या रिवाजाप्रमाणे दुर्योधन प्रथम आला होता. म्हणून कृष्णाच्या विचारण्यावरुन दुर्योधनाने आपला हक्क मागितला. श्रीकृष्णाने दुर्योधनाची दुष्ट चाल ओळखली होती. अत्यंत मुत्सद्दीपणाने कृष्णाने दोघांसमोर प्रस्ताव ठेवला. ''तुमच्यापैकी एकाने यादवसैन्य पसंत करावे व दुसऱ्याने मला पसंत करावे. पण एक गोष्ट निश्चित की, युद्धामध्ये मी हातात शस्त्र घेणार नाही व कोणाशीही युद्ध

करणार नाही.'' दुर्योधनाने याचा विचार करुन क्षणात यादव सैन्याची मागणी केली व अर्जुनाने कृष्णाला आपल्या रथाचे सारथ्य दिले. युद्धाचा विजय या नीतीतच निश्चित झाला.

संजय शिष्टाईचा दुष्ट हेतु ओळखून कृष्णाने धृतराष्ट्राला सडेतोड उत्तर दिले व त्यांचा कुटिल डाव उधळला. धृतराष्ट्राने संजयाकरवी युधिष्ठिराला संदेश पाठविला होता, ''माझे सर्व पुत्र तुमच्यासारखे सज्जन नाहीत. न्याय नीतीचा त्यांचा काहीच संबंध नाही. पण तुम्ही तसे नाही आहात. तुम्ही धर्माचरण करणारे सज्जन आहोत. दुर्योधनासारख्या कपटी माणसाशी युद्ध करण्यापेक्षा, तुमच्यासारख्या सज्जन माणसांनी जीवनाच्या अंतापर्यंत धर्माचरण सोडू नये. कुळाचा नाश करण्यापेक्षा योगक्षेमासाठी भीक मागून पोट भरण्याइतका दुसरा योग्य व्यवहार कुठलाच नाही.'' पांडवांना निष्क्रीय करुन युद्धापासून परावृत्त करण्याचा डाव श्रीकृष्णाने अचूक ओळखला व सणसणीत संदेश देऊन संजयाला धृतराष्ट्राकडे पाठविले. कृष्णाचा संदेश असा... ''आम्ही कार्याकार्य, धर्म–अधर्म, न्याय व नीती बरोबर ओळखतो. यासाठी क्षत्रिय या नात्याने आपल्या सख्या भावाबरोबर लढायला मागे–पुढे पाहणार नाही. नीतीवान पांडवात अधर्मीयांचा नाश करण्याची पूर्ण शक्ती आहे. ते तुमच्याशी युद्धाला तयार आहेत.''

कृष्ण तेथे नसते तर धर्मराजाने कुळाचा नाश टाळण्यासाठी युद्धही टाळले असते. संपूर्ण महाभारतात अशा अनेक प्रसंगी कृष्णाने आपल्या बुद्धीचातुर्याने व व्यवहार नीतीने पांडवांना वाचविले आहे.

# कृष्णाची मानवतावादी भूमिका

बालपणापासून कृष्णाच्या मनात समता, बंधूता, प्रेम अशा मुल्यांचा अविष्कार झाला होता. नंदराजाचा मुलगा म्हणून वावरताना त्याने कधीही मोठेपणाचा अभिमान बाळगला नाही. गोप–सवंगड्यांच्या सुखदु:खात पूर्णपणे समरस होऊन खेळ खेळायचा, केवळ त्यांना लोणी, दूध मिळत नाही म्हणूनच चोरी करायचा व त्यांनी पोटभर खाल्ले की, बालकृष्णाला समाधान व्हायचे. कोण गरीब, कोण श्रीमंत याचा भेदभाव त्याच्या मनी नसायचा.



नंदाचा पोर म्हणून, गवळीणीची दूषणे व तक्रारी यशोदामातेला ऐकायला मिळायची पण या बालकृष्णाला वाटायचे की, गोकुळातल्या मुलांना पुरेसे दूध न ठेवता हे सर्व दूध मथुरेच्या बाजारात जायचे व त्याचा निषेध म्हणूनच डोक्यावरच्या हंड्यांना दगड मारुन ते फोडायचे.

कृष्ण तसा मोठा होत चालला, तसा अन्यायाबद्दल अत्याचाराबद्दल कणव घेऊन सर्वांशी दोन हात करायचा. मग कालिया नाग असो नाहीतर पुतना मावशी.... सर्व पराक्रम कृष्णाने केले ते या अन्यायाविरुद्ध.

कृष्णाने स्वार्थापोटी काहीच केले नाही. एवढी युद्धे केली पण कोणाही सज्जनाला कधीही दुखावले नाही. शिशुपालाची शंभर पापे होईपर्यंत त्याला सुधारण्याची संधी दिली व पापे भरल्यानंतरच त्याचा वध केला. कंस, जरासंघ या सर्वांविरुद्ध हीच नीती वापरली. सर्व ठिकाणी विजय मिळविला पण कधीही सत्ता, संपत्तीची अपेक्षा केली नाही. सर्व ठिकाणी निष्काम भावनेने कर्म केले. युद्धामुळे होणारी हिंसा टाळण्यासाठी जेवढी म्हणून शिष्टाई करता येईल तेवढी कृष्णाने केली पण दुर्योधनाने जेव्हा सुईच्या अग्रावर राहील एवढीही जमीन देण्यास नाकारले तेव्हाच कुरुक्षेत्रावरील कौरव पांडवांचे युद्ध अटळ ठरले.

नरकासुराचा वध त्याच्या अधर्मी, अन्यायी क्रूरता यामुळेच घडला. अनेक राजांच्या सुंदर मुलींना हरण करुन नरकासुराने त्यांना बंदिवान करुन ठेवले. रावणाची परंपरा तो चालवीत होता. नरकासुर हा मानवतेचा शत्रू होता म्हणूनच कृष्णाने त्याचा वध करुन सर्वांना बंदिखान्यातून मुक्त केले. त्यावेळच्या सामाजिक स्थितीप्रमाणे या मुलींना त्यांचे त्यांचे माता–पिता घरी घ्यावयास तयार नव्हते, समाजही त्यांना स्वीकारत नव्हता. अशा तिरस्कृत झालेल्या स्त्रीयांना शेवटी कृष्णाने विवाह करुन त्यांना पत्नीचे स्थान दिले. सन्मान दिला. केवळ त्यांना आत्महेत्यापासून, वेश्यावृत्तीपासून बचावण्यासाठी कृष्णाने समाजात मान्य असलेला हा सन्मान मिळवून दिला. यात कृष्णाची केवळ मानवतावादी वृत्ती होती. गोकुळातल्या गोपी व अशा हजारो अपहृत स्त्रीयांच्या बाबतीत विरोधकांकडून होणारे आक्षेप हे कपोल कल्पितच आहेत. रासक्रीडा करताना किंवा गोकुळ जेव्हा

कृष्णाने कायमचे सोडले त्यावेळी त्याचे वय अवघे अकरा वर्षांचे होते.

कृष्णावर होणारे इतर आरोपसुद्धा अशाच पद्धतीचे आहेत. जरासंघ, भीष्म, द्रोण, कंस अशांचा वध कृष्णाने कपटनीतीने केला असाही एक आरोप आहे. पण ही नीती कृष्णाने का वापरली याचा वस्तुनिष्ठ भूमिकेतून विचार केला तर हे दोषारोपण व्यर्थ आहे असाच निर्णय होईल. या वधात कृष्णाने 'शठं प्रति शाठ्यम' ही नीती वापरली. कारण या पेक्षा उदात्त नीती कोणती असणार ? आपण चुकीचा मार्ग अगतीकतेने निवडला आहे हे भीष्म, द्रोण यांना पक्के माहीत होते व त्याच्या परिणामाची पूर्ण कल्पना त्यांना होती. या नीतीशिवाय जरासंघ, कंस यांच्या विरुद्ध दुसरी कोणती नीती वापरणार ? कारण ते कोणत्याही परिस्थितीत बदलायला तयार नव्हते.

हे सर्व करण्यात सज्जनांचे रक्षण व दुष्टांचे निर्मुलन, मानवतावादी दृष्टीकोन एवढाच मुख्य हेतू होता.

## कृष्णाची रणनीती

श्रीकृष्ण पूर्णपुरुष, पूर्णावतार, चारित्र्यसंपन्न, निष्कलंक, अनासक्त, निष्काम, निर्लोभी, निरहंकारी, प्रतिभाशाली, तत्वज्ञ, मुत्सद्दी, दयावान, सत्पुरुष होता. या युगपुरुषाचा जन्म मनुष्यरुपात झाला व सर्व सुखदु:खाचे आयुष्य त्याने याच मनुष्य विकाराप्रमाणे व्यतीत केले. कृष्णालाही नीयती, प्रारब्ध व ईश्वरीय नियम याप्रमाणेच नियोजित जीवन जगावे लागले. देह सोडायच्या वेळी जे व्हायचे तेच झाले. कुठेही त्याने दैवी शक्तीचा वापर करुन दीपवले नाही. तसे असते तर युद्ध तरी का करायचे ? एका क्षणात युद्ध संपविले असते. मनुष्यावतारात कृष्ण जगला म्हणूनच कृष्णाचे गुण अनुकरणीय झाले. कृष्णानंतर याच गुणांमुळे या धरतीवर अनेक संत, माहात्मे, विभूती होऊन गेल्या व त्यांनी मानवतेचे महान कार्य केले. या सर्वांच्या विचारांची, चिंतनाची गंगोत्री ही राम-कृष्ण यांच्या तत्वज्ञानातच आहे.

असे असूनसुद्धा कृष्णाच्या युद्धनीती संदर्भात काही आक्षेप, टीकाकार



घेत असतात. काही आक्षेपांचा आपण आधीच समाचार घेतला आहे. काहींचा आता घेऊ.

दुर्योधन, दु:शासन हे खलपुरुष होते. अशा असुरी दुष्टांचा संहार करण्यासाठी हाती शस्त्र न घेता केवळ या नीतीच्या आधारे त्यांचा वध केला हे एकवेळ समजू शकते. पण सज्जनांचे रक्षण करणाऱ्यांनी, भीष्म, द्रोण अशा सद्गुणसंपन्न सत्प्रवृत्त गुरुजनांचा संहार या कपटनीतीच्या आधारे केला हे 'परित्राणाय साधूना' या वचनाच्या विरुद्ध आहे असा आक्षेप घेऊन हे वर्तन नीतीत बसत नसल्याबद्दल वारंवार सांगण्यात येते.

कर्ण, भीष्म, द्रोण हे सर्वजण कृष्ण व अर्जुनाचे नात्याचे संबंधी होते. याचा विचार कृष्णाने या रणनीतीत केला नसेल का ? वध करण्याआधी या महापुरुषांना कृष्ण-अर्जुनाने वारंवार प्रणाम केला आहे. शिष्टाईच्या वेळी या सर्वांनी कृष्णाचे सांगणे मान्य केले होते. दुर्योधनाला या सर्वांनी समजावले होते.

पण हे सर्वजण दुर्योधनाचे आश्रित होते. ते सर्वजण सिद्ध पुरुष होते. दैवी शक्तीने मंडित असलेले शूर योद्धे होते. पण आपली शक्ती ते दुष्टांच्या, खलपुरुषांच्या विजयासाठी वापरत होते. म्हणून दुर्योधनाला आपल्या विजयाची खात्री होती. कृष्णाने ही नीती वापरली नसती तर सज्जनांचे रक्षण झाले नसते. धर्मासाठी अधर्माचा वापर केला तो याच कारणामुळे. आपण न्याय व सत्याच्या पक्षाचा आधार घेतलेला नाही याची जाणीव या महापुरुषांना होती. म्हणूनच कृष्णाने या सर्वांना सर्वपरीने हा अनीतीचा पक्ष सोडावा असे समजावले होते. पण हे सर्व प्रयत्न व्यर्थ ठरले होते.

म्हणूनच सत्यव्रती धर्मराजाने 'नरो वा कुंजरो वा'चा आधार घेतला. कृष्णाने खोट्याचा आधार स्वत: घेतला व धर्मराजालाही घ्यावयास भाग पडले. हे जर केले नसते व द्रोणांनी आपल्या ब्रह्मास्त्राचा वापर केला असता तर किती निष्पापांचा, सज्जनांचा प्राण गेला असता ? म्हणून कृष्णाने आधीच युद्धामध्ये ब्रह्मास्त्राचा वापर करु नये असे विनवले होते. कौरवांनी अत्यंत पडत्या काळात केलेल्या मदतीने व कृतज्ञतेने ते सर्वजण दुर्योधनाची साथ सोडावयास तयार नव्हते.

अशा वेळी महापुरुष कोणत्याही कठीण समयी आपला आतला आवाज ऐकतात. अंत:करणातील सद्सद्विवेक बुद्धीने दिलेला कौल मान्य करतात. जे न्याय्य, नीती व सत्यपूर्ण व योग्य वाटते तेच करतात. रणसंग्रामात याच्या समर्थनासाठी जे जे केले जाते तोच धर्म. रणांगणात कपटी माणसांशी व चुकीचा पक्ष घेतलेल्या सज्जनांशी, कपटनीतीने वागणे हीच खरी धर्मरक्षणासाठी घेतलेली रणनीती आहे. कृष्णाने तेच केले. संस्कृती रक्षणासाठी किंवा निष्पाप जीवांचा बळी घेणाऱ्या अतिरेकी ना कोणत्याही नीतीने का असेना पण त्यांचा नाश करणे ही खरी रणनीती नाही का ? म्हणून युद्धात सर्व काही माफ असते असे म्हटले जाते. दरोडे, खून करण्यास आलेल्या दरोडेखोरांशी किंवा बलात्कार करण्याच्या दुष्ट हेतूने मागे लागलेल्या नीच माणसाशी, खोटे बोलून कोणाचे प्राण वाचणार असतील तर ते न्याय-नीतीत बसणार नाही का ? म्हणून शत्रूपक्षाची दुर्बळता जाणून त्यावर प्रहार करणे ही रणनीती कृष्णाने वापरली.

## कुशल राजनीतीज्ञ श्रीकृष्ण

श्रीकृष्ण अत्यंत मुत्सद्दी होता. त्याने ज्यांची राज्ये जिंकली त्यांना पदच्युत करुन त्यांच्या जागी नीतीवान, उत्तम पुरुषांची निवड केली. हे सर्व करण्यात कधी त्याने सामनीतीचा प्रयोग केला. कधी भेदनीतीचा आश्रय घेतला. सामाचा आश्रय यासाठी की, पश्चात आपल्यावर दोष येऊ नये. भेदनीतीचा प्रयोग प्रतिपक्षाचे दोष दिग्दर्शन करुन त्यांचा तेजोभंग करण्यासाठी.

या दोन्ही नीतीचे उत्तम उदाहरण म्हणजे सभागृहात कृष्णाने दुर्योधनाला युद्ध टाळण्यासाठी एक आमिष समोर ठेवले. कृष्ण दुर्योधनाला म्हणाले, ''तू व धृतराष्ट्र आहात त्याच पदावर राहा पण पांडवासह राज्य कर.'' धृतराष्ट्रात व दुर्योधनात फूट पाडण्याचा कृष्णाचा हा प्रयोग होता. संधी झाली तर धृतराष्ट्राचे पद तसेच राहील. युधिष्ठिर प्रमुख पद धारण करील पण दुसऱ्या नं. चे पद दुर्योधनाला मिळेल.

सभागृहात हा संधी प्रस्ताव जवळजवळ मान्य होत होता. भीष्मांनी या प्रस्तावाला अनुमोदन दिले. द्रोणांनी दुसरे अनुमोदन दिले. युद्धावेळी



संधीची प्रशस्ती याचसाठी केली की, त्यामुळे युद्ध टळले असते. याचसाठी विदुराने सुद्धा अनुमोदन दिले. हे सर्व ऐकून धृतराष्ट्रही या प्रस्तावाचा अनुमोदक बनला. धृतराष्ट्र दुर्योधनाला म्हणाला, ''कृष्णाचा प्रस्ताव मान्य कर म्हणजे आपला सन्मानच होईल. राज्यही मिळते आहे म्हणून तू कृष्णासह युधिष्ठिराकडे जा. हेच योग्य आहे. नाहीतर आपला पराभव नक्की होईल.'' धृतराष्ट्राचा स्पष्ट पाठिंबा मिळाल्यानंतर भीष्मांनी व द्रोणांनी दुर्योधनाला स्पष्ट जाणीव दिली की, जोपर्यंत अर्जुन कृष्णासमवेत नाही तोपर्यंत हे मान्य कर. युधिष्ठिराला प्रेमाने भेट तो तुलाच पंतप्रधान बनवेल.'' सर्वांनी सभागृहासमोर कृष्णाच्या प्रस्तावाला पाठिंबा देऊन उत्तम व सर्वांच्या हिताचे वातावरण तयार केले. पण दुर्योधनाने प्रस्ताव धुडकावून लावून सभागृहाला धक्काच दिला.

दुर्योधनाने निर्वाणीचे भाषण देऊन उलट कृष्णावरच आरोप केले. दुर्योधन म्हणाला, ''मला दोषी ठरवून लादलेले आरोप मला मान्य नाहीत. पांडवांच्या प्रेमाने तुम्ही माझी निंदा करीत आहात, आम्हाला कोणीच जिंकू शकणार नाहीत. भीष्म, द्रोण, कर्ण, कृप यांना कोण जिंकणार ? युद्धात आम्ही मेलो तर आम्हाला स्वर्ग मिळेलच. शत्रूला शरण जाण्यापेक्षा युद्धातला मृत्यू श्रेयस्कर आहे. पित्याने मजजवळ दिलेले राज्य मी मरेपर्यंत देणार नाही. उलट मी लहान असताना पूर्वी पांडवांना राज्य दिले होते. तेच चुकीचे होते. आता त्यांना तेही मिळणार नाही. इतकेच नव्हे तर सुईच्या अग्रावरची भूमीही त्यांना दिली जाणार नाही.

कृष्णाने एक प्रस्ताव सभागृहात ठेऊन, दुर्योधनाचे दुष्ट आचरण व अधर्मनीती उघड केली. प्रस्ताव मान्य केला असता तर युद्ध टळले असते. आता मात्र युद्ध अटळ होते. कारण गांधारीने सुद्धा सर्वांसमक्ष दुर्योधनाला पूर्वीच्या सर्व निंद्य कृत्याबद्दल दोष देऊन युद्ध टाळण्याचा सल्ला दिला होता. तोही दुर्योधनाने ठोकरला.

जाता जाता श्रीकृष्णाने आपल्या अलौकिक शक्तीचे दर्शन सर्वांना दिले व सभागृह सोडले.

# युधिष्ठिराला राज्याभिषेक

सर्व पांडव धृतराष्ट्र व गांधारीला भेटण्यासाठी हस्तिनापुरला आले. युधिष्ठिराबरोबर श्रीकृष्णही होते. भीम सोडून सर्वांशी अलिंगन देऊन स्वागत केले. पण भीम तेवढा कृष्णाबरोबर होता. धृतराष्ट्र अशा प्रकारे भीमाला शोधत होता, जणू तो भीमाला आता यमसदनास पाठविणार. कृष्णाला याचा संशय आधीच आला होता. त्यामुळे योजनापूर्वक आणलेली लोहमय प्रतिमा जवळच होती. धृतराष्ट्र जेव्हा अलिंगन द्यायला भीमासमोर आला तेव्हा कृष्णाने भीमाला बाजूस सारले व ती लोहमय प्रतिमा समोर आणली. त्या प्रतिमेलाच भीम समजून धृतराष्ट्राने दोन्ही बाहुत कवळिले आणि त्या प्रतिमेलाच तोडून-मोडून टाकले.

धृतराष्ट्राचा क्रोधाचा आवेश उतरल्यावर कृष्णाने त्याला समजावले. पूर्वीच ज्या गोष्टी सांगितल्या होत्या त्याच पुन्हा सांगितल्या व धृतराष्ट्राला शांत केले. धृतराष्ट्र व गांधारीना भेटून भीष्माचीही भेट घेतली. शरपंजरी पडलेल्या भीष्माचा अंतिम क्षण येण्यापूर्वी त्यांनी युधिष्ठिराला उपदेश केला. भीष्मांनी राजधर्माचे विस्ताराने वर्णन केले.

त्यानंतर भीष्मांनी आपले प्राण सोडले.

# अश्वमेध यज्ञ

युधिष्ठिराने युद्ध समाप्तीनंतर अश्वमेध यज्ञ करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे व्यास व श्रीकृष्ण यांची भेट घेऊन अनुमती घेतली. युधिष्ठिरांनी श्रीकृष्णाला विनंती केली, ''मधुसूदना, तुझ्याच प्रभावाने प्राप्त झालेल्या या पृथ्वीचा आम्ही उपभोग घेत आहोत. तूच आपल्या पराक्रमाने व बुद्धीप्रभावाने हे महाभारत युद्ध जिंकले आहेस. म्हणून तूच या यज्ञाची दीक्षा ग्रहण कर. तुझ्याकडून यज्ञानुष्ठान पूर्ण झाल्याने निश्चितच आमची पापे नष्ट होतील.''

पण श्रीकृष्णाने हे श्रेय नाकारले. युधिष्ठिराला ते नम्रपणाने म्हणाले, ''सर्वांमध्ये तूच धर्माचे सुशोभित आहेस माझ्या अनुज्ञेने तूच या यज्ञाचे अनुष्ठान कर. तू राजा आहेस. तुझ्याकडून यज्ञ संपन्न झाल्याने भीम, अर्जुन..... यांनाही यज्ञानुष्ठानाचे फळ मिळेल.''



याप्रमाणे यथाविधी युधिष्ठिराचा अश्वमेध यज्ञ संपन्न झाला. श्रीकृष्ण यज्ञसमाप्तीपर्यंत हस्तिनापुरातच होते. त्यांच्याच कृपादृष्टीने हा यज्ञ निर्विघ्नपणे पार पडला. या यज्ञाच्या निमित्ताने उर्वरीत शत्रू-राजांना जिंकल्यामुळे आणि त्या सर्वांनी यज्ञात उपस्थित राहून प्रचंड संपत्ती भेट दिल्यामुळे पांडवांचे राज्य निष्कंटक झाले.

अशा प्रकारे धर्मराज्याची स्थापना करुन भगवान श्रीकृष्ण परिवारासह द्वारकेला प्रस्थित झाले. यानंतर ३६ वर्षे, श्रीकृष्ण या भूतलावर मनुष्य रुपात वास्तव्य करीत होते. युधिष्ठिराचे धर्मराज्य सुस्थापित झाले होते. श्रीकृष्णांचे अवतार्य कार्य जवळजवळ पूर्ण झाले होते. सत्पक्षाचा विजय झाला होता व धर्माची प्रस्थापना झाली होती.

एक कार्य शिल्लक राहिले होते. कृष्ण विचार करीत होते की, अजिंक्य असा यादववंश अद्याप पृथ्वीवर विद्यमान आहे. हा यादववंश माझा आश्रित आहे. म्हणून बलसंपन्न व वैभवसंपन्न असा वंश इतर कोणाकडूनही पराभूत होऊ शकणार नाही. पण याच यादव वंशात आपापसात कलह झाल्यामुळे, ते सर्व नाश पावतील, त्यानंतरच मला शांती प्राप्त होईल व मी नीजधामाला जाईन.

ऋषींच्या शापाचे परिणाम होऊन यादव वंशाचा नाश झाला. यादव उडघ उघड पापाचरण करीत होते. देव, पितर, ब्राह्मण, सज्जन यांचा द्वेष करु लागले. पति-पत्नी एकमेकांची वंचना करु लागले. हे पाहून श्रीकृष्ण सर्वांना म्हणाले, ''गांधारीने पुत्रवधानंतर कृष्णाला शाप दिला. शिवाय त्यापूर्वीच्या ऋषीमुनींचा यादवांना शाप होताच. म्हणूनच या विनाशाचे अशुभ शकूनही घडत आहेत.''

# उद्धव गीता

हा चाललेला विनाश पाहून उद्धवाला मोठी चिंता वाटू लागली. म्हणून तो कृष्णाजवळ आला व म्हणाला, ''हे योगेश्वरा, तू सर्वशक्तीमान आहेस, तुझी इच्छा असती तर ऋषींचा शाप तू नाहीसा केला असतास. परंतु तू तसे केले नाहीस. यावरुन मी समजलो की, तू यदुवंशीयांचा संहार

करुन स्वधामाला जाणार आहेस. तुझा हा वियोग मी सहन करु शकत नाही. मलाही स्वधामाला घेऊन चल.''

यावर श्रीकृष्ण म्हणाले, ''उद्धवा ! तू म्हणालास तसेच मी करु इच्छितो. पृथ्वीवर जे काही कार्य करायचे होते ते सर्व पूर्ण झाले आहे. याच कार्यासाठी मी व बलराम यांनी अवतार घेतला होता. हा यदुवंश त्यांच्याच पापकर्मांने व ऋषींच्या शापाने नाश पावलाच आहे. राहिलेला आपापसात युद्ध करुन नष्ट होईल. आजपासून सातव्या दिवशी समुद्र या द्वारकानगरीला बुडवून टाकील. यानंतर कलियुगाचा प्रारंभ होईल. आता तूही येथे राहू नकोस. आता सर्व आत्मीयजनांचा स्नेहबंध सोडून अनन्य भावाने व एकाग्र चित्ताने माझ्या ठिकाणी समदृष्टीने पाहा.''

यापुढे भगवान श्रीकृष्णाने आपले हृदगत सांगून उद्धवाला उपदेश केला, ''तू प्रथम सर्व इंद्रियांना स्वाधीन करुन घे. चित्ताच्या सर्व वृत्तींचा निरोध कर आणि मग हे सारे जग आत्म्याचाच विस्तार आहे. आणि आत्मा मज सर्वात्म्याशी, ब्रह्माशी परमात्म्याशी एकरुप आहे असा अनुभव घे. मग असा पुरुष जन्ममृत्यूच्या बंधनात कधीच पडत नाही. माझ्याशी एकरुप माझ्या धामाला मिळून जातो.''

उद्धवाने हे ऐकून कृष्णाला नमस्कार केला व अधिक जाणून घेण्यासाठी प्रश्न करण्यास प्रारंभ केला. हा प्रश्नोत्तर संवाद भागवतात एकादशस्कंधाच्या ७ व्या अध्यायापासून २९ व्या अध्यायापर्यंत २३ अध्यायात आणि १०३० श्लोकात विस्तारला आहे.

यालाच 'उद्धवगीता' म्हटले जाते. एकनाथानी या एकादश स्कंधावर सविस्तर टीका लिहिली आहे. ती नाथभागवत म्हणून प्रसिद्ध आहे. हा सर्व उपदेश भक्तीयोगावर भर देणारा आहे.

अर्जुनाला कुरुक्षेत्रावर कृष्णाने जो उपदेश केला तसाच तत्वोपदेश येथेही केला आहे. फक्त उपदेशाचा उद्देश निराळा आहे व अर्जुन उद्धवाच्या भूमिकाही वेगळ्या आहेत. उद्धवाने आत्मतत्वाचा उपदेश करण्यासंबंधीचा प्रश्न विचारल्यावर कृष्णाने प्रथम आत्मोद्धाराचा उपदेश केला. ते म्हणाले, ''माझा पूर्वज यदू यानेपूर्वी 'अवधूतां'शी जो संवाद केला त्याचे सार मी



तुला सांगतो, ''अवधूताने आपण २४ गुरु केल्याचे सांगितले व या प्रत्येकाकडून मी खूप शिकलो. हे शरीर मर्त्य असले तरी, या नरदेहातच परम पुरुषाची, नारायणाची प्राप्ती होऊ शकते. म्हणून बुद्धीवान माणसाने या जन्मातच मोक्षप्राप्तीचा विचार करावा व मनुष्य जन्माचे सार्थक करावे. माझा पूर्वज यदूने अवधूत दत्तात्रेयाचे हे कथन ऐकून सर्व आसक्तीपासून मुक्ती मिळविली व तो समदर्शी झाला. तसाच तूही हो.''

श्रीकृष्णाने यानंतर उद्धवाने विचारलेल्या सर्व प्रश्नांना सविस्तर उत्तरे दिली आहेत. बंध, मोक्ष, सुख-दुःख, भक्ताची लक्षणे, सत्संगाचा महिमा, सगुण-निर्गुण परमात्म्याचे स्वरुप, विषयांचे स्वरुप, आत्मकल्याणाचे सर्वात सोपे साधन, परमेश्वराच्या विभूती, प्रेममयी भक्तीचे स्वरुप, वर्णाश्रम धर्माचे कालानुरुप स्वरुप, संन्यास धर्माचा आचार, त्रिगुणाचे स्वरुप व गुणातीत होण्याचा मार्ग अशा अनेक विषयांचा परामर्श कृष्णाने केला व शेवटी उद्धवाने प्रश्न केला की, ''कोणाही मनुष्याला अनायास परम पद प्राप्त होईल असा सरळ, सुगम साधनमार्ग कोणता आहे ?''

या प्रश्नाने श्रीकृष्ण प्रसन्न झाले. कारण हा प्रश्न त्याच्या स्वतःसाठी नसून जगदुद्धारासाठी आहे असे कृष्णाना वाटले म्हणून त्यांनी ब्रह्मप्राप्तीचा सुलभ उपाय सांगितला, ''सर्व कर्मे मदर्थं म्हणजे ईश्वरासाठी करावीत. हळूहळू माझ्या स्मरणाचा अभ्यास वाढवावा म्हणजे साधकाचे मन आणि चित्त माझ्या ठिकाणी समर्पित होतील. माझे भजन, कीर्तन तल्लीन होऊन करावे. सत्संगतीत राहावे. सर्व प्राणीमात्रात माझेच दर्शन करावे. सर्वात व स्वतःत ईश्वराचा अंश आहे. ही धारणा दृढ करावी. अशी दृष्टी यावयास लागली की, काम, क्रोध, मोह, मद, मत्सर, ईर्ष्या, असूया असे विकार जाऊन अंतःकरण शुद्धी व्हावयास लागेल. सर्वत्र समभावाने पाहता पाहता सर्व काही ब्रह्मरुप दिसू लागेल. ईश्वराच्या प्राप्तीची जेवढी साधने आहेत त्या सर्वांत माझ्या मते सर्व भूतमात्रात मन, वाणी व शरीराच्या सर्व वृत्तीनी ईश्वराची भावना करणे हे सर्वश्रेष्ठ साधन आहे. हाच खरा भागवत धर्म आहे. हा धर्म निष्काम व निर्गुण असल्यामुळे त्यालाच मी सर्वोत्तम म्हणून निर्धारीत केले आहे.

श्रीकृष्णाने स्वत: केलेला हा उपदेश ऐकून उद्धवाचे मन आनंदाने भरले. तो म्हणाला, ''भगवंता, तुझ्या कृपेने मला हे ज्ञान मिळाले. आता मला तुझी चरणभक्ती अखंडपणे कशी अखंड राहील याचा मार्ग सांग.''

श्रीकृष्णाने उद्धवाला सांगितले, ''तू आता माझ्या आज्ञेने बदरिकाश्रमाला जा. तो माझाच आश्रम आहे. तेथे गंगा नदीत स्नान करुन शुचिर्भूत हो.''

उद्धवाने श्रीकृष्णांच्या पादुका मस्तकावर धारण केल्या व त्याने बदरिकाश्रमाला प्रयाण केले. कृष्णावताराचे हे सर्व वर्णन भागवतात व्यासानी मधुरतेने केले आहे.

## लीलावतार समाप्ती

सज्जनांचे रक्षण, दुर्जनांचा संहार आणि धर्मसंस्थापना या तीन कार्यासाठी श्रीकृष्णाने मनुष्यावतारात जन्म घेतला. ती तिन्ही कार्ये पूर्ण झाली. हे कार्य करीत असताना त्यांनी आप्त, इष्ट, नातलग व आपला वंश न पाहता हे कार्य पूर्ण केले. अर्जुनाला सांगितलेल्या तत्वज्ञानाप्रमाणेच त्यांनी ते आचरणात आणून दाखविले. म्हणून हे सर्व तत्त्वज्ञान जीवन सिद्धान्त बनले. बालपणातल्या पुतना–वधापासून ते यादव संहारापर्यत त्यांनी एकाच नीतीचे अनुकरण केले. दुष्टांचा संहार व सज्जनांचे रक्षण या नीतीचा अवलंब केला. यादव उन्मत्त होऊन दुराचारी झाले नसते तर कृष्णाचे कवच त्यांना मिळाले असते.

कौरवसत्ता नष्ट केल्यावर, धर्मराज युधिष्ठिराला सम्राटपदावर अभिषिक्त, केले. युधिष्ठिरांनी कृष्णाच्या संकल्पनेप्रमाणे कसे राज्य केले याचे वर्णन महाभारतकारांनी तीस श्लोकात केले आहे. धर्म व नीती यांची सांगड घालून लोक सदाचारी व विवेकी वृत्तीने व शांततेने राहात होते. त्यामुळे सर्वत्र सुख नांदत होते. यासाठीच कृष्णाने धर्मसंस्थापनेचे कार्य केले.

श्री बलराम परमधामाला निघून गेल्यानंतर श्रीकृष्ण एकटेच वनात संचार करीत होते. एका ठिकाणी ध्यानस्थ बसले असता एका व्याधाने मृग



समजून भगवंताच्या तळपायावर बाण मारला. मग त्याला पकडण्यासाठी म्हणून तो जवळ आला तेव्हा त्याला पश्चाताप झाला. त्याने श्रीकृष्णाचे पाय धरले. भगवंतांनी त्याला अभय देत म्हटले, ''तू तर माझ्या मनातीलच हे कार्य केले आहेस त्यामुळे तू भिऊ नकोस. माझ्या आज्ञेने तू पुण्यवानानाच प्राप्त होणाऱ्या स्वर्गात निवास कर, असे म्हणून त्याला जीवदान दिले.

पूर्णावतार श्रीकृष्णाने आपला देह सोडला व आपल्या परमधामाला ते निघून गेले.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**




# तत्वज्ञ श्रीकृष्ण
# गीता-तत्वज्ञानाची सर्वांना गरज

प्रकरण ६

# तत्वज्ञ श्रीकृष्ण
# गीता-तत्वज्ञानाची सर्वांना गरज

भारताने जगाला तीन गोष्टी दिल्या आहेत. एक आयुर्वेद, योग व अध्यात्म. यातील योगाला जागतिक मान्यता नुकतीच लाभली आहे. युनोतील १८९ देशांच्या संघटनांनी आरोग्य व निरामय जीवनासाठी, ठराव मंजूर करुन मान्यता दिली आहे. २१ जून हा योगदिन म्हणून यापुढे या सर्व देशात साजरा केला जाणार आहे. आयुर्वेद सुद्धा अनेक देशात मान्यता पावला आहे. १८९३ साली जागतिक सर्व धर्मपरिषदेत, व्याख्यानासाठी गेलेल्या विवेकानंदांनी भारतीय तत्वज्ञानाची जगाला ओळख करुन दिली. त्यानंतर अमेरिका, ब्रिटन अशा देशांमध्ये अनेक वेळा जाऊन हिंदू धर्म, गीता यातून प्रकट झालेल्या वैश्विक तत्वज्ञानाचा प्रचार व प्रसार केला. याचा परिणाम म्हणून अनेक अमेरिकन व इंग्लिश स्त्री-पुरुषांनी विवेकानंदाचे शिष्यत्व पत्करले. आज १२५ वर्षानंतर या सर्व देशामध्ये आपल्या देशातील अनेक पंथ- उपपंथाच्या श्रेष्ठ आचार्य, गुरुमहाराजांनी हजारो मंदिरे, मठ, विद्यालये स्थापन करुन अध्यात्माचा झेंडा अव्याहत फडकत ठेवला आहे. इस्कॉनसारख्या संघटना, कृष्ण-विचारांचा प्रसार मंदिरांच्या माध्यमातून जगभर करीत आहेत. हजारो अमेरिकन भक्त हिंदू आचार व विचार घेऊन कृष्णाच्या भजन कीर्तनात देहभान विसरुन रममाण होत आहेत. नुकतेच आपल्या पंतप्रधानांनी दोन महान देशांच्या प्रमुखांना भगवद्‌गीता भेट म्हणून दिली.

खरोखरच जगाला कृष्ण-विचारांची गरज आहे का ? जगाच्या समस्या सोडविण्याची शक्ती या विचारांत आहे का ? जगाच्या समस्या सोडविण्याची शक्ती या विचारांत आहे का ? आपल्या देशाचे गुंतागुंतीचे प्रश्न सुद्धा गीतेच्या तत्वज्ञानांने सुटणार आहेत का ? मोठ्या संख्येने असलेल्या



तरुणाईच्या समस्यांना या कृष्ण-विचाराने संजीवनी मिळेल का ? नैराश्यामुळे होत असलेल्या तरुणांच्या आत्महत्या व मनोकायिक विकारांमुळे उद्धवस्त झालेल्या तरुणांच्या जीवनात बदल होवून नवी आशा निर्माण होईल का ?

या सर्व प्रश्नांची उत्तरे या प्रकरणात आपल्याला शोधायची आहेत. कृष्ण-विचार व गीतेचे तत्वज्ञान यातूनच कृष्ण-नीती निर्माण झाली. कृष्णाचे संपूर्ण जीवन या विचारांनीच भरले आहे. कृष्ण हा जगातील एकच तत्वज्ञ असा होऊन गेला आहे, की ज्याने हे तत्वज्ञान प्रत्यक्ष जगून दाखविले व एक आदर्श वस्तुपाठ आपल्यासमोर ठेवला आहे. म्हणून गीता हा केवळ तत्वज्ञानाचा ग्रंथ नसून तो प्रत्यक्ष आचरण्याचा जीवन-ग्रंथ आहे. केवळ हिंदूसाठी नव्हे तर जगातील सर्व मानवजातीसाठी, अर्जुनाचे केवळ निमित्त करुन सांगितलेले हे तत्वज्ञान आहे. या संपूर्ण ग्रंथात कुठेही 'हिंदू' हा शब्दच नाही. जसे रामायणातील रामाचे चरित्र हा सांसारिक गृहस्थासाठी आदर्श आहे, तसे कृष्ण-जीवन हे जीवनाच्या सर्व संघर्षामध्ये शांत व सुखी जीवन जगण्यासाठी आदर्श आहे. ''रात्री दिवस आम्हां । युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ।।'' या तुकारामांच्या उक्तीप्रमाणे आज व्यक्तीच्या अंत:करणात आणि बाहेरील जगातही महाभारताचे रणकंदन सुरु आहे. हे लिहीत असताना, ऑस्ट्रेलियातील सिडनी या शहरातील एका कॅफेमध्ये पन्नास जणांना अतिरक्यांनी ओलीस ठेवले आहे. न्यूयॉर्क, मुंबई व आपल्या संसदेवर झालेले अतिरेक्यांचे हल्ले ताजेच असताना आपल्या देशाला या संभाव्य हल्ल्यापासून बचाव करण्यासाठी सतत सतर्क राहावे लागत आहे. संपूर्ण जगालाच या असुरी शक्तींची प्रचंड दहशत निर्माण झाली आहे. जगाची विभागणी केवळ दोन गटात झाली आहे. कौरवांची असुरी शक्ती व दुसरी पांडवांची सत्प्रवृत्त दैवी शक्ती. हा संघर्ष तसा सनातनच आहे.

पण याही पेक्षा प्रत्येक्ष व्यक्तीमध्ये, अंत:करणरुपी रणांगणात चाललेला सृष्ट-दृष्ट, सूर-असूर, दैवी गुण व असुरी विकारांचा संघर्ष हा जीवघेणा झालेला आहे.

या कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र करण्याचे सामर्थ्य कृष्ण-नीतीत नक्कीच आहे. कारण संपूर्ण गीतेचा प्रवास हा विषादापासून प्रसन्नतेकडे जाण्याचा आहे.

विषाद म्हणजे नैराश्य किंवा दुःख. दुःखापासून सुख, समाधान, शांती, प्रसन्नता मिळवण्याचे सामर्थ्य गीतेच्या सातशे श्लोकात, मंत्रात कृष्णाने अगदी नेटकेपणाने सांगितले आहे. ज्यांनी गीतेचे अनुकरण केले त्यांचे जीवन कृतार्थ, सफल झाले आहे. चारी पुरुषार्थांची धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांची सिद्धता करण्याची शक्ती या अक्षर ग्रंथात आहे.

म्हणूनच महात्मा गांधी, विवेकानंद, ज्ञानेश्वर आदि शंकराचार्य, कार्लाईल, थोरो, टोयंबी अशा पाश्चात्य तत्वज्ञानी, श्रेष्ठ पुरुषांनी गीता शिरोधार्थ मानली.

''सबका विकास सबके साथ'' ही कृष्णनीती भारताची राजनीती होत आहे. या नीतीला सर्वांकडून पाठिंबा मिळत आहे. जगात भारताला प्रतिष्ठा मिळत आहे. जगात भारताची प्रतिष्ठा यामुळे वाढत आहे. कृष्णनीतीला पराभव माहीत नाही. सतत विजयाकडे नेणारी ही नीती आहे. म्हणून व्यक्तीने, समाजाने, देशाने व संपूर्ण विश्वाने ही नीती आचरणात आणणे जरुरी आहे. कारण जग आता ग्लोबल व्हिलेज म्हणजे एक गाव झाले आहे. ''वसुधैव कुटुंबकम्'' हा आपल्या संस्कृतीचा, वेदांचा सनातन नारा आहे संपूर्ण जग, म्हटले तर एक कुटूंबच आहे. नव्या आधुनिक माहिती तंत्रज्ञानामुळे सर्व जग जवळ आले आहे. सर्वांचे जटील प्रश्न व गुंतागुंतीच्या समस्या या एकत्रीतपणेच सोडविण्याची वेळ आली आहे.

''एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति'' हा कृष्णनीतीचा भाग आहे. एकच परमेश्वर किंवा या ब्रह्मांडाचे सूत्रसंचालन करणारी एकच सत्ता वेगवेगळ्या रुपात वेगवेगळ्या ठिकाणी प्रकट झाली आहे. कोणी त्याला सगुण रुपात पाहतात तर कोणी त्याला निर्गुण रुपात पूजतात. वेदांची धारणा हीच आहे की, एकाच परमसत्तेची ही वेगवेगळी नावे आहेत. हिंदू धर्माने या उदार सहिष्णुतेचे पालन केल्यामुळे धर्म वाढविण्यासाठी कोणावर आक्रमण कधी केले नाही. सर्व उदात्त मूल्यांचा पुरस्कार केला. बुद्धासारखा महान पुरुष याच मातीत जन्माला आला. मूळच्या वेदांच्या तत्वज्ञानात, काही तत्वे न आवडल्यामुळे निराळ्या धर्माची जरी स्थापना बुद्धाने केली असली तरी, मूळ तत्वज्ञान एकच आहे. भारतीय घटनेचे शिल्पकार डॉ. बाबासाहेब



आंबेडकरांनी बुद्ध धर्माचा स्वीकार करुन ही महानतत्वे आपल्या घटनेत समाविष्ट केली आहेत. समता, बंधूता, दया, क्षमा, शांती, सत्य, अहिंसा, प्रेम, न्याय, स्वातंत्र्य ही कृष्णाने स्वीकारलेली व आचरलेली तत्वे आहेत. सज्जनांचे रक्षण, असुरी शक्तींचा समूळ नाश व दुर्बलांना संरक्षण या कृष्णनीतीनेच सर्व युद्धे केली. पण कोणत्याही राज्याची सत्ता आपल्या हाती घेतली नाही. याच कृष्णनीतीने भारताच्या पूर्वप्रधानमंत्री इंदिरा गांधी यांनी बांगला देश जिंकून घेतला. पण कोणत्याही प्रकारे सत्तेची अभिलाषा न ठेवता बांगला देश वासियांच्या ताब्यात देऊन टाकला. जगाच्या इतिहासात क्वचितच असे घडले असेल. आपल्या देशावर परकीयांची इतकी आक्रमणे झाली. पण दुसऱ्या देशाची भूमी बळकवण्यासाठी भारतीयांनी कधीच कोठेही आक्रमण केले नाही. बांगला देशाच्या कारवाईमध्ये सुद्धा कारण होते. ते पाकिस्तानाच्या दृष्ट, अन्यायी नीतीचे. पाकिस्तानच्या याच नीतीमुळे सरहद्दीवर सतत अशांतता आहे. मधून मधून युद्धाची खुमखुमी व्यक्त केली जात आहे. दहशतवादी संघटनांना छुपे सहकार्य करुन, भारतात हल्ले घडवून आणताहेत. भारतावर आक्रमण करण्याचे मनसुबे करणाऱ्या दहशतवादी संघटनांनी आता भस्मासुराचा अवतार घेतला आहे. भस्मासुराला वर मिळाल्यावर तो वर देणाऱ्या शंकरावर प्रयोग केला. तशीच घटना काल पाकिस्तानात घडली. पेशावर शहरातल्या एका सैनिकी शिक्षण देणाऱ्या शाळेतील एकशे चाळीस कोवळ्या मुलांना अतिशय अमानुषपणे गोळ्या घालून ठार केले. नऊ शिक्षकांनासुद्धा प्राण गमवावे लागले. सारं जग या घटनेने हादरुन गेले. तहरीक–ए–तालिबान नावाच्या संघटनेने याची जबाबदारी स्वीकारली आहे.

अशा परिस्थतीत भारताची रणनीती नेहमीच, मुसद्दीपणाची ठरत आहे. कालच्या लिखाणात ऑस्ट्रेलियात घडलेल्या घटनेचा मी उल्लेख केला होता. पुन्हा आज सलग दुसरी घटना घडल्यामुळे हे मांडावे लागले. मानवतेच्या भूमिकेतून भारतातील सर्व शाळांतील मुलांनी या घटनेचा निषेध करुन स्तब्धता पाळली.

अशीच परिस्थिती महाभारत काळात उद्‌भवली होती. जरासंध अत्यंत क्रूर, प्रबळ राजा झाला होता. शेकडो राजांना त्याने आपले मांडलिक बनविले होते. राजांच्या सुंदर मुलींना पळवून बंदिखान्यात ठेवले होते.

जरासंधाला पराभूत करण्यासाठी कृष्णाने आपली नीती वापरली. सर्व लहान-मोठ्या राजांना कृष्णांनी समजावले. सर्व राजांना एकत्रित करुन जरासंधाचा पराभव केला.

आपल्या पंतप्रधानांनी हीच कृष्णनीती वापरली. अमेरिका, ब्रिटन, आस्ट्रेलिया अशा सर्व राष्ट्रांना या दहशतवादाविरुद्ध एकत्रित करण्यासाठी युनोमध्ये प्रभावी भाषण केले. त्याचा परिणाम म्हणून एकमताने ठराव मंजूर झाला. भारताने अर्धी लढाई कागदावरच जिंकली आहे. कृष्णाने जसे जात, किंवा इतर भेदाभेद न पाहता सर्वांना जवळ केले. न्याय, स्वातंत्र्य सर्वांना सारखे मिळाले पाहिजे. सर्वांना विकासाची संधी समान मिळाली पाहिजे. जात, पंथ, धर्म या सर्वांच्या पलीकडे जाऊन ''हे विश्वचि माझे घर'' या ज्ञानेश्वरांच्या वैश्विक प्रार्थनेप्रमाणे सर्वांनी वागावे अशी नीतीच जगात शांतता व स्थैर्य निर्माण करेल. यापुढे हा विश्वधर्मच जगाला तारेल. कृष्णाने अशाच धर्म-संस्थापनेसाठी पांडवांना जवळ करुन महाभारताचे युद्ध जिंकले.

म्हणून मी एका विधानाचा जाणीवपूर्वक उल्लेख केला की, भारतीय राजकारणात ''सबका विकास सबके साथ'' ही नीती निवडणूका जिंकण्यासाठी केवळ वापरायची नाही तर ती, या महान मूल्यांसाठी, विश्वबंधूत्वाचे नाते निर्माण करण्याच्या ध्येय प्राप्तीसाठी, वापरली तरच सर्वांचा खरा विकास होईल.

कृष्णाने हे सर्व प्रत्यक्षात आचरणात आणून दाखविले म्हणून गीतेचे तत्वज्ञान जगाला आज आकर्षित करत आहे. कृष्णाने जी नीती वापरली ती या तत्वज्ञानाच्याच आधारे. हे तत्वज्ञान कोण्या एका धर्माचे, पंथाचे नाही. ते तत्वज्ञान एका ठराविक भूप्रदेशावरील मानवसमूहासाठी नाही. पण या तत्वज्ञानापर ग्रंथाला हिंदू धर्माच्या कोंदणात बसवून नाहक यावर टीका-टिपणी करणारे महाभाग फक्त धर्मांधर्मात तेढ निर्माण करीत आहेत. संपूर्ण गीतेत ''हिंदू''हा शब्दसुद्धा नाही. भारताचा राष्ट्र म्हणून देखील उल्लेख नाही. हे तत्वज्ञान जगातील सर्व मनुष्यांच्या सर्वांगीण कल्याणाचे मार्गदर्शन करणारे शास्त्र आहे. कोणत्याही धर्माच्या लोकांनी पूर्वग्रह न बाळगता आचरण्याचे तत्वज्ञान आहे.



# गीता तत्वज्ञान : कृष्णनीतीचा आधार

या प्रकरणात गीतेतील सर्व श्लोकांचा परामर्श घेता येणार नाही. हे निश्चितच पण मानवी जीवन सुखी, समाधानी यशस्वी व कृतार्थ करण्यासाठी, जो आचार धर्म कृष्णाने सांगितला व स्वत: आचरुन दाखविला. असे सारभूत जे महान, मंगल श्लोक आहेत. त्यांची आपण निवड करु. ते केवळ श्लोक नसून ते मंत्र आहेत. मंत्र म्हणजे ''मननात त्रायते इति मंत्र:'' ज्याचे चिंतन करुन अशुभापासून आपले रक्षण होईल हे सांगणारे शक्तीशाली शब्द म्हणजे मंत्र.

२१ व्या शतकातील माणसाच्या व्यक्तिगत समस्या सोडविण्यासाठी व कोणत्याही देशातील मानव समूहाच्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी हे मंत्र संजीवनीसारखे गुणकारी ठरतील.

जगातील सर्वात प्राचीन तत्वज्ञान म्हणून गौरवविलेल्या वेद उपनिषदांचे हे सारभूत तत्वज्ञान आहे. म्हणून या ग्रंथाची अपूर्वाई. उपनिषद म्हणजे वेदांचे ज्ञानकांड, महाभारत, रामायण अशा ग्रंथातून प्रकट झालेले तत्वज्ञान याची गंगोत्री या उपनिषदात आहे. वास्तविक गीता हा पूजेचा ग्रंथ नाही, फुले अक्षता वाहून देव्हाऱ्यात ठेवण्याचा ग्रंथ नाही किंवा मृत्यूसमयी ऐकण्याचा हा धर्मग्रंथ आहे.

हा ग्रंथ जीवन-ग्रंथ आहे. या लौकिक भौतिक जीवनाचा उत्कर्ष साधण्याचा व पार लौकिक जीवनाचे सुद्धा मार्गदर्शन करणारा वैश्विक ग्रंथ आहे. जीवनाच्या कोणत्याही क्षेत्रात असणाऱ्या भक्तीला मार्गदर्शन करणारा हा ग्रंथ आहे.

उपनिषदांप्रमाणेच ब्रह्मविद्या हा गीतेचा प्रमुख विषय आहे. ब्रह्मविद्येच्या अनुभवसासाठी कर्म, भक्ती, ज्ञान व ध्यान अशा चारही योगांच्या शास्त्रांच्या अभ्यासासाठी हा ग्रंथ मौलिक आहे.

संपूर्ण गीतेत अर्जुनाचे एकवीस प्रश्न आहेत. हे प्रश्न आजही २१ व्या शतकात प्रत्येक माणसाच्या मनात येणारे प्रश्न आहेत. गीतेत अधिकार संपन्न शिष्य अर्जुन व जगद्‌गुरु भगवान श्रीकृष्ण तुम्हा आम्हां सर्व अर्जुनाना उपदेश

करण्याचा नाट्यमय संवाद आहे. जीवन संघर्षमय आहे. तो कोणत्याही जाती-धर्म-पंथ-सांप्रदायाचा असो. एक कुरुक्षेत्रच आहे. या कुरुक्षेत्राला धर्मक्षेत्र बनविण्याचे सामर्थ्य या गुरु-शिष्यांच्या संवादात ओतप्रोत भरले आहे.

आधुनिक मानसशास्त्राप्रमाणे यात मन, बुद्धी, चित्त, अहंकार, गुण-दुर्गुण, चंचलता, शांती, प्रसन्नता, सत्व-रज-तम या गुणांचा जीवनावर होणारा प्रभाव, अज्ञान, अविद्या, विकार, कृतज्ञता, प्रेम, समर्पण, भक्त-भक्ती-भगवंत, ईश्वराचे नेमके स्वरुप व त्याचा पत्ता... अशा जीवनाशी अत्यंत निगडीत असणाऱ्या विषयांचे यात सूत्रबद्ध विश्लेषण केले आहे.

गीतेने आपल्या आत्मपरीक्षणाची, अंतर्मुख होण्याची, स्वत:ची नेमकी ओळख करुन घेण्याची संधी दिलेली आहे. यासाठी एक स्वतंत्र सोळावा अध्याय नियोजिला आहे.

# कृष्णनीती कथन करणारे गीतेतील मांगलिक श्लोक

संपूर्ण जीवनभर कृष्ण ज्या विचारांने जगला, जे कर्तृत्व करुन दाखविले, जे यश प्राप्त केले, ज्या महान कारणांसाठी मनुष्यावतार घेतला ते प्राप्त करण्यासाठी जी नीती कृष्णाने वापरली तीच कृष्णनीती ठरली.

गीतेतील सर्वच श्लोक मंत्रस्वरुपात असले तरी, ज्या श्लोकांमध्ये ही कृष्णनीती विशेषरुपाने व्यक्त झाली आहे. असेच श्लोकरुपी महामंत्र, या प्रकरणात निवडले आहेत. आपल्या समस्यांचे निराकरण, यात असल्यामुळे २१ व्या शतकातही कृष्णनीती आचरणात आणण्याची नितांत आवश्यकता निर्माण झाली आहे. ती आवश्यकता व्यक्ती, समाज, देश व विश्व या सर्वांनाच आहे.

(नी-नयति-नेणे) जे विचार आपल्याला सुख शांती, आनंद, निर्भयता, तृप्ती व जीवनसाफल्य याकडे घेऊन जातात ती नीती. म्हणूनच कृष्णाने स्वमुखाने सांगितलेले हे विचार कृष्णानी ती चिंतन, मनन व अनुकरणीय आहेत.



## श्लोक १

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्वय्युपपद्यते ।।**
**क्षुद्रं हृदय दौर्बल्यं त्यक्तोत्तिष्ठ परंतप ।। (२.३)**

**अर्थ :-** ''हे अर्जुना, असा नामर्द होऊ नको ! हे तुला शोभत नाही. अरे श्रेष्ठ वीरपुरुषा ! अंत:करणाचे हे क्षुद्र दुबळेपण सोडून देऊन युद्धास उभा राहा.''

स्वामी विवेकानंदांनी एकदा आपल्या सर्व शिष्यांना उद्देशून उपदेशिले, ''तुम्हां सर्वांना जर गीतेचे ७०० श्लोक पाठ करायचे नसतील तरी माझी काही हरकत नाही. सहाशे नव्वानऊ श्लोक विसरले तरी चालतील पण युवकांनो, दुसऱ्या अध्यायातील हा तिसरा श्लोक सतत जीभेवर राहू द्या व त्याप्रमाणे त्याचे आचरण करा.''

अर्जुनाला निमित्त करुन श्रीकृष्णाने कोणत्याही काळातील सर्व तरुणांना उद्देशून म्हटले की, हा एकच श्लोक जरी स्मरणात ठेवला तरी संपूर्ण गीता वाचण्याचे पुण्य तुम्हांला लाभेल.

म्हणून या श्लोकाचा संपूर्ण संदर्भ आपण लक्षात घेऊ. अर्जुनाला युद्धाला प्रेरित करीत असताना या श्लोकाचे उच्चारण कृष्णाने केले आहे.

अर्जुन मोहविवश झालेला आहे. नैराश्याने गर्भ गळीत झालेला आहे. समोर युद्धास उभा ठाकलेल्या आपल्या गुरुजनांना, भीष्म, द्रोण यांना तसेच बंधू मामा  अशा रक्ताच्या नात्यांना, ठार मारुन मिळालेले राज्य, वैभव भोगण्याची अर्जुनाची तयारी नाही असे राज्य भोगण्यापेक्षा मी संन्यास घेईन असे स्पष्टपणे रणांगणातच कृष्णाला सांगून आपली शस्त्रे खाली ठेवली. रथाचे सारथ्य करणाऱ्या कृष्णाला, अर्जुनाला युद्धाला प्रवृत्त करण्यासाठी संपूर्ण गीता सांगावी लागली. तेही युद्धभूमीवर !

संपूर्ण गीता सांगून झाल्यावर शेवटी कृष्णाने विचारले, ''अर्जुना, मी जे सांगितले ते तू एकाग्र चित्ताने ऐकलेस का ? आता तरी तू नि:शंक व निर्मोह झालास का ?'' तेव्हा अर्जुनाने प्रसन्न चित्ताने सांगितले, ''हे मधुसुदना, तू जे जे सांगितलेस त्यामुळे मी आता पूर्णपणे मोहरहित व

नि:शंक झालो आहे. म्हणून मी आता धर्मयुद्धाला ठामपणे सिद्ध झालो आहे. सर्व शंका दूर झाल्यामुळे मी आता तुझ्या वचनाप्रमाणे वागेन.'' ''करिष्ये वचनं तव'' हे तीन शब्द म्हणजे गीतेचा आत्मा आहे. कृष्णाच्या विचाराप्रमाणे वागणे हे गीतेचे फलित आहे. कृष्णनीतीच्या विचाराने बदलणे, परिवर्तन होणे हे कृष्णाला अभिप्रेत होते.

या श्लोकात अर्जुनाला दूषण देण्यासाठी कृष्णाने कठोरतेने 'क्लैब्य' हा शब्द वापरला. क्लैब्य म्हणजे जो धड पुरुषही नाही व स्त्रीही नाही असा नामर्द. क्षत्रियांचा स्वधर्म हा अधर्माविरुद्ध युद्ध करणे हा आहे. पण स्वजनांच्या मोह व करुणा यांमुळे अर्जुन आपले स्वत्व हरवून दुबळा बनला होता. म्हणून पहिल्या अध्यायाचे नाव सुद्धा विषाद योग आहे. विषाद म्हणजे नैराश्य. दु:ख. गीतेचा प्रवास हा नैराश्यापासून प्रसन्नतेकडे, आनंदाकडे नेणारा आहे.

''नैराश्य'' हा ॲटम बॉंब सारखा आहे. ॲटम बॉंब ने प्रत्यक्ष हिरोशिमासारखा हाहाकार होतो. पण व्यक्तीच्या जीवनात हा आला की, तो व्यक्तीला पूर्णपणे उद्धवस्त करुन टाकतो. आज भारतात विशेषत: तरुणांमध्ये आत्महत्येचे प्रमाण बेसुमार वाढले आहे. तरुण-स्त्रिया, शेतकरी यांच्या आत्महत्या या नैराश्याचा अतिरेक झाल्यामुळे घडत आहेत. पण याहीपेक्षा मोठा धक्का मनोविकारांचा आहे. जागतिक आरोग्य संघटनेने विशेषत: भारताला २000 साली इशारा दिला आहे. तो असा की, २०२५ सालापर्यंत भारतातील ४५% तरुण मनोविकारांने ग्रासलेले असतील. यामुळे आत्महत्यांचे प्रमाण बेसुमार वाढेल. हे मनोविकार केवळ नैराश्येमुळे व मनाच्या दुर्बलतेमुळेच होतात. मनोविकारांमुळेच मनोकायिक रोगांना बळी पडावे लागते. यामुळेच रक्तदाब, मधुमेह, हृदयविकार यांचे प्रमाण तरुणांमध्ये अतोनात वाढले आहे. ऐन पंचविशीत-तिशीत हृदयविकारांनी मरणाऱ्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. सायकिॲट्रिस्ट म्हणजे मनोविकार तज्ञ किंवा डॉक्टर पूर्वी एखादं-दुसराचं असायचा. पण आज त्यांची संख्या वाढत आहे. दवाखाने भरत आहेत ही गोष्ट सर्वांनाच हादरुन टाकणारी आहे. अजूनही प्रशासन, समाज यावर म्हणावे तितके गंभीर नाही. कारण हे विकार व रोग बाहेरुन दिसणारे नाहीत. जेव्हा परिणाम दिसतात तेव्हा वेळ निघून गेलेली असते.



पूर्वी आत्महत्येची राजधानी जपान होती. आता जपानची जागा भारत घेतो आहे.

म्हणूनच विवेकानंदांनी गीतेतील या श्लोकांवरुन तरुणांना जागे करण्याचा प्रयत्न केला. त्यांनी रामकृष्णसंघाचे घोषवाक्यच असे केले.

''दुर्बलता हाच मृत्यू व बल हेच जीवन.'' यात बल हे केवळ शारीरिक नसून ते बल मानसिक व आत्मिक या स्वरुपाचे आहे. ज्याचे मन दुबळे असते त्यालाच नैराश्य ग्रासते. नैराश्य आले की मानसिक ताण-तणाव (Tension) वाढतो. जेवढा तो वाढतो तेवढे मनोविकार वाढायला लागतात. ते वाढत असतानाच मनोकायिक रोगांचा तो बळी पडतो. हे दोन्ही बळावायला लागले की आत्महत्येचे विचार दृढ व्हायला लागतात. शिवाय व्यसनाधीनता वाढते हे वेगळे

पालकांना वाटते की, मुलाला काहीच झाले नाही. वेडसरपणाने वागायला लागली तरी त्याला मनोविकारतज्ञांकडे नेले जात नाही. तो शहाणाच आहे. कोणी तरी करणी केली असेल. कौन्सिलर किंवा समोपदेशक ही संकल्पना पाश्चात्य देशासारखी भारतात अजून रुढ झाली नाही. अमेरिकेत असे काही घडले की, पालक कौन्सिलर कडे जाऊन हजारो डॉलर खर्च करतात व शेवटी ध्यान, योग-मानसिक शांततेसाठी असेच काही उपाय सांगून पुन्हा तज्ञांकडे जाण्याचा सल्ला देतात.

हे जर टाळायचे असेल तर माजी राष्ट्रपती डॉ. अब्दुल कलाम यांनी आपल्या पुस्तकांतून, व्याख्यानांतून व वैयक्तिक भेटीतून तरुणांना जो संदेश दिला आहे. त्याची अंमलबजावणी शासन, समाज, पालक या सर्वांनी जर वेळीच घेतली तरच भारताला जागतिक आरोग्य संघटनेने दिलेला इशारा आपण निश्चित खोटा पाडू. डॉ. कलाम यांनी वर्षानुवर्षे हेच सांगितले की, आजच्या शिक्षणाला अध्यात्माची जोड दिल्याशिवाय हे मन, हृदय, बुद्धी यांचे परिवर्तन होणार नाही. डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांनी शिक्षणाची व्याख्या सुद्धा अशीच केली. मन, बुद्धी, हृदय यांचा विकास म्हणजे शिक्षण. प्रत्येकाच्या अंत:करणात अनंत उर्जा जन्मत: मिळालेली असते पण जीवनात जे लोक त्याचा विकास करतात तेच शास्त्रज्ञ, संशोधक व प्रतिभाशाली

कलाकार विद्वान बनतात. म्हणून विवेकानंदांनी शिक्षणाची व्याख्याच अशी केली.

"Education is the manifestation of the
perfection already in man"

शिक्षण म्हणजे माणसाच्या अंत:करणात आधीच असलेल्या पूर्णतेचे प्रकटीकरण. आजचे शिक्षण केवळ माहिती देण्याचे कार्य करते. आतल्या उर्जेला प्रकट करणारे ज्ञान कुठे आहे ?

या अन्त:स्थ शक्तींना बलवान करण्यासाठी योग, ध्यान, मनोनिग्रह, चिंतन..... थोडक्यात अध्यात्माच्या काही अंगांचा अभ्यास जर योग्य पद्धतीने झाला तर नैराश्य नकारात्मक विचार मानसिक दुबळेपणा चुकूनही स्पर्श करणार नाहीत.

म्हणूनच राष्ट्रसंघातील एकशे पंच्याऐशी देशांनी शैक्षणिक अभ्यासक्रमात योगाला स्थान दिले आहे. २१ जून हा योगदिन म्हणून साजरा व्हायचा आहे.

विज्ञान व अध्यात्म हे दोन्हीही जेव्हा हातात हात घालून चालतील तेव्हांच जगात शांती, स्थैर्य, सुख नांदेल. केवळ विज्ञानांनी भस्मासुर निर्माण होतील व केवळ अध्यात्माने भौतिक सुख साधनांना वंचित व्हावे लागेल.

गीता हे अध्यात्मशास्त्रही आहे व विज्ञानही म्हणून ५१५१ वर्षांपूर्वी लिहिलेल्या गीतेतील सिद्धातांची आजही तेवढीच गरज आहे. जोपर्यंत पृथ्वीतलावर मनुष्य आहे तोपर्यंत हे अंतर्बाह्य युद्ध अटळ आहे. महाभारत कधीच संपणार नाही. यांना त्या स्वरुपात मानवी जीवनात संघर्ष राहणारच. म्हणून गीतेची आवश्यकता कधीच संपणार नाही.

२१ वे शतक मनोविकारांचे असणार आहे. म्हणून सर्वांनी सतर्क राहावे यासाठी सर्व तऱ्हेने प्रयत्न करणे गरजेचे आहे.

म्हणून हा श्लोक मांगलिक तर आहेच पण यशस्वी जगण्याचा महामंत्र देणारी संजीवनी आहे.



## श्लोक २

**ध्यायतो विषयान्पुस: संगस्तेषूपजायते ।**
**संगात्संजायते काम: कामात्क्रोधोऽभि जायते ।। ६२।।**
**क्रोधात भवति संमोह: संमोहात्स्मृतिविभ्रम: ।**
**स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्पति ।। २.६३ ।।**

**अर्थ :-** ''विषयांचे चिंतन करणाऱ्या, पुरुषाचा त्या विषयांच्या ठिकाणी संग म्हणजे आसक्ति निर्माण होते. या आसक्तीपासून ते विषय आपल्याला मिळावेत अशी इच्छा, वासना उत्पन्न होते. ते मिळाले नाहीत म्हणजे क्रोध उत्पन्न होतो. क्रोध अनावर झाला की, विवेक नाहीसा होतो. त्यापासून स्मृतिभ्रम, स्मृतिभ्रंशापासून बुद्धीनाश आणि बुद्धीनाशापासून त्या पुरुषाचा सर्वनाश होतो. (२.६२-६३)

दुसऱ्या अध्यायातील वरील दोन श्लोकात विषयापासून माणसाचा सर्वनाश कसा होतो याचे तंतोतंत चित्र उभे केले आहे. हे मनोविश्लेषणात्मक चित्र आहे. चित्तवृत्ती विषयात रमली की विषयांची आवड निर्माण होते. जो जखडून ठेवतो त्याला विषय म्हणतात. विषयाच्या आपण अधिन झालो म्हणजे विषय मारक होतो. कारण त्या आवडीमुळे त्यांच्या प्राप्तीची ओढ लागते आणि ते मिळाले नाहीत की क्रोध निर्माण होतो. केवळ सततच्या विषय चिंतनामुळे सर्वनाश कसा होतो याचे हे प्रत्ययकारी वर्णन आहे.

विषयांचे चिंतन केल्यावर इंद्रियांची ओढ विषयाकडे जाईल व त्यातून कामना निर्माण होतील. कामना पूर्ती झाली की लोभ उत्पन्न होईल व पुन्हा पुन्हा त्याच विषयापासून इच्छापूर्ती व्हावी असे वाटायला लागेल व कामाची पूर्तता झाली नाही, की क्रोध येईल. क्रोध व लोभ हे एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. क्रोधाने संमोह, संमोहामुळे भ्रम, भ्रमातून बुद्धिनाश व बुद्धिनाशातून सर्वनाश असे हे दुष्टचक्र आहे.

या सर्व दुष्टचक्रामध्ये आपल्या दु:खाचे, अनर्थाचे मूळ विषयांच्या चिंतनात आहे. या जगातील जी जी वस्तू हवीहवीशी वाटेल त्या त्या वस्तूला आपण विषय म्हणतो. विषयांचे खरे स्वरुप एकदा समजले की विषय प्राप्त झाला काय किंवा न झाला काय, आपल्या समबुद्धीला ना सुख

ना दु:ख होते. ज्ञानेश्वर माऊली म्हणते –

**''म्हणोनि विषयामाजी सुख । ते साद्यन्तची जाण दु:ख ।**
**परि काय करिती मुर्ख । न सेविता न सरे ।। (ज्ञाने ५.१२०)**

विषयात सुख आहे हा केवळ आपला भ्रम आहे. गीतेत सुद्धा भगवंतानी या विषयांच्या सुखाबद्दल म्हटले आहे. पण मूर्खांना विषयांचा भोग घेतल्याशिवाय राहवत नाही.

**येहि संस्पराजा भोगा: दु:खवयोनय: एव ते ।**
**आद्यवन्तवन्त: कौन्तेय न तेषु रमते बुध: ।। (५.२२)**

अर्थ असा की, बाह्य पदार्थाच्या संयोगामुळे होणारे जे विषयसुख आहे ते केवळ दु:खाचे कारण होत, कारण त्यांना आदि अंत असल्यामुळे ते अल्पकाळ टिकते व दु:खाचे कारण बनते.

पारमार्थिक दृष्टीने ''मी सदैव सुखरुप आहे.'' अशी श्रद्धा व अनुभूती असेल तर मनुष्य विषयांच्या जाळ्यात अडकत नाही. पण ती श्रद्धा नसेल तर विषयांच्या मृगजळामागे आपले धावणे सुटत नाही. जसे कस्तुरीमृगाला आपल्या बेंबीतच सुवास आहे हे माहित नसते म्हणून ते आपले दाही दिशांना धावत असते. व थकल्यानंतर मृतप्राय अवस्थेत बेंबीकडे जेव्हा नाक जाते तेव्हा सुगंधाचा पत्ता लागतो. माणसाचेही असेच आहे. विषयामागून विषयांचे भोग घेतल्यानंतर त्या क्षणिक सुखाचा भ्रम होतो.

एखाद्या विषयापासून निर्माण झालेली आसक्तीच माणसाच्या दु:खाला कारणीभूत होते.

तात्पर्य हे की, भौतिक सुखाची अनिवार इच्छा व त्या सुखातच खरे सुख सामावले आहे अशी भ्रांत धारणाच माणसाला दु:खी करते. चित्तातल्या वृत्तीच माणासाला दु:ख देत असतात. म्हणून सुखाचा झरा कोठे बाहेरच्या विषयात नसून तो अंत:करणात आहे हे त्रिकालबाधित सत्य आहे.

याचा अर्थ असा नव्हे की, विषयांचा भोग घेऊच नये. गीतेने विषयांचा भोग कसा घ्यावा याचे स्पष्ट विवरण केले आहे. भगवंताने मनुष्याला जी इंद्रिये दिली आहेत ती विषयांचा भोग घेण्यासाठीच आहेत. पण हा भोग धर्म व नीतीला अनुसरुन असावा. म्हणून गीता म्हणते,



**धर्माविरुध्दो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ।। ७.११ ।।**

**अर्थ :–** धर्माला विरुद्ध न जाणारा असा मनुष्याच्या ठायी कामही मीच आहे.

म्हणून विषय भोगावेत पण ते जर नीती–धर्मानुसार नसतील तर अशा भोगापासून सुख कधीच प्राप्त होत नाही. विषयाच्या भोगापेक्षा विषयांचे चिंतन अधिक दु:खदायक.

आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे विषय व सुख याचा निश्चित संबंध समजला पाहिजे. कोणत्याही भौतिक विषयापासून जे सुख मिळाले असा भास होतो तो खरे म्हणजे आपल्याच आत्मसुखाचा केवळ स्पर्श असतो. मग कल्पना करा. जरा नुसता स्पर्श झाल्याने जर सुखाची ही भावना असेल तर प्रत्यक्ष विषयाशिवाय असलेले आत्मसुख समाधान काय असेल ? म्हणून त्या आनंदाचे वर्णन तुकारामांनी नेमक्या शब्दांत केले.

**आनंदाचे डोही आनंद तरंग ।**
**आनंदाचे अंग आनंदाचे ।**
**काय सांगू झाले काहीचीया बाही ।**
**पुढे चाली नाही आवडीने ।। (गाथा: १८१३)**

## श्लोक

**तस्मादसक्त: सततंकार्यकर्म समाचर ।**
**असक्तो ह्याचरन्कर्म परम् आप्नोति पुरुष: ।।**

**अर्थ :–** तस्मात म्हणजे (ज्ञानी पुरुष ज्याप्रमाणे कोणतीही फळाची अपेक्षा ठेवत नसल्यामुळे ) तू सुद्धा (फळाचे ठायी) आसक्ती न ठेवता सतत कर्तव्यकर्म करीत जा. कारण आसक्ती सोडून कर्म करीत असणाऱ्या माणसाला परमगती प्राप्त होते.

महात्मा गांधींनी आयुष्यभर अशाच अनासक्तीने सतत राष्ट्रकार्याला झोकून दिले व या देशाला स्वातंत्र्य मिळवून दिले. पंतप्रधान, राष्ट्रपती अशी पदे चालून आली. असती पण आयुष्यभर त्यांनी सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा,

कीर्ती अशा कोणत्याच फळाची अपेक्षा केली नाही. गांधीजी गीतेला आई मानत. जेव्हा जेव्हा काही समस्या निर्माण होत त्यावेळी ते गीतेला शरण जात व गीता त्यांच्या समस्यांचे निराकरण करी. म्हणून गीतेतील अनासक्ती योग त्यांनी निवडला. जनकराजाने हेच केले. केवळ अनासक्तीने केलेल्या कर्मानेच जनक राजाला परमसिद्धी प्राप्त झाली. केवळ लोकांसाठी कर्तव्यभावाने त्यांनी राज्यकारभार केला.

पाश्चात्यांची अशी धारणा आहे की, अध्यात्म व कर्माविषयीची उदासिनता तसेच पुरुषार्थापेक्षा दैव व प्रारब्ध यांच्या प्रभावाने भारतीयांची पिछेहाट झाली व म्हणूनच मोगलांनी, ब्रिटिशांनी आपल्यावर आक्रमणे करुन शतकानुशतके राज्य केले.

गीता अभ्यासानंतर कळते की ही टीका व्यर्थ आहे. गीतेने ''नीयतं कुरुत्वं'' नहि कश्चित क्षणमपि जातु, तिष्ठत्यकर्मकृत'' ''योगस्थ: कुरु कर्माणि'' ''सतत कर्म करण्याचा आदेश कृष्णाने दिला आहे.

मूळात गीतेचा जन्मच अर्जुनाच्या अकर्तेपणा मुळे झाला आहे. ''मी युद्ध करणार नाही. त्या पेक्षा मी संन्यास घेईन.'' या अर्जुनाच्या निष्क्रीयपणामुळे भगवंताला अठराअध्याय सांगावे लागले. म्हणून अर्जुनाला शेवटी नि:शंक होऊन सांगावे लागले की, ''क़रिष्ये वचनं तव.'' मी तुझ्या वचनाप्रमाणे कर्म करीन. तेव्हा गीतेचा शेवट झाला आहे.

गीता माणसाला सतत कर्म करायला प्रवृत्त करते पण हे कर्म नेमके कसे करावे, याचे स्पष्ट विवेचन करते. ''स्वकर्मणा तमभ्यर्च्य'' हे गीतेचे कर्मयोगाचे सार आहे.

''स्वे स्वे कर्मण्यभिरत: सिद्धीं विदन्ति मानव:'' स्वधर्म म्हणजे विहीत कर्म की जे भगवंताच्या इच्छेने मला प्राप्त झाले आहे. ते कर्तव्यभावनेने करुनच मला सिद्धी प्राप्त होईल. फक्त केलेले विहीत कर्म भगवंताच्या चरणी वाहावे व कर्मफलाच्या बंधनातून सुटावे. तमभ्यर्च्य म्हणजे त्या ईश्वराला अर्पण करुन.

म्हणून कर्म कसे अर्पण करावे यासाठी भगवंत स्वमुखाने सांगतात,



**''यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौतेंय तत्कुरुष्व मदर्पणम् ।।**

**अर्थ :-** हे कौन्तेया, तू जे जे करतोस, जे खातोस जे हवन करतोस, जे दान करतोस, जे तप करितोस, ते सर्व मला अर्पण करीत जा.''

भगवंताचे आश्वासन आहे की, ही सर्व कर्मे मला अर्पण करण्यानेच तू कर्मबंधनातून मुक्त होशील. हीच खरी माझी भक्ती आहे. कर्म करण्याची शक्ती, बुद्धी तो ईश्वरच देत असल्यामुळे, त्यालाच कृष्णार्पण बुद्धीने सर्व कर्मे अर्पण करण्यानेच तो प्रसन्न होतो.

याचे सार श्री ज्ञानेश्वरांच्या शब्दात असे,

**तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।**
**पूजा केली होय अपारा । तोषालागी ।। (ज्ञाने. अ. १८.९१७)**

**अर्थ :-** ''हे वीरा अर्जुना, त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरुपी फुलांनी पूजा केली असता, ती पूजा त्याच्या अपार संतोषाला कारणीभूत होते.

हे सर्व अर्पण करत असताना मात्र भगवंताची अट आहे. कर्मयोग दोन पायावर उभा आहे. एक अनासक्ति व दुसरा अहंकारमुक्ती कर्मरुपी फुलांची ओंज़ळी भगवंताला वाहात असताना ही कर्मे मी केली, माझ्यामुळे पूर्ण झाली, मी नसतो तर झालीच नसती असा अहंकार मनात नसावा. 'मी-माझे' या ऐवजी 'तू व तुझे' हा भाव मनात असावा. केलेल्या कर्माच्या फळाची आसक्ती न ठेवता ते कर्म यज्ञीय भावनेने करावे. येथे यज्ञ याचा अर्थ परोपकारासाठी केलेले कोणतेही कर्म म्हणजे यज्ञ. विहीत कर्म म्हणजे स्वधर्म.

फलकामना हेच सर्वनाशाचे मूळ आहे. ही फलकामनाच मनुष्याला अज्ञानात व कर्मबंधनात अडकून ठेवते. ती मनुष्याला सतत स्वार्थपरायण व स्वकेंद्रित बनवले. अहंकाराची भावना या फलकामनेमुळे वाढते. म्हणून फलापेक्षा न करता, कर्तव्यबुद्धीने अनासक्त होऊन, यज्ञीय भावनेने स्वधर्मरुपी कर्मे करणे म्हणजे ती कर्मे शुद्ध करणे होय. अशी शुद्ध झालेली कर्मे, ताज्या टवटवीत फुलाप्रमाणे भगवंताला वाहिली तरच भगवंताला ती कर्मे आवडतात.

असे झाले तरच अशा कर्मातून आत्मसुखाचा, अक्षय आनंदाचा लाभ होतो.

संपूर्ण गीतेमध्ये ''निर्ममो निरंहकार'' हे स्थितप्रज्ञाचे व उत्तम भक्ताचे, कर्मयोग्याचे प्रमुख लक्षण कृष्णाने पुन्हा पुन्हा सांगितले आहे. हा दैवी गुण आहे. आसक्ती व ममत्व दूर झाल्याशिवाय निर्ममी व निरंहकारी होऊ शकत नाही.

ज्ञान, कर्म व भक्ती यांचा समन्वय हे गीतेचे प्रमुख वैशिष्ट्य आहे.

श्रीकृष्णाने स्वत: हा कर्मयोग जीवनभर आचरला. मोठमोठ्या राजांना जिंकून अनेक राज्ये पादाक्रांत केली. प्रचंड वैभवाचा, व सत्तेचा मोह कृष्णाला कधीही झाला नाही. क्रूर, अन्यायी, असुरी राजांना सत्ताभ्रष्ट करुन योग्य माणसांच्या हाती सत्ता सोपविली. अत्यंत नम्रतेने विजय स्वीकारला. राजसूर्य यज्ञाच्या वेळी यजमानपद नाकारले. स्वत: गुरु आचार्य ब्राह्मणांच्या उष्ट्या पत्रावळ्या काढल्या. मथुरेवर सतरा वेळा आक्रमण झाले. अठराव्या वेळी जेव्हा होणार होते त्यावेळी केवळ लोकांच्या कल्याणासाठी स्वत: 'रणछोडदास' झाला. पुढच्या विजयासाठी माघार स्वीकारली. नंतर द्वारकानगरी स्थापना केली. बालपणापासून अंतीम क्षणापर्यंत याच वृत्तीने कर्मयोग केला.

## श्लोक

**अर्जन उवाच : अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पुरुष: ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजित: ।। ३.३६ ।।**

**श्री भगवान उवाच : काम एष: क्रोध एष: रजोगुण समुद्भव: ।**
**महाशनो महापाप्मा विद्धयेनमिह वैरिणणम् ।। ३.३७ ।।**

**अर्थ :-** अर्जुन म्हणाला, ''हे श्रीकृष्णा, तर मग स्वत:ची इच्छा नसतानाही बलात्कार केल्याप्रमाणे मनुष्य पाप करतो ते कोणाच्या प्रेरणेने? ।। ३.३६ ।।

श्री भगवान म्हणाले, ''या बाबतीत रजोगुणांपासून उत्पन्न झालेला मोठा अधाशी व मोठा पापी असा हा काम व क्रोध हाच आपला शत्रू आहे असे समज ।। ३.३७ ।।



तिसऱ्या अध्यायाच्या छत्तीसाव्या श्लोकात अर्जुन कर्माच्या पाप-पुण्यासंबंधी प्रश्न भगवंताला विचारतो, हा प्रश्न तुम्हां आम्हा सर्वांनाच जिव्हाळ्याचाच प्रश्न आहे. २१ व्या शतकात सर्वांच्या मनात धुमसणारा आजच्या भ्रष्टाचार, बलात्कार, खून, दरोडे, लूटमार अशा पाप कर्मांविषयीचा हा प्रश्न आहे. अर्जुन केवळ आपला प्रतिनिधी नाही तर आपणच सर्वजण अर्जुनच आहोत. आज भ्रष्टाचाराचा राक्षस सर्वच क्षेत्रात थैमान घालत आहे. अगणित काळा पैसा परदेशी बँकात पडून आहे. चांगली चांगली उच्चशिक्षित, उत्तम संस्कारित अशी माणसे हा भ्रष्टाचार का करतात ? कधी मनात नसताना सुद्धा, अशी कोणती शक्ती त्यांना ही पापे करण्यास प्रवृत्त करते ? बलात्कारासारखे अमानुष पाप करताना, ही चांगली माणसे सुद्धा असे घोर कर्म कसे करु शकतात ? जन्मठेप किंवा फाशीची तरतूद असलेले अशा प्रकारचे गुन्हे करताना ते एवढे मोहवश व निर्भय कसे होतात ?

आपल्या मनातला नेमका प्रश्न अर्जुनाने ५१५० वर्षापूर्वी भगवंताला विचारला व भगवंताने देखील शाश्वत असे उत्तर देऊन, मानवजातीच्या दुबळेपणावर दोष ठेवला आहे. या उत्तरात माणसाच्या मनाचे विश्लेषण सुंदर प्रकारे केले आहे. आपल्या खऱ्या शत्रूची ओळख करुन दिली आहे. रजोगुणांपासून निर्माण झालेले काम व क्रोध हेच खरे आपले वैरी आहेत. कारण माणसाची इच्छा व प्रवृत्ती नसताना सुद्धा केवळ मोहवश होऊन हे या शत्रूंना बळी पडतात. रोजच्या वर्तमानपत्रात सर्वच क्षेत्रातल्या तथाकथित विवेकी महनीय माणसांच्या कथा प्रसिद्ध झाल्या की, सर्वांना आश्चर्याचा धक्का बसतो व मनात प्रश्न येतो की, त्याने हे असे का केले ?

म्हणून या असुरी शक्तींचे अचूक स्वरुप ओळखणे गरजेचे आहे. जीवनात या दोन शक्तींना बळी पडायचे नसेल तर ते कोणत्या उपायांनी ? याचाही विचार आपण करायचा आहे.

या श्लोकावर निरुपण करतांना, काम-क्रोध यांचे बहारदार वर्णन ज्ञानेश्वर माऊलीने केले आहे. त्यांचे सार आपण लक्षात घेऊ ...

**तरी हे काम क्रोध पाही । जयाते कृपेची साठवण नाही ।**
**हे कृतान्ताचा ठायी । मानिजती ।। ३.२४० ।।**

**हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरांचे वाघ।**
**भजनमार्गीचे मांग । मारक जे ।। ३.२४० ।।**
**हे जळेवीण बुडविती । आगीवीण जाळिती ।**
**न बोलता कवळीती । प्राणियांते ।। २५७।।**
**हे शस्त्रेवीण साधिती । दोरेवीण बांधिती ।**
**ज्ञानियासी तरी वाधिती । पैज घेऊनी ।। ३.२५८ ।।**

**अर्थ :–** तर अर्जुना, हे बलात्कार करणारे काम, क्रोध आहेत हे असे आहेत की, ज्यांच्या मनात दयेचा साठा मुळीच नाही. म्हणून हे काम, क्रोध प्रत्यक्ष यमधर्म (मृत्यूला कवटाळणारे) आहेत असे मानले जाते ।। २४० ।।

हे ज्ञानरुपी ठेक्यावर असलेले सर्प आहेत. हे विषयरुपी दऱ्यात राहणारे वाघ आहेत. हे भजनरुपी रस्त्यावरील वाटमारे मांग आहेत ।। ।। २४१ ।।

हे पाण्यावाचून बुडवितात, अग्निवाचून जाळतात आणि प्राण्यांना गुपचूप घेरतात ।। २५७ ।।

हे शस्त्रावाचून ठार करतात, दोरावाचून बांधतात आणि ज्ञानी माणसांना तर प्रतिज्ञापूर्वक ठार करतात. ।। २५८।। ३ रा अध्याय

रजोगुणांपासून निर्माण झालेले हे काम, क्रोध अशा प्रकारे हाहाकार उडवितात.

सर्व भारतीय ग्रंथातून, श्री ज्ञानेश्वरांनी सातशे वर्षांपूर्वी केवळ भगवद्गीता निवडली. त्यावर भाष्य केले त्यालाच भावार्थदिपीका किंवा ज्ञानेश्वरी म्हणतात. सातशे श्लोकांचा अर्थ, निरुपण त्यांनी नऊ हजार ओव्यात केले. श्री ज्ञानेश्वरांना विष्णूचा अवतार मानले जाते. कृष्णाला रणभूमीमध्ये अर्जुनाला गीता सांगावी लागली त्यामुळे मनात असूनसुद्धा भगवंताला दृष्टांताद्वारे ती विस्ताराने सांगता आली नाही. पण ही उणीव ज्ञानेश्वरांनी भरुन काढली. प्रत्यक्ष भगवंताच्या मनात जे भाव असतील ते त्यांनी त्यावेळच्या मराठीत दृष्टांत व सिद्धांत याद्वारे रसाळ भाषेत समजावली. म्हणून गेली सात शतके, लोक ज्ञानेश्वरीला डोक्यावर घेऊन नाचतात. ग्यानबा–तुकाराम हा मराठी माणसाचा श्वास आहे. वारकऱ्यांचा जीवन मंत्र



आहे. म्हणून मधून मधून गीता नेमकी समजण्यासाठी ज्ञानेश्वर तुकाराम यांच्या वचनाचा आपण आधार घेतोय. संत तुकारामांनी ''वेदांचा तो अर्थ । आम्हांसीच ठावा ।'' असे अधिकारवाणीने सांगितले असो.

काम–क्रोध आले की, मोह येतो. मोहापाठोपाठ अहंकार हात धुवून मागे लागतो. अहंकारापाठोप दंभ ..... अशी सर्व असुरी संपत्ती एकाच कुटूंबासारखी, मनुष्याला घेरते. त्याचा सर्वनाश होईपर्यंत पिच्छा कधी सोडत नाही. हे तेव्हा मनुष्याला घेरायला लागतात, त्यावेळी त्याच्या हृदयातील शांती निघून जाते. शांतीपाठोपाठ सुख, समाधान, प्रसन्नता सोडून जाते. ज्ञानी माणसाची विद्या हरपते व त्याची जागा अविद्या–अज्ञान घेते. होता होता सद्‌गुणही निघून जातात. जे राहते ती असुरी संपत्ती. मग ही संपत्ती त्या व्यक्तीला, समाजाला व कुटूंबाला छळायला लागते. व्यक्तीचा तरी पूर्णनाश होतोच. पण सर्वांनाच कठीण दिव्यातून पार पडावे लागते. कायदा आपल्या मार्गाने द्यायची ती शिक्षा देतोच पण त्या आधीच काम व क्रोध हे राक्षस त्याला अंतर्बाह्य पोरवरुन टाकतात.

अशा या 'कामा' चे नेमके स्वरुप काय ? आपल्या भारतीय तत्वज्ञानांत या विकारांचे वर्णन ठायी ठायी आढळते. हे सर्व विकारच माणसाचे खरे शत्रू आहेत. आणि ते जन्मापासूनच मनुष्य घेऊन येतो. देव व असुर, शांति–अशांती, क्रोध–प्रेम, दैवी व असुरी संपदा, प्रकाश अंधार, विष–अमृत, राम–रावण, कृष्ण–कंस, अधोगती–उर्ध्वगती, सुख–दुःख, सत्–असत् अशी द्वंदे घेऊनच माणसाचा जन्म होतो. ''आहार निद्रा भय मैथुनंच सामान्यम् एतत् पशूभीः नराणाम्'' या चार गोष्टी पशूंना व माणसांना समान आहेत. पण भगवंताने केवळ माणसाला बुद्धीची देणगी दिली आहे. सारासार बुद्धीसाठी विवेकाची देणगी दिली आहे. की जी इतर कोणत्याही प्राण्याला लाभलेली नाही. म्हणून म्हटले जाते. ''नर करणी करे तो नरका नारायण हो जाये ।'' म्हणून अनेक संत, महात्मे या पदाला पोहोचू शकले.

धुराने जसा अग्नी किंवा धुळीने जसा आरसा आच्छादला जातो तसे ह्या काम, क्रोधाने माणसाचे ज्ञान, विवेक झाकून जातो. 'काम' त्याचे स्वरुप भागवतातील एकाच श्लोकात प्रकट झाले आहे. तो प्रसिद्ध श्लोक असा –

**न जातु काम: कामानाम् उपभोगेन शाम्यति ।**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एव अभिवर्धते ।। भागवत् ।।**

**अर्थ :-** ''माणसाच्या इच्छा, भोग, काम हे त्यांचा उपयोग घेऊन सुद्धा तृप्त होत नाहीत. एक इच्छा पूर्ण झाली की, त्यात दुसऱ्या इच्छेचा जन्म होतो. तूप अग्नीत टाकल्यावर जसा अग्नि भडकतो. तसेच या कामाचे आहे.''

काम म्हणजे केवळ लैंगिक इच्छा असा अर्थ येथे अभिप्रेत नाही. विषय पाहिला की इच्छा निर्माण होते. दिवसातून अशा अनेक इच्छा निर्माण होत असतात. पण ती इच्छा होते, काही काळ राहते, व निघून जाते. पण एखादी इच्छा अशी असते की, ती घर करुन मनात राहते. व सतत घर घर करायला लागते. दिवसा रात्री व झोपेत सुद्धा त्याचे चिंतन सुरुच असते. ती इच्छा पूर्ण झाल्याशिवाय त्याचे मन शांत होत नाही. म्हणून ती इच्छा हाच काम होतो. रजोगुणामुळे होणारा हा काम त्याचा उपभोग घेऊन सुद्धा पूर्ण तृप्त होत नाही. पुन्हा पुन्हा हवाहवासा वाटतो. इच्छा, वासना कधीही संपत नाही. एक इच्छा पूर्ण झाली की, त्यातच दुसऱ्या इच्छेचा जन्म होतो. ही साखळी कधी पूर्णच होत नाही. शरीर, इंद्रिये थकतात, वय वाढते. पण मनातल्या वासना कधीही मिटत नाहीत. जसे,

**''कालो न यातो वयम् एव याता: ।**
**भोगा न भुक्ता वयमेव भुक्ता: ।।**
**तपो न तप्तं वयतेव तप्ता: ।**
**तृष्णा न जीर्णा: वयमेव जीर्णा: ।।**

**अर्थ :-** ''काळ कधीच निघून जात नाही. पण आपण मात्र या जगातून निघून जातो. भोग आपण भोगत नाही. भोगच आपल्याला भोगत असतात. तप कधी तापत नाही. आपणच तापले जातो. व शेवटी माणसाची तृष्णा कधीही संपत नाही. आपण मात्र जीर्ण होतो.''

तृष्णा म्हणजे तहान. मला हे हवे , मला ते हवे, हे कधीच संपत नाही ही तहान कधीच तृप्त होत नाही.



''न जातु काम:..... '' हा श्लोक राजा ययातीच्या तोंडी आहे. भागवतात ही प्रदीर्घ कथा आली आहे. या राजाला मिळालेल्या वराप्रमाणे वृद्ध झाल्यावर तो आपल्या मुलाचे तारुण्य मागून घेतो. तीनशे वर्षे ययाती जगला. प्रपंचातील सारे भोग पुन्हां पुन्हां घेतले पण तृप्ती कधी झाली नाही. काम कधी शांत झाला नाही. शेवटी ययातीने मानवजातीला हे सत्य सांगण्यासाठी हा महान श्लोक सांगितला.

मराठीतील श्रेष्ठ कादंबरीकार कै. वि. स. खांडेकर यांनी याच कथेवर 'ययाति' ही कादंबरी लिहीली. या कादंबरीला मराठीतील सर्वश्रेष्ठ ज्ञानपीठ पारितोषिक प्राप्त झाले आहे.

ही आपली प्रत्येकाचीच कथा आहे. आपल्यात ययाती दडलेलाच आहे. सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, कीर्ती कितीही लाभली तरी, आपली तृष्णा कधीही भागत नाही. भूक कधीही मिटत नाही. मृत्यू दारात येऊन उभा असला तरी ती आसक्ती कधी संपत नाही.

म्हणून तेच आपले खरे वैरी आहेत. तेच मनुष्याला पाप-प्रवृत्त करतात. मोहाचा एक क्षण सुद्धा मोठमोठ्या तपस्व्यांचे तप हरण करु शकतो तेथे सामान्य माणसाचे काय ?

आळस, अज्ञान, तामसी आहार, अभद्र, चिंतन, रजोगुण यांनी मोहग्रस्त झालेले लोक काम-क्रोधाला क्षणात बळी पडतात. यावरील उपाय भगवंतानेच सांगून ठेवला आहे.

इंद्रिय निग्रह व संयमित जीवन हाच त्यावरील उपाय यासाठी रजोगुणातून सात्विक गुणांकडे वळले पाहिजे. जेवढी सात्विकता वाढेल तेवढे हे बलाढ्य शत्रू निष्प्रभ होतील.

आपले 'मन' च सर्वस्वी जबाबदार आहे. या चंचल मनाला संयमित करण्यासाठी त्याला नित्य अभ्यास व वैराग्याने स्थिर, शांत ठेवले पाहिजे. मनाचा सर्वात मोठा गुण असा की, त्याला ज्या ज्या गोष्टींची आवड लागते तेथेच ते स्थिर व शांत होते, म्हणून सात्विक आहार, विचार, आचार, योगाभ्यास, भजन, कीर्तन अशा नवविधा भक्तीतला कोणताही प्रकार, ध्यान, यांची गोडी लावली पाहिजे. असे केले की, मनाचे उन्नयन होते.

भगवंताने शेवटी समजावले आहे की, इंद्रियापेक्षा मन मोठे, मनाहून बुद्धी व बुद्धीहून आत्मा. म्हणून इंद्रियाचेही दमन करण्यास, अभ्यास केला पाहिजे व बुद्धी सात्विक कशी होईल याचीही साधना आवश्यक आहे.

कारण इंद्रिये, मन व बुद्धी या तीनच गोष्टी काम-क्रोधाची अधिष्ठाने म्हणजे घर आहेत. या तीनही गोष्टी संयमित, निग्रही झाल्या की, या काम, क्रोधाचे काहीच चालत नाही. बुद्धीपलिकडे असलेस आत्म्याचे स्वरुप ओळखून आपणच आपल्या या कामरुपी राक्षसाला ठार केले पाहिजे.

कृष्णाने आयुष्यभर इंद्रिये, मन, बुद्धी यांचे समत्व, संतुलन साधले. जे जे काम कृष्णाने स्वीकारले ते पूर्णपणे देहभान विसरुन, निष्ठेने तडीला नेले. त्यावेळच्या प्रथेप्रमाणे आठ विवाह केले. पण धर्म व नीतीला सोडून काम-क्रोधाच्या अधीन कधीच झाले नाहीत. क्रोध आत्मनाशाला कारणीभूत असतो. तो स्वत:लाही जाळतो व दुसऱ्यांना सुद्धा जाळतो. याची पक्की जाणीव असल्यामुळे आपल्याच यादव वंशाच्या लोकांना शांतपणे कृष्णाने स्वीकारले. आपल्या दुराचारी कर्मानेच यादवांचा नाश होईल असे समजून त्यांनी कधीही त्यांच्यावर आगपाखड केली नाही. दुर्योधन, दु:शासन व शकुनीमामा यांनी कृष्णाला शिष्टाईच्या वेळी, सभागृहातून त्याला जाऊ न देण्यासाठी षड्यंत्र रचले होते. कृष्णाला हे समजले व ते ओळखून क्रोध आवरुन शांतपणे काढता पाय घेतला. देह सोडण्याच्या वेळी ज्या व्याधाने त्यांना बाण मारला होतो, त्याला जीवदान तर दिलेच पण उत्तम गती प्राप्त होईल असा आशीर्वादही दिला. कंसाला क्रोधाने उत्तर दिले पण क्रोधाचे ते नाटकच होते. क्रोधाचे नाटक जरुर करावे, कारण त्याचा अंत:करणावर काहीही विपरीत परिणाम होत नाही. याची पुरेपूर जाणीव कृष्णाला होती. विकारांचे दमन केल्याशिवाय बाहेरील दुष्ट, राक्षसी शक्तींचे दमन, संहार करता येत नाही. हे तत्वज्ञान त्यांनी आचरुन दाखविले. म्हणूनच कृष्णाचे जीवन संयमित, संतुलित व योगस्थ व सात्विक होते.



## अध्याय ४ था

### श्लोक

**''नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदती ।। ४-३८ ।।**
**श्रद्धावान लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिम् अचिरेण अधिगच्छति ।। ४-३९ ।।**
**अज्ञः अश्रद्धानःच संशयात्मा विनश्यति ।**
**न अयम् लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ।। ४० ।।**

**अर्थ :-** ''ज्ञानासारखे पवित्र या जगात खरोखरच दुसरे काही नाही. ते ज्ञान, साम्यकर्मयोगाने अंत:करण शुद्ध झालेला साधक योग्य काळानंतर प्राप्त करतो ।। ३८ ।। सात्विक श्रद्धावंत, इंद्रियावर संयम असणारा व ज्ञानाची सदैव उत्कंठा असणारा साधक ते ज्ञान प्राप्त करुन परम् शांतीला प्राप्त करुन घेतो ।। ३९ ।। ज्ञानहीन, अश्रद्ध व संशयी माणूस नाश पावतो. संशयखोर मनुष्याला हा लोक अथवा परलोक व सुखही प्राप्त होत नाही ।। ४.४० ।।

कृष्ण सांदिपनी ऋषींच्या आश्रमात फक्त ६५ दिवस राहिला पण त्या अवधीत तो खूप काही शिकला. गुरु व सहकारी गुरुबंधूंचे अपार प्रेम मिळविले. सर्व कलापांरगत असल्यामुळे कृष्णाला पूर्णावतार म्हटले जाते. आश्रम सोडण्याच्या वेळी शिष्यवर्गाने कृष्णाला सांगितले, ''गुरुदेवांच्या पुत्राला पंचजन्य नावाच्या असुराने दैत्य बनविण्यासाठी पळवून नेले आहे. तो त्यांचा एकुलता एक पुत्र आहे. तू त्यांचा पुत्र परत आणून देऊन सर्वांचे दु:ख दुर कर'' सांदिपनी ऋषी आदर्श व दिव्य ब्राह्मणांपैकी एक होते. त्यांनी कोणत्याही स्वरुपात गुरुदक्षिणा मागितली नव्हती. पंचजन्याला ठार करुन कृष्णाने त्या मुलाला गुरुचरणी अर्पण केले. हीच त्याची गुरुदक्षिणा होती. पंचजन्य राक्षसाच्या हाडांचा भुगा करुन एक शंख बनविला. त्या शंखाचे नाव पांचजन्य ! त्या दिवसापासून कृष्णाच्या हातात पांचजन्य शंख आहे ते प्रतिक म्हणून. सात्विक माणसांना अहंकारी बनून सतावू नका. नाहीतर

तुमचीही गत पंचजन्य राक्षसासारखी होईल.

कृष्ण जीवनभर याच नीतीने वागला. ''परित्राणाय साधूनां'' सज्जनांच्या रक्षणासाठी व दुर्जनांच्या नाशाचे अवतार कार्य कृष्णाने केले. आपली बुद्धी, ज्ञान, चातुर्य, कौशल्य, गुण, नीती या कार्यासाठी वापरली.

जगाला आपल्या तत्वज्ञानाने दिपवून टाकले. केवळ ज्ञान सांगितले नाही तर ते प्रत्यक्षात आचरुन दाखविले. कृष्णाने १३ व्या अध्यायात ज्ञानाची सुंदर व्याख्या केली आहे. या अध्यायातील सात ते अकरा या श्लोकात 'ज्ञान' या शब्दाची अलौकिक व्याख्या केली आहे. ''अमानित्व (मान नसणे), दंभ नसणे, अहिंसा, क्षमा, स्थैर्य, मनोनिग्रह... ते अध्यात्म ज्ञान नित्य आहे अशी बुद्धी असणे हे एकंदर वीस गुण ज्या मनुष्याच्या ठिकाणी दृष्टीस पडतात त्याला 'ज्ञान' प्राप्त झाले असे म्हणावे व तो मनुष्य जेंव्हा हे सर्व गुण आचरणात आणतो तेंव्हा त्याला ज्ञानी म्हणावे.

२१ व्या शतकात ज्याला ज्ञान म्हणतात ती केवळ माहिती असते. निरनिराळ्या विद्याशाखात जेवढी जास्तीत जास्त माहिती असेल तो तितका ज्ञानी म्हणून गौरविले जाते. प्रत्यक्ष जीवनात तो कसा वागतो हे गौण आहे. पण श्रीकृष्णाच्या या व्याख्येनुसार जेव्हा तो गुणांनी मंडीत असतो तेंव्हा त्याचा आत्मविकास झालेला असतो. तो स्वतः शांत, तृप्त, संयमी, आनंदी, शुद्ध, निरहंकारी, अनासक्त, क्षमाशील, समचित्त, श्रद्धावान, शीलसंपन्न... अशा दैवी गुणांनी संपन्न असतो. जीव, जगत्, जगदीश्वर यांचे ज्ञान झालेले असल्यामुळे सर्वांच्यावर आत्मवत् प्रेम करणारा असतो.

समर्थ रामदासांनी सुद्धा ज्ञानाची अशीच व्याख्या केली आहे...

**''ज्ञान म्हणजे आत्मज्ञान ।**
**पाहावे आपणांसी आपण ।**
**या नावे ज्ञान ।।''**

या ज्ञानात हृदय, मन, बुद्धी यांचा विकास असतो. ''मी कोण'' हे जाणण्याचे प्रयत्न असतात. ते ज्ञान पोटार्थी नसते. ते आत्मोन्नती व मानवता यांनी परिपूर्ण असते. ''आत्मनो मोक्षार्थं जगत् हितायच'' म्हणून ''स्वतःचा परिपूर्ण विकास व जगाच्या कल्याणासाठी मिळविलेल्या ज्ञानाचा पूर्ण उपयोग''



हे रामकृष्ण संघाचे ब्रीदवाक्य, घोष वाक्य आहे.

म्हणून द्रव्य यज्ञापेक्षा तपयज्ञ, त्यापेक्षा योगयज्ञ व सर्व यज्ञात ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे असे वरील श्लोकाआधी म्हटले आहे. आत्मचिंतन व महापुरुषांचा सत्संग करुन हे ज्ञान मिळविले पाहिजे. असे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर ''वासुदेवः सर्वम्'' अशी दृष्टी येते. बंधूता, समता, प्रेम, करुणा, दया, क्षमा, शांती ही महान मूल्ये कोणत्या विद्यापीठात व कोणत्या अभ्यासक्रमात शिकणार ? मनाचे, बुद्धीचे, हृदयाचे उन्नयन करणारे ज्ञान हे वरील वीस गुणांना आत्मसात करण्यात आहे.

म्हणून गीतेमध्ये भगवंतानी दुसऱ्या अध्यायापासून १८ व्या अध्यायापर्यंत अशा दैवी गुणांचा पुन्हा पुन्हा उच्चार केला आहे. हे सर्व मनुष्याच्या पातळीवरचे गुण आहेत. संत, महात्म्ये, देव यांनीच हे गुण धारण करायचे नसतात. असे ज्ञान श्रद्धावान माणसाला होते. ते प्राप्त झाल्यावर शांतीचा अंकुर फुटतो व मगच त्या ज्ञानाचा विस्तार होतो. असे ज्ञान शुद्ध चित्तात प्रसवते. अंतःकरण शुद्धी झाल्यावर ज्ञानाचा उदय होतो. अशा शुद्ध अंतःकरणाने भगवंताशी जे प्रीतिपूर्वक जोडलेले असतात. त्यांना मी बुद्धीयोग अर्पण करतो असे भगवंताने आश्वासन दिले आहे.

**ददामि बुद्धीयोगं तं येन माम उपयान्ति ते ।। १०.१० ।।**

ज्ञान म्हणजे प्रभावी विचारांचे प्रक्षेपण. दैवी विचारांनी मनःपरिवर्तन झाले पाहिजे. कारण ''मन एव मनुष्याणां कारण बन्धमोक्षयोः'' म्हणून मनाचे उन्नयन, उदात्तीकरण करण्यासाठी सामर्थ्यशाली विचार मनाला दिले पाहिजेत. या विचारांनीच मन बुद्धी बदलते. विचार बदलले की कर्महीबदलायला लागते.

या सर्वांसाठी डोळस श्रद्धा मनुष्याजवळ पाहिजेत. श्रद्धा जर बळकट असेल तर इंद्रिय संयमन करुन, त्यालाही शांती प्राप्त होते. जेथे अज्ञान तेथे, अशांत मन. मग जेथे अशांती असेल तेथे सुख कसले ? कारण ''अशान्तस्य कुतो सुखं '' (२.६६) म्हणून तो अज्ञानी असतो व ज्याची गुरु, ईश्वर यांच्यावर श्रद्धा नसते तो संशयाच्या भोवऱ्यात सापडलेला असतो. असा संशयात्मा नाश पावतो. संशयखोर माणसाला या जगात

सफलता प्राप्त होत नाही. उत्तम परलोकही मिळत नाही आणि अशांतीमुळे साधे सुखही मिळत नाही.

म्हणून ज्ञान माणसाला पवित्र करते. चित्तशुद्धी झाली की ज्ञान प्रतिष्ठित होते. असे स्थिर ज्ञान माणसाला शांती प्राप्त करुन देते.

म्हणून कृष्णाने अर्जुनाला गीतेच्या माध्यमातून सर्व प्रकारचे ज्ञान दिले. या ज्ञानानेच अर्जुनाच्या मनातील अविद्येचा, अज्ञानाचा अंध:कार दूर झाला. शंका मिटल्या व शेवटी, ''करिष्ये वचनं तव'' – तुझ्या वचनाप्रमाणे मी आता कर्म करीन, असे वचन कृष्णाला दिले.

गीता मनुष्याचे अज्ञान, शंका दूर करते. आजही गीता मानवाचे २१ व्या शतकातले प्रश्न, समस्या सोडविण्यासाठी समर्थ आहे.

बालपणीच कृष्णाने या ज्ञाननीतिचा उपयोग परंपरागत आलेल्या चुकीच्या रुढी बदलण्यासाठी केला. इंद्रपूजेच्या ऐवजी गोवर्धन पुजा आणली. समता, बंधूता आणण्यासाठी सर्वांशी प्रेमपूर्वक संबंध ठेवले. असुरी शक्तीविरूद्ध लढण्यासाठी लहान–थोर अशा सत्प्रवृत्त राजांचे संघटन केले. त्यांच्या मनातील अज्ञान दूर केले.

## अध्याय ५ वा

### श्लोक

**येहि संस्पर्शजा भोगा दु:खयोनय एव ते ।**
**आद्यन्तवन्त: कौन्तेय न तेषु रमते बुध: ।। (५.२२)**
**शक्तोतीहैव य: सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।**
**क्राम क्रोधोभ्दवं वेगं सयुक्त: स:सुखी नर: ।। (५.२३)**

**अर्थ :–** हे सर्व भोग विषय दु:खकारक आहेत. कारण त्यांना आदि, अन्त आहे. म्हणून विषय व इंद्रिये एकत्र आल्यावर मिळणारी सुखे परिणामी दु:ख देतात. ती सुखे उत्पन्न होऊन नष्ट होत असल्याने शहाणा, ज्ञानी माणूस त्यात रमत नाही. (५.२२)

शरीर सोडण्याचा क्षण येईपर्यंत ज्याने या कामक्रोधांना आवरले,



आहे. तोच खरा कर्मसंन्यासी व खरे सुख त्यालाच प्राप्त होते (५.२३)

कृष्णाने या दोन श्लोकात सुखी माणसाची व्याख्या केली आहे. ''जगी सर्व सुखी असा कोण आहे ?'' असे संतांनी म्हटले आहे. ''सुख पाहता जवापाडे, दु:ख पर्वता एवढे'' म्हणून ''संसार दु:ख ऐसे, दु:ख आणिक नाही'' असे संसाराचे वर्णन केले आहे.

पण गीतेचा प्रवास हा दु:खापासून (विषादापासून) प्रसन्नतेकडे, आनंदाकडे नेणारा आहे. अर्जुनाला युद्धप्रवृत्त करुन, प्राप्त विहीत कर्तव्य, स्वधर्म पाळण्यास कृष्णाने प्रवृत्त केले. स्वधर्म करणाऱ्याला सुख, समाधान प्राप्त होते.

अर्जुनाच्या निमित्ताने मानवाचा अत्यंत जिव्हाळ्याचा प्रश्न म्हणजे 'सुख', याचे रहस्य या दोन श्लोकात आले आहे.

संपूर्ण गीतेमध्ये भगवंतानी या सुख–दु:खावर खूप वेळा भाष्य केले आहे. मोह, लोभ, क्रोध ही नरकाची तीन द्वारे आहेत असे सोळाव्या अध्यायात म्हटले आहे. इंद्रिये व विषय यांच्या संयोगाने प्राप्त होणारी सुखे अत्यंत क्षणिक आहेत. कधी ते दु:ख देतात तर कधी सुख यांना आदि अंत असल्यामुळे ज्ञानी माणसे यात रमत नाहीत.

प्रश्न असा निर्माण होतो की, मग भगवंताने ही पाच प्रकारची इंद्रिये का दिली ? क्षणिक का असेना पण सुख तरी मिळते ना ? हे विषय भोग तरी का निर्माण केले ?

याचे सुंदर उत्तर कृष्णाने दिले आहे ''धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि'' जो धर्माला व नीतीला अनुसरुन जो काम आहे, विषय भोग आहे तो मनुष्याने जरुर घ्यावा.

काम, क्रोध हे रजोगुणांपासून निर्माण झालेले असल्याने ते भोगण्यात सदैव अतृप्ती असते. भोगांची तृप्ती कधीच होत नाही. दुसऱ्या अध्यायातील भगवंताचे उत्तर आपण पाहिले आहे. काम–क्रोध हे ''महाशनो महापाप्मा'' असल्याने तेच माणसाचे खरे शत्रू आहेत. म्हणूनच मनात इच्छा असो वा नसो, या काम क्रोधामुळेच मनुष्य पाप करायला प्रवृत्त होतो. हे सविस्तर आपण पाहिले व आता हेही पाहिले की, विषय जर नसतील तर मानवी जीवन

रसहीन, बेचव होऊन जाईल. जगण्यासारखे जीवनात काहीच राहणार नाही.

म्हणूनच ईश्वरानेच ही विकार रुपी खेळणी मानवाला दिली आहेत. पण मनुष्याने ही खेळणी म्हणजेच जीवन म्हणून या खेळण्याला कवटाळले. मूल रडायला लागले म्हणजे आई रडणे संपेपर्यंत खेळणे देते. पण मनुष्य मात्र सर्व चांगल्या गोष्टी सोडून या विषयारुपी खेळण्यातच रमतो.

म्हणून या दोन टोकातून कृष्णाने ''संयमित जीवन व्यवहार'' ही गीतेची शिकवण जगाला दिली. प्रवृत्तीधर्माचाही अतिरेक नको व निवृत्ती मार्गाचाही नको. कर्मयोग व संन्यासमार्ग दोन्हीही जरी चांगले असले तरी मनुष्यास कर्मयोग अधिक श्रेयस्कर आहे असे कृष्णानेच म्हटले आहे.

म्हणून ''सतत कर्म करीत जा'' हा गीतेचा संदेश आहे. संयमाचा मार्ग कृष्णाने सांगितला पण हे संयमित जीवन कसे असावे हे सुद्धा अनेक अध्यायातून सांगितले. विषय भोगा, पण विषयात आसक्ति ठेऊ नका, 'मी' करतो असा अहंभाव ठेऊ नका, कर्तृत्वाभिमान टाकून द्या. धर्म व नीतीला अनुसरुन विषयांचे भोग घ्या. देहात्मक बुद्धीने केवळ इंद्रियाकडे पाहू नको. इंद्रिये ही मूळातच नाठाळ व बहिर्गामी असल्यामुळे मन व बुद्धीचा त्यावर अंकुश असावा. आत्मलाभ, आत्मसुख यातून अक्षय सुख मिळत असल्यामुळे व सुखाचा झरा अंत:करणातच असल्यामुळे आपले अंत:करण अधिकाधिक शुद्ध करण्याचा प्रयत्न जाणीवपूर्वक व्हायला पाहिजे. कारण मन, बुद्धी, चित्त, अहंकार म्हणजे अंत:करण. हे जेवढे शुद्ध तेवढा अन्त:सुखाचा अनुभव अधिक. मग एकदा का या आत्मसुखाचा अनुभव अधिक. मग एकदा का या आत्मसुखाचा अनुभव यायला लागला की, बाहेरच्या भोगविषयात मन रमेनासे होते. अमृतप्राप्ती झाल्यावर कोण साधे पेय ग्रहण करेल का ? ज्ञानेश्वरांनी कृष्णाचे हे तत्वज्ञान एकाच ओवीत प्रकट केले आहे. ते असे...

**''जो आत्मलाभासारिखे गोमटे काहीची न देखे ।**
**म्हणोनि भोगविशेखे हरिखेजे ना ।।''** (१२.१९०)

**अर्थ :-** ''जो मनुष्य आत्मलाभासारखे गोड काहीच पहात नाही. तो इंद्रियांच्या भोगविषयात रममाण होत नाही.'' असे लोक सर्व लौकिक व्यवहार तुमच्या आमच्यासारखेच करतात पण अंत:करणात मात्र वेगळे



असतात. बाहेरुन प्रवृत्ती व आतून निवृत्ती अशी त्यांची जगाकडे पाहण्याची वृत्ती होते. समत्व बुद्धीने जगाकडे पाहात असल्याने,

**''आपणचि विश्व जाहला । तरी भेदभावो सहजचि गेल**
**म्हणोनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ।।** (१९१.१२ वा अध्याय)

''आपणच विश्व झाल्यामुळे त्याचा भेदभाव सहजच निघून जातो व असा मनुष्य द्वेषरहित होतो''

आपले स्वस्वरुप आनंदस्वरुपच असल्यामुळे तो नेहमी आनंदी, सुखी असतो. भगवंताने सुखी माणसांची अशी व्याख्या केली आहे.

## अध्याय ६ वा

### श्लोक

**उद्धरेदात्मनाऽत्मानं न आत्मानं अवसादयेत् ।**
**आत्मैव ही आत्मनो बंधुः आत्मा एव हि रिपु आत्मनाः (६.५)**
**बंधुः आत्मा आत्मनः तस्य येन आत्मा एव आत्मना जितः ।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेत आत्मा एव शत्रूवत् ।। (६.६)**

**अर्थ :-** ''मनुष्याने आपणच आपला उद्धार करावा. आपण स्वत:ला (दुबळे समजून) खचवू नये. आपणच आपला मित्र व शत्रूही आपणच असतो (६.५)

ज्याने स्वत:वर नियंत्रण ठेवले, तो स्वत:चा मित्र असतो पण जो स्वत:चे (आत्मस्वरुप) स्वत:ला ओळखत नाही, तो स्वत:चा शत्रू स्वत:च असतो (६.६)

या ६ व्या अध्यायात कृष्णाने जगाला एक मौलिक सिद्धान्त वरील दोन श्लोकातून दिला आहे. ''तूच तुझ्या जीवनाचा शिल्पकार, भाग्यविधाता आहेस'' हा गीतेचा संदेश आहे. गीता माणसाला दैवाधीन व्हावयास सांगत नाही. दैवाला पाचवे स्थान गीतेने दिले आहे. या कलियुगात हतबल, गर्भगळीत व दीशाहीन झालेल्या माणसाला पुरुषार्थाची जाणीव करुन देणारा हा महामंत्र आहे. ''उत्तीष्ठत्, जाग्रत प्राप्यवरान् निबोधत्''

''उठ, जागे हो, समर्थ गुरुचा उपदेश घेऊन स्वत:चा उद्धार कर'' हा कठोपनिषदाचा संदेश कृष्णाने दिला आहे. हाच संदेश विवेकानंदानी भारताच्या तरुणांना दिला. विवेकानंदानी गीता आचरणात आणली होती. म्हणून त्यांनी आवाहन केले होते. ''नचिकेतसारखे शंभर तरुण मला जर मिळाले तर मी संपूर्ण देश बदलून टाकीन.'' तरुणांच्या शक्तीवर त्यांचा प्रचंड विश्वास होता. केवळ एकोणचाळीस वर्षांचे अल्प आयुष्य विवेकानंदाना लाभले. पण या अल्प आयुष्यात हिमालयाएवढे कर्तृत्व उभारले. धर्म परिषदेत आपल्या सनातन संस्कृतीची ओळख करुन देण्यासाठी ते अमेरिकेला गेले. जायची कशीबशी सोय झाली पण त्या परक्या देशात राहण्याची व इतर खर्चाची सोय नव्हती. धर्मपरिषदेत बोलण्यासाठी रीतसर परवानगी नव्हती. कडाक्याच्या थंडीचे दिवस होते. पण उदंड आत्मविश्वास, बुद्धीचातुर्य, भगवंतावरील नि:स्सीम प्रेमाने विवेकानंदांनी अत्यंत कठीण परिस्थितीवर मात केली व पहिल्यांदा वेद उपनिषद, भगवद्गीता यांचे तत्वज्ञान आपल्या अमोघ वाणीने पाश्चात्यांना सांगून धर्मपरिषदेत हिंदूचा ध्वज डौलाने फडकविला.

या दोन श्लोकात कर्मस्वातंत्र्याचे गुणगान गायिले आहे. आपले पूर्वसंचित, प्रारब्ध काहीही असो. पण या जन्मातील प्राप्त झालेली अवस्था बदलण्याचे सामर्थ्य तुझ्यात आहे. प्रयत्न, चिकाटी, आत्मविश्वास याच्या जोरावर आपल्या कर्मांनी आपले भाग्य बदलता येते. ''यत्न तोचि देव जाणावा'' हेच समर्थ रामदासांनी सांगितले. ''असाध्य ते साध्य करिता सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ।।'' असे संत तुकारामांनी सांगितले तर ज्ञानेश्वर माऊली म्हणते,

**येणेचि अभ्यासेसि योगु । चित्तासी करीपा चांगु ।**
**अगा उपायबळे पंगु । पहाड ठाकी ।। (८१.८ वा)**

**अर्थ :-** ''अभ्यासाबरोबर चित्ताची सांगड चांगल्या प्रकारे घाल. अरे, प्रयत्नांच्या बळावर पांगळा देखील पर्वत चढून जातो.''

प्रयत्नवादी माणसाला जगात काहीच अशक्य नाही. आपले भाग्य बदलण्याचे सामर्थ्य आपल्याच ठिकाणी आहे. भगवंताने सर्वांनाच ही उर्जा



दिली आहे. आज २१ व्या शतकातील तरुणांना हेच शक्तिशाली विचार आवश्यक आहेत. लहानशा अपयशांनी गर्भगळीत होऊन आत्महत्या करण्याचे प्रमाण वाढले आहे. त्यांना ''उद्धरेत आत्मना आत्मानं'' या गीतेच्या संजीवनीची गरज आहे.

कृष्णाने पांडवांना हीच संजीवनी दिली. निराशेने दुबळ्या बनलेल्या अर्जुनाला आत्मशक्तीची जाणीव करुन दिली व युद्धाला प्रवृत्त केले. स्वधर्माचे पालन करणारा आदर्श पुरुष हा अर्जुन ठरला. पण ते करण्यासाठी कृष्णाला हा संदेश वारंवार सांगावा लागला. आपले 'विराट दर्शन' ही घडविले. युधिष्ठिर सात्विकतेची, धर्म-नीतीची शुद्ध प्रतिमा होती. सर्व पांडव धर्मराजाच्या आज्ञेत होते. पण या सात्विकतेत तेजस्वीता, पुरुषार्थ दडून गेला होता. अध्यात्म किंवा परमार्थ म्हणजे दुबळेपणा नव्हे. कोणी कितीही अन्याय केला तरी ते स्विकारायचे, कारण आपले प्रारब्धच असे आहे. ''जे काही घडते ते केवळ ईश्वराच्याच इच्छेने मग ते व्यक्तीच्या जीवनात असो अथवा राष्ट्राच्या. आपण केवळ नियतीच्या हातातील बाहुले आहोत असे आपले भ्रान्त तत्वज्ञान झाल्यामुळेच मोगलांच्या व ब्रिटीशांच्या आक्रमणांना आपण बळी पडलो. अशी रडकी, दुबळी भक्ती भगवंतालाही आवडत नाही. सुईच्या टोकावर राहील अशी जमीनही मी पांडवांना देणार नाही असे दुष्ट, कपटी दुर्योधनाने सांगितल्यानंतर सुद्धा पांडव शांतच होते. धृतराष्ट्राला पांडवांची ही टोकाची सात्विकता माहीत असल्यामुळे धर्मराजाच्या सज्जनतेचा गैरफायदा धृतराष्ट्राने घेतला. राज्य तुमच्या हाती असले काय किंवा दुर्योधनाच्या हाती असले काय आपण एकाच कुटुंबाचे घटक आहोत म्हणून युद्धाची गरजच काय ? अशी दिशाभूल व संभ्रम पांडवात निर्माण केला.

कृष्णनीतीत हे बसत नाही. भौतिक जीवनात असो अथवा आध्यात्मिक क्षेत्रात असो तुझ्या उत्कर्षाला व अपकर्षाला तूच जबाबदार आहेस. याला तुझे कर्मच कारणीभूत आहे असा जीवन सिद्धांत कृष्णाने सतत उपदेशिला पुरुषार्थ हा पराक्रमानेच मिळवायचा असतो.

कृष्णाने हे सर्व पराक्रम या आत्मबळाच्या सामर्थ्यावरच केले. वय व शक्ती यांचा विचार कधी केला नाही. गोकुळातले सर्व पराक्रम दहाव्या

वर्षापर्यंत केले. अपरंपार प्रेम करणाऱ्या गोकुळवायीयांना सोडून मथुरेला प्रयाण केले पण मागे वळून पाहिले नाही. केवढी ही अनासक्ती !

संपूर्ण युद्धात सारथी म्हणून जरी भूमिका निभावली तरी अर्जुन जेंव्हा जेंव्हा गर्भगळीत होई तेंव्हा तेंव्हा त्याला आपल्या या दैवी विचारांनी कृष्ण नवा प्राण फुंकत असे. खरे पाहता कृष्णाच्या युद्धनीतीमुळेच पांडवांनी युद्ध जिंकले युधिष्ठिरांनी मोठ्या उदारतेने हे मान्य केले. म्हणूनच हस्तिनापुरची सूत्रे हाती घेण्याविषयी विनंती केली.

## अध्याय ६ वा

# चंचल मनाला आवरण्याचा उपदेश

अर्जुनाने या अध्यायात भगवंताला तुमच्या आमच्या मनातला सुंदर प्रश्न मनाविषयीच विचारला आहे.

**चचलं हि मन: कृष्ण प्रमाथी बलवद्दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायेरिव सुदुष्करम् ।। ३४ ।।**

**अर्थ :-** हे कृष्णा, (समत्व बुद्धीने लाभणारा जो हा योग तू मला सांगितलास) तो मनाच्या चंचलपणामुळे टिकून राहील असे मला वाटत नाही. हे मन अत्यंत चंचल, दांडगे, बलवान व हट्टी आहे. वाऱ्याला आवरणे जेवढे कठिण तेवढेच ते मन आवरणे कठीण आहे.

''मनके जीते जीत है व मनके हारे हार है । असे म्हणतात. ज्याने मन जिंकले त्याने जग जिंकले व जो मनाचा गुलाम झाला तो जिंकूनही हरला. जसे अलेक्झांडर राजाच्या बाबतीत घडले. आज पर्यंत या मनावर सर्व संतांनी व आपल्या अध्यात्मिक ग्रंथांनी खूप काही सांगून ठेवले आहे. व्यावहारिक, प्रपंचाच्या, परमार्थाच्या, व्यावसायिक, राजनैतिक कोणत्याही क्षेत्रात यशासाठी वा सुखासाठी मन, निग्रही, संयमी असावे लागते. जे मन इंद्रियांच्या मागून जाते त्याचा नाश झालाच असे समजावे पण लगामरुपी मनाच्या मागून जर इंद्रिये आली तर त्याने अर्धे यश मिळविलेच असे समजावे.



मनाचा स्वभावच चंचल असल्यामुळे अर्जुनाला हा प्रश्न पडला. कारण कृष्णाने आतापर्यंत संयम, कर्मयोग, सांख्ययोग.. अशा खूप विषयावर तत्वज्ञान सांगितले. हे सर्व तत्वज्ञान खूप मौलिक आहे हे सर्व काही पटले पण प्रत्यक्ष आचरणात येणे या चंचलपणामुळे कठीण आहे असे त्याला वाटले. प्रपंचात, मायेत, वासना-विकारात, मोहात चटकन वाहवत जाते. हातात वारा जसा धरता येत नाही तसे मनाला आवरणे कठीण आहे असे अर्जुनाने प्रांजलपणे कबुल केले.

यावर भगवंताने मार्मिक उत्तर दिले. ते सर्वांनाच उद्देशून आहे.

''अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येणच गृहते ।'' अर्जुना, केवळ अभ्यासाने व वैराग्यानेच हे मन स्वाधीन ठेवता येते मनाचे एक वैशिष्ट्य असे की, या मनाला ज्याची गोडी लावावी त्यात हे मन रमते. ज्यात मनाला सुख मिळते ते सारखे त्याला हवे असते.

**''मन, गुरु आणि शिष्य । करी आपुलेचि दास्य ।**
**प्रसन्न आप आपणास । गती अथवा अधोगती ।।''**

असे तुकाराम महाराज म्हणतात. सुख, दु:ख, गती अथवा अधोगती अशा सगळ्या कारणासाठी मनच जबाबदार आहे. अशा मनाला ध्यान, योग, उत्तम विचार, परमार्थ अशा उत्तम मार्गाने संयमित करण्याचा प्रयत्न करावा. यासाठी अभ्यास व वैराग्य याची जोड त्याला द्यावी. यासाठी समर्थ रामदासांनी दोनशे पाच मनाचे श्लोक लिहिले.

कृष्णाने तसे संयमित, निग्रही जीवन जगून दाखविले. फळाची कोणतीही अपेक्षा न करता. युद्ध जिंकून मिळालेल्या वैभवाचा, सत्तेचा मोह न धरता केवळ यज्ञीय भावनेने कर्म केले. गोकुळापासून शेवटच्या क्षणापर्यंत प्रत्येकाला मदत केली. दुष्टांचा नाश करतांना कुठेही डगमगला नाही. मनाची स्थिरता, दृढवृत्ती हे त्याचे कारण. सर्व ठिकाणी निरपेक्ष बुद्धी असल्यामुळे त्याची प्रसन्नता, शांती कधी ढळली नाही. ''योगस्थ: कुरु कर्माणि । सङगं त्यक्त्वा धनंजय ।।'' योग्यासारखे साक्षीभावाने जगून अनासक्तीने प्रत्येक कर्म कर हे अर्जुनाला जे सांगितले तसे प्रत्यक्षात कृष्ण जगत होता. सात्विकता, अंत:करण शुद्धता, दैवी गुणांची जोपासना यामुळे नाठाळ मन देखील पूर्णपणे

कह्यात येते, हे कृष्णाने आपल्या आचरणातून दाखवून दिले.

## निरामय आरोग्याचा मंत्र

पाच हजार वर्षापूर्वी कृष्णाने अर्जुनाच्या निमित्ताने जगाला उत्तम आरोग्याचा मंत्र दिला आहे. संयमित व निग्रही मन आरोग्य, सुख, यश या सर्वांचे जसे कारण आहे तसे आहार, विहार, कर्माचरण, निद्रा व जागरण याही गोष्टी आरोग्य व सुखासाठी अत्यावश्यक आहेत. या कशा असाव्यात हे कृष्णाने पुढील श्लोकात सांगितले आहे.

**युक्ताहार विहारस्य युक्त चेष्टस्य कर्मसु ।**

**युक्त स्वप्नाव बोधस्य योगो भवति दुःखहा ।। ६.१७**

**अर्थ :-** (अतिशय खाणारास किंवा मुळीच काही न खाणाऱ्यास आणि अति झोपाळूस किंवा जागरण करणाऱ्यास (हा) योग हे अर्जुना । सिद्ध होत नाही) असे सोळाव्या श्लोकात सांगून या १७ व्या श्लोकात कृष्ण म्हणतात.

''ज्याचा आहार विहार माफक, संतुलित, ज्याचे कर्माचरण संयमित, बेताचे, ज्याची झोप व जागरण परिमित, यथा योग्य असते त्याला हा योग दुःखघातक म्हणजे सुखावह होतो.

आहार, विहार, विचार व आचार ही खरे म्हणजे सुखी जीवनाची 'चतुसुत्री' आहे. या चार आरोग्यधर्माच्या बाबतीत प्रत्येकाने दक्ष, सावध असले पाहिजे. सात्विक आहार सर्वात उत्तम. आपण जे खातो त्याने मनाच्या वृत्ती बनतात. खाणे जसे असते तसेच स्वभाव बनतो. राजसी-तामसी खाण्याने राजसी व तामसी गुण विकार वाढतात. जग आता सात्विक आहाराकडे वळत आहे. याचे फायदे कृष्णाने सांगितले आहेत.

**आयुसत्व बलारोग्य, सुख प्रीती विवर्धनाः ।**

**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृदया आहाराः सात्विक प्रियाः ।। १७.८**

**अर्थ :-** सात्विक पुरुषास आवडणारे आहार आयुष्य, सात्विक वृत्ती, बल, आरोग्य, सुख आणि प्रीति ही वाढविणारे, रसयुक्त, स्निग्ध, स्थिर, मनाला आनंददायक असतात.''



असा आहार माफक मात्र असावा. विहार म्हणजे चालण्याचा व्यायाम. ''चराति चरति'' एवं ''चरैऐव चरैवेन'' असे शास्त्र म्हणते. चालत रहा, चालत रहा हा आज सुद्धा मंत्र झाला आहे. माणूस चालण्यावर प्रेम करीत राहीला की तो व्याधीमुक्त होतो. विचारांनी माणसाची बुद्धी बदलते. उत्तम प्रभावी विचार हे जीवन बदलून टाकतात. विचारांनी दृष्टी बदलते. कर्म बदलते. या श्लोकात कर्मयोग्याच्या कर्माचा उल्लेख आला आहे. जे विहीत, नीयत कर्म आहे ते कधीही टाळू नये. यज्ञीय भावनेने सतत कर्मे करावीत हा गीतेचा संदेश आहे. अती झोप व कमी झोप ही दोन्ही मारकच. आपली निद्रा योगनिद्रा व्हावी. दिवसभर उत्तम चिंतन व कर्म असेल तर निद्रादेवी लगेच प्रसन्न होते.

या सर्व गोष्टी कृष्णाच्या आयुष्यात होत्या म्हणून त्याचे जीवन. आदर्श होते. गोकुळात गायी घेऊन गोपसवंगड्याबरोबर दूरवर जायचा व संध्याकाळी परत यायचा. कृष्ण म्हणजे आनंद. ज्यांच्या ज्यांच्या जीवनात तो जायचा त्या सर्वांना त्याच्या सहवासात आनंद मिळायचा. थोडा मोठा झाल्यावर सांदिपनी ऋषींच्या गुरुकुलात जाऊन सर्व विद्या आत्मसात केल्या. केवळ पासष्ट दिवसांच्या अवधीत त्याने सर्वांचे मन जिंकले. गुरुंच्या, पुत्राचे पंचजन्य राक्षसाने हरण केले होते. त्याला ठार करुन मुलाला सोडवून आणले व गुरुंच्या हवाली केले.

कृष्ण संयमी, शांत असल्यामुळे कृष्ण-शिष्टाईच्या वेळी कठोर प्रसंगाला तोंड द्यावे लागत असून सुद्धा त्याचे आचरण अत्यंत परिमीत असायचे. शिशुपालाचे शंभर अपराध पूर्ण होईपर्यंत त्याने वाट पाहिली. असुरांना सुद्धा समजावण्याची भूमिका घेतली व शेवटी यादवांचा संहार सुद्धा त्यांच्याच पापकर्माने होत असल्याने शांत राहिला.

आतापर्यंत सहा अध्यायातील अत्यंत महान, मांगलिक श्लोकांचे विस्तारीत वर्णन पाहिले. ज्या समस्या आजच्या काळातही काळजीचा, चिंतनाचा विषय झालेल्या आहेत. त्यावर कृष्णाचे प्रभावी विचार आपण पाहिले. जीवनाशी प्रत्यक्ष निगडीत अशाच विषयांचे मार्गदर्शन गीतेत आहे. त्यामुळे यापुढील सर्व अध्याय अत्यंत महत्वाचेच आहेत. याविषयीच्या

संदर्भात असणारे जे श्लोक आहेत. ते पूर्णपणे न देता केवळ त्यांचे क्रमांक देण्यात येतील. विस्तारभयामुळे, कृष्णनीतीच्या संदर्भातील या श्लोकांचे आपण विहंगावलोकन करणार आहोत. गीता हा जीवन ग्रंथ असल्यामुळे जीवनाचे साफल्य ज्यात गथीत झालेले आहे. त्या श्लोकांचे विवरण संक्षिप्तात असले तरी, महत्वाचे मुद्दे लिखाणातून राहणार नाहीत, याची मात्र दक्षता घेतली जाईल. कारण श्रेयस व अभुदय (परमार्थ व भौतिक विकास) या दोन्हींचा विचार करतच, जी माणसाच्या अंतिम ध्येयापर्यंत नेते ती नीती याच नीतीमुळे कृष्ण मानवी अवतारात यशस्वी झाला व आपल्या अवतार कार्याची त्याने पूर्तता केली. हा कृष्ण विजय, ज्या नीतीमुळे झाला ती कृष्णनीती.

तत्वज्ञ म्हणून कृष्णाने ही नीती जगासमोर गीतेच्या स्वरुपात मांडली. कृष्णाची प्रत्यक्ष वाङमयीन मूर्ती म्हणजे गीता ! म्हणून कृष्णाचे विचार, त्याची विश्वाला व्यापून राहिलेली दृष्टी, त्याचे अलौकिक गुण, त्याचे सर्वांवरील आत्मवत् प्रेम, त्याने जपलेली मानवतावादी मूल्ये, त्याची न्यायप्रियता, त्याचे एकूण कर्तृत्व, संयम, विवेक, दृढनिश्चयी स्वभाव, सज्जनतेचे पूर्ण रक्षण व असुरी शक्तीचा केलेला नाश, त्याची अनासक्त वृत्ती या कार्यासाठी वापरलेली युद्धनीती, गोकुळातला सर्वसामान्य गोप-सवंगडी असोत, नाही तर पोह्याची पुरचुंडी घेऊन आलेला सुदामा असो... अशा सर्वांवरील कृष्णाचे निर्हेतुक, निर्भेळ प्रेम, अर्जुनावरील शिष्य-भाव, बलरामावरील भ्रातृभाव, भीष्मावरील व द्रोणावरील प्रेम व करुणा यांचे मिश्रण, मातृ-पितृ प्रेम, अवतार पुरुष असूनही मनुष्यरुपात आचरणात आणलेला स्वधर्म... अशा विलोभनीय सर्व गोष्टींचे मिळून जे रसायन होते ती कृष्णनीती !

कृष्ण प्रत्येकाच्याच ह्दयात असल्यामुळे त्याला पाहणे, अनुभवणे म्हणजे, या नीतीचे आपल्या जीवनात समरसतेने ऐक्य घडवून आणणे. म्हणून ''कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत'' कृष्ण होऊन कृष्णाची पूजा करणे होय.



## अध्याय ७ व १४ वा

दोन्ही अध्यायात भगवंतांनी सत्व, रज, तम या त्रिगुणांचे सविस्तर वर्णन केले. या गुणांशिवाय जगातील एकही मनुष्य वेगळा नसतो. देवसुद्धा हे त्रिगुण धारण करतात. प्रत्येकात हे तिन्ही गुण असतातच. पण त्यातील जो गुण अधिक प्रभावी असतो त्या गुणांनी ती व्यक्ति ओळखली जाते. एकाच आईच्या पोटी जन्मलेली भावंडे एकाच गुणाची नसतात. रावण, बिभीषण व कुंभकर्ण हे तिघेही एकाच आईची लेकरे. पण त्यातील बिभीषण सत्वगुणी, रावण रजोगुणी व कुंभकर्ण तमोगुणी होता. ७ व्या अध्यायातील १२, १३, १४ ह्या श्लोकामध्ये ईश्वराने स्पष्ट सांगितले आहे की, हे सर्व गुण माझेच आहेत. पण मी त्यात नाही व ते गुण माझ्यात नाहीत. सत्व, रज, तम या तीन भावांनी हे जग मोहित झाले आहे त्यामुळे जे मला ओळखत नाहीत. त्रिगुणात्मक अशी ही माझी दिव्य माया आहे. ही माया तरुन जाण्यास महाकठीण आहे पण जे मलाच पूर्णपणे शरण येतात तेच ही माया तरुन जातात.

१४ व्या अध्यायाचे नावच गुणत्रयविभाग योग आहे. पहिल्या ५ ते ८ श्लोकात या तिन्ही गुणांच्या वृत्ती-प्रवृत्ती-स्वभाव सांगितलेले आहेत. श्रीकृष्ण म्हणतात, ''हे अर्जुना हे तिन्ही गुण प्रकृतीपासून म्हणजे मायेपासून निर्माण झाले आहेत. हेच देहात राहणाऱ्या आत्म्यास ते गुण देहातच बांधून टाकतात. यापैकी जो सत्व, गुण आहे. तो प्रकाश देणारा व निर्दोष आहे. तो मनुष्यास सुख व ज्ञान देतो. पण रजोगुणाचा स्वभाव क्रोधरुप आहे. रजोगुण तृष्णा व आसक्ती ह्यापासून उत्पन्न होतो. सतत केलेल्या कर्मांनी तो मनुष्यास बांधून टाकतो. तमोगुण अज्ञानापासून उत्पन्न होतो व सर्वांना मोहात पाडतो. तमो गुण मनुष्यास आळस, अतीनिद्रा व चुका करण्यास भाग पाडतो.

कृष्ण जन्माच्या वेळी महाभारतकालीन समाज तमोगुणी होता. आजही अवस्था तशीच आहे. म्हणून कष्ट न करता झटपट श्रीमंत होणे. क्रोधाच्या भरात खून करणे, विषय-वासनांचा नंगानाच व त्यामुळे होणारे बलात्कार, दरोडे व सर्व प्रकारचे भोग विनासयास मिळविण्याची तृष्णा हे सर्व तमोगुणाची लक्षणे आहेत. रजोगुण रावणासारखा आहे. एवढा मोठा ज्ञानी पण रजोगुणांनी भरल्यामुळे जग जिंकण्याची इच्छा. सत्तेशिवाय अशांना जगताच येत नाही.

मी स्वतःच ईश्वर आहे, मीच बलवान आहे, आज मी याला, उद्या त्यांना जिंकणार अशाच वल्गना या रजोगुणी लोकांच्या असतात. कितीही मिळाले तरी यांचे समाधान कधी होत नाही.

अशा परिस्थिती सात्विक गुण मात्र सुख व ज्ञान देणारा असतो. देव-देवता या शुद्ध सत्वगुणी. जेवढा जास्त सत्वगुण माणसात असतो तेवढा तो देवत्वापर्यंत जातो. गीतेचे विचार व संहिता ही सत्वगुण निर्माण करणारी आहेत. सुख भोगात नसून त्यागात आहे. प्रसन्नता, स्थिर बुद्धी, शांती, शुद्ध आचरण यातच खरे सुख आहे, हे ठासून सांगणारी गीता आहे. म्हणूनच कृष्णाने सात्विक गुणांची म्हणजे पांडवांची बाजू घेतली.

### अध्याय ९ वा १२

# भक्त-भक्ती-भगवंत व सगुण-निर्गुण निवाडा

गीतेच्या या दोन अध्यायात कृष्णाने अत्यंत जिव्हाळ्याच्या भक्त-भक्ती व भगवंत या विषयावर अत्यंत मौलिक भाष्य केले आहे. भक्ति प्रेमाचे रहस्य विषद करणारे हे दोन अध्याय भक्ती संदर्भातल्या सर्व शंकांचे निरसन करणारे आहेत.

श्री ज्ञानेश्वर ९ व्या अध्यायाच्या पहिल्याच ओवीत म्हणतात -

**''तरी एकवेळ अवधान दीजे । मग सर्वसुखासी पात्र होईजे ।**
**हे प्रतिज्ञोत्तर माझे । उघड केला ।। ९.१ (ज्ञानेश्वरी)**

हा अध्याय ऐकताना सर्व अवधान माझ्याकडे द्या. हे जर सर्व ऐकलेत तर तुम्ही सर्व सुखांना पात्र व्हाल. हे मी तुम्हाला प्रतिज्ञापूर्वक सांगतो इतका हा अध्याय महत्वाचा आहे.

सुरुवातीलाच २२ व्या श्लोकात भगवंताने भक्तांना एक आश्वासन दिले आहे. जे अनन्यानिष्ठ भक्त माझे चिंतन करुन मला भजतात त्या नित्ययुक्त भक्तांचा योगक्षेम मी चालवितो. 'न मे भक्तः प्रणह्यति ।' माझा



भक्त कधीच नाश पावत नाही. हे त्याचे वचन आहे. या दोन अध्यायात सर्वांना ईश्वराने भक्तीचा सहजसुलभ राजमार्ग दाखविला आहे.

अनेक लोक अनेक देव-देवतांची वेगवेगळ्या कामना ठेऊन भक्ती करतात. हे सर्व पूजन परमेश्वरालाच पोहोचते कारण सर्व यज्ञांचा भोक्ता तोच आहे. फक्त एवढेच की देव-देवतांना भजणारे, ती ती फळे प्राप्त करतात व मला भजणारे मलाच येऊन मिळतात. भक्तीत मला भक्ताचा भाव आवडतो. जे मला समर्पित भावाने भजतात, अशा भक्तांनी दिलेली गोष्ट मी आनंदाने स्विकारतो. म्हणून २७ व २८ व्या श्लोकात अर्जुनाला ते म्हणतात, ''तू जे जे करतोस, जे खातोस, जे हवन करतोस, जे दान करतोस, जे जप करतोस ते सर्व मला अर्पण करत जा (२७.२८)

तुझी सर्व कर्मरुपी फुले तू मला अर्पण कर. पण हे करत असताना जे जे मला अर्पण करशील ते शुद्ध भावाने, अहंकार सोडून, मी माझे हा भाव न ठेवता 'तू व तुझे' हा भाव अर्पण कर असे केल्याने शुभ-अशुभ अशा कर्मबंधनातून भक्त सुटतो.

स्त्रीया, वैश्य, शुद्र असे सर्वचजण माझी भक्ती करुन परमगतीला प्राप्त करतात. दुराचारी सुद्धा माझ्या भक्तीने सन्मार्गाला लागतात. माझा भक्त कधीच नाश पावत नाही हे आश्वासन या अध्यायात भगवंताने दिले आहे.

'भाव' हा भक्तीचा कणा आहे. भाव नसेल तर भक्तीत प्राण नाही. म्हणून भगवंतानी ९ व्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकात भगवंतानी मागणी केली आहे.

**'मन्मना भव मद्‌भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैश्यसि युक्त्वा एव आत्मानं मत्परायण: ।। ३४ ।।**

**अर्थ :-** माझ्या ठिकाणी मन ठेव, माझा भक्त हो, माझे यजन पूजन कर आणि मला नमस्कार कर. याप्रमाणे मत्परायण होऊन आपला योग चालविलास म्हणजे मलाच येऊन पोचशील''

''असा समर्पित भाव'' भगवंताने भक्तांकडून मागितला आहे.

गीतेच्या १२ व्या अध्यायाला श्रीकृष्ण स्वत:च अमृततधारा असे म्हणतात. वीस श्लोकांचा छोटासा अध्याय, अध्यायाचे नावही भक्तीयोग. भक्तीशास्त्राचे मौलिक सिद्धांत व भक्तांच्या गुणांचे वर्णन यात विषद केले आहेत. श्रीकृष्णाने यात संपूर्ण भक्तिशास्त्रच सांगितले आहे. या अध्यायात ज्ञानाचे, उपासनेचे व कर्माचे मधुर मिलन झाले आहे. या अध्यायात शेवटी श्रीकृष्ण म्हणतात की, भक्ती हे ''धारामृत धर्म'' जे घेतात तेच मला आवडतात. भक्तीचे अमृत जो पितो तो निस्तेज, निर्दय, निष्प्रभ, निर्धन राहातच नाही. भक्त हा एकाच वेळी योगी, ज्ञानी, कर्मयोगी, वैराग्यशील तपस्वी असू शकतो. अर्जुनाने या अध्यायात पहिलाच प्रश्न विचारुन कृष्णाला भक्तीचे समग्र स्वरुप जाणण्यासाठी उद्युक्त केले.

या प्रश्नात भक्तीच्या सगुण व निर्गुण रुपात कोणती भक्ती अधिक श्रेष्ठ आहे ? भगवंताला सगुण रुपात पाहावे की निर्गुण रुपात ? मूर्तिपूजा श्रेष्ठ की कनिष्ठ ? हा वर्षानुवर्षे चर्चिला जाणारा सनातन प्रश्न अर्जुनाने येथे विचारला आहे.

साकार स्वरुपाची पूजा करणारे व निराकार निर्गुण शक्तीची पूजा करणारे या दोघांनाही या अध्यायात योग्य दिशा दाखविली आहे. एक ज्ञानमार्गी व दुसरा प्रेममार्गी. भक्तीचे भगवंताकडूनच हे शास्त्र समजले की साधक निश्चित व निवांत होतो.

संपूर्ण जगातील ईश्वरोपासकांची विभागणी या सगुण व निर्गुण गटात झाली आहे. हिंदूतील काही पंथ व संप्रदाय निर्गुण ईश्वराची पूजा करणारे आहेत तर बहुसंख्य हिंदू मूर्तिपूजा म्हणजे सगुण रुपात भगवंताला भजणारे आहेत. इस्लाम हा निर्गुण स्वरुप असलेल्या अल्लाहला मानतात. ते मूर्तिपूजा मानत नाहीत. बौद्ध धर्म आत्मा, ईश्वर मानत नाहीत. बुद्धाने या दोन्ही संकल्पनाना उत्तर देण्याचे टाळले. पण हिंदू धर्मात बुद्धाला दहावा अवतार मानले आहे.

आपल्या सर्व संतांनी या दोन्ही प्रकारांना मान्यता दिली आहे. कोठेही विरोध नाही. संत नामदेव म्हणतात –



**''सगुण–निर्गुण दोन्ही विलक्षण''**

तर श्री ज्ञानेश्वर म्हणतात –

**तुज सगुण म्हणो की निर्गुण रे ।**
**सगुण–निर्गुण एक गोविंद रे ।।**

साकार–निराकार ही एकच स्थिती आहे. उपासनेचे हे दोन भाग आहेत. पायरी पायरीनेच साधकाला सगुण भक्तीच्या अभ्यासाने निर्गुणाकडे जावे लागते. म्हणून समर्थ रामदासांनी हे एका ओवीत वचन सांगून निवाडा दिला.

**''सगुणाचेनि आधारे निर्गुण पाविजे निर्धारे**
**सारासार विचार संतसंगे ।''**

''सगुणाच्या आधाराने निर्गुणाकडे जायचे. हे पक्के जाणण्यासाठी संत संगतीत राहून त्यांचे विचार ग्रहण करावेत.''

थोडक्यात सगुण भक्त प्रेममार्गी तर निर्गुण भक्त ज्ञानमार्गी. दोघेही एकाच भगवंताची पूजा करतात. फक्त फरक एवढाच की, सगुण उपासना प्रेममय, रसमय व भाव–भावनेनी ओथंबलेली असते. अष्टसात्विक भाव फुलविणारी व्यक्त भक्ती असते तर निर्गुण उपासना ज्ञानमय व कठीण असते. पण खरे म्हणजे भक्तीला ज्ञानाची फुले व ज्ञानाला भक्तीची जोड असेल तर भक्ती अधिक फुलते.

आता भगवान श्रीकृष्णाने याचा निवाडा कसा केला पाहू. पहिल्याच श्लोकात याचे उत्तर दिले पण...

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मता: ।।**

''माझ्या ठिकाणी मन ठेऊन नेहमी युक्तचित होऊन परमश्रद्धेने जे माझी उपासना करतात, ते माझ्या मते सर्वांत उत्तम 'युक्त' म्हणजे योगी होत.''

या एकाच महान श्लोकात भगवंतानी भक्तीचे सार सांगितले आहे. संपूर्ण मूर्तिपूजेचे रहस्य या श्लोकात मांडले आहे. 'मय्यावेश्य मनो ये मां'

आणि ''नित्ययुक्त'' हा गीतेचा आग्रह आहे व भक्तीचा कणा आहे. भगवंत भक्तांकडून मन, बुद्धी मागतात. प्रथम मनाचे समर्पण व नंतर संपूर्ण जीवनाचे समर्पण भक्तीत आवश्यक आहे. श्रद्धा सतत वाढत राहणे, प्रेमभाव वाढत राहणे, होता होता संपूर्ण शरणागती होऊन स्वत:लाच समर्पित करणे ही श्रेष्ठ भक्ती या श्लोकात सांगितली आहे.

निर्गुण, निराकार, अव्यक्त भक्ती करणारेही मलाच येऊन मिळतात. तीही भक्ती श्रेष्ठ आहे हे ३ व ४ या श्लोकात भगवंत सांगतात पण पाचव्या श्लोकात मात्र सर्वसामान्य लोकांना निर्गुण उपासनेचा मार्ग क्लेशकारक आहे. मनुष्याच्या मनाचा स्वभावच असा आहे की, गुण व आकार ज्या ठिकाणी आहे तेथेच मानवी मन एकाग्र होते. निराकारात बसून चित्त एकाग्र करणे कठीण आहे. असे एकाग्र चित्त भगवंताला अर्पण करणे कठीण आहे. म्हणून भगवंताने सगुण, साकार रुपाचा आग्रह धरला. भक्तांच्या प्रेमपूर्वक भक्तीखातर निर्गुण, निराकार असलेला परमात्मा सगुण साकार का होणार नाही ? अवताराच्या रुपाने राम-कृष्णाचा अवतार घेऊन, साकार रुपात मनुष्याचे कल्याण त्यांनी केले. मूर्तिपूजा ही समजून उमजून केली पाहिजे. मूर्तीला केवळ प्रसाद, फुले, फळे वाहणे म्हणजे मूर्तीपूजा नव्हे.

मूर्तीपुजेचेही शास्त्र आहे. कोणत्याही मूर्तीला आपण हात जोडत नाही. पण ज्या मूर्तीत भगवंताला आवाहन करुन त्याची प्रतिष्ठा केलेली असते अशा मूर्तीची आपण पूजा करतो. ती मूर्ती किती लहान किंवा किती मोठी हे भक्ताचा भाव किती मोठा किंवा लहान यावर अवलंबून आहे. भगवंत प्रत्येकाच्या हृदयात आत्म्याच्या रुपात स्थित आहे. तोच उपद्रष्टा, साक्षी, अनुमन्ता, भर्ता म्हणजे रक्षण करणारा, भोक्ता व शेवटी महेश्वर अशा विविध भूमिकात अंशरुपाने अंत:करणात आहे. मूर्तीत जो आहे तोच हृदयात असल्यामुळे त्याची भक्ती करताना चित्तही द्रवले पाहिजे व अशा द्रवलेल्या चित्तात त्या गोविंदाचा आकार स्थिर झाला पाहिजे. तेंव्हा भक्ती फलद्रुप होते अशी मधुसुदन सरस्वतींनी भक्तीची व्याख्या केली आहे. भगवंत भक्ताचे मन व बुद्धी मागतात. म्हणजे तुझ्या मनात मलाच स्थान असले पाहिजे. बुद्धीत माझेच चिंतन असले पाहिजे. माझ्या शिवाय कुठेही



खरे प्रेम असू नये ही भगवंताची मागणी आहे. ''साऽत्वास्मिन परम प्रेमरुपा'' ही नारदीय सूत्रात केलेली भक्तीची व्याख्या आहे. भगवंतावरील आपले श्रेष्ठ प्रेम म्हणजे भक्ती. या व्याख्येत ही मागणी योग्यच ठरते. भजन, कीर्तन, पूजा पाठ, फुले-फळे-प्रसाद ही सर्व साधने वातावरण निर्मिती व भक्ती रसाच्या उद्दीपनासाठी आहेत. या साधनानाच आपण सर्वस्व मानले तर अपेक्षित भक्तीचे फळ प्राप्त होत नाही. ''आनंदाचे डोही आनंद तरंग'' हे भक्तीचे फळ आहे. आत्मानंद, आत्मलाभ, आत्मसुख किंवा शांती, तृप्ती, आनंद हे जर प्राप्त झाले नाही तर नक्की समजावे की आपली भक्ती अपूर्ण आहे.

मूर्तिपूजेत सुरुवातीला स्थूल पूजा जी आपण नेहमी करतो. स्थूलपूजेतून गुणपूजा... म्हणजे कृष्णाचे गुण घेऊन कृष्णाची पूजा किंवा राम, विठ्ठल जी काही देवता असेल त्याचे गुण म्हणून रामो भूत्वा रामं यजेत... ही गुण पूजा व शेवटी तत्व पूजा. म्हणजे मीही त्याचाच अंश असल्यामुळे तो जसा आहे तसेच माझ्यातही तेच गुण आहेत. मीही अमृत पुत्रच आहे असे ऐक्य निर्माण व्हायला पाहिजे. मूर्तीत एकाग्र होणे म्हणजे सर्वगुणसंपन्न अशा भगवंतासारखे होण्याची वृत्ती ठेवणे. भक्ती म्हणजे वृत्ती व वृत्ती म्हणजे सतत बदल. ही खरी स्थूल, साकार, सगुण मूर्तीची पूजा.

गणेशोत्सवात आपण गणेशाची मूर्ती घरी आणतो. मूर्तीची प्रतिष्ठापना करतो. रोज त्याची आरती म्हणतो. देवाची अथर्वशीर्ष म्हणून त्याची स्तुती करतो. त्याला आवडते म्हणून मोदकाचा प्रसाद ठेवतो व ज्याची मनोभावे पूजा केलेली असते त्या मूर्तीला आपण वाहत्या पाण्यात (शास्त्राप्रमाणे) विसर्जित करतो.

मूर्तीची प्रतिष्ठापना करुन केलेली पूजा ही सगुणपूजा व जेंव्हा त्याच मूर्तीचे आपण विसर्जन करतो तेंव्हा ती निर्गुण निराकार पूजा त्या मूर्तीचे कणन्कण दाही दिशात जातात. आता गणेशाला एवढ्याशा मूर्तीत पहायचे नाही. तीचे दर्शन आता पाना-फुलात, आकाशात, पाण्यात व शेवटी भूतमात्रात घ्यायचे ही निर्गुण पूजा.

# चार प्रकारची भक्ती व भक्ताचे ३६ गुण

१२ व्या अध्यायातील आठ ते अकरा या चार श्लोकात कृष्णाने भक्तीचे चार मार्ग सांगीतले आहेत. ज्याने त्याने आपल्या प्रकृतीधर्मानुसार यातील कोणताही मार्ग निवडावा. जेवढ्या व्यक्ती तेवढ्या प्रकृती (आंतरित धर्म, स्वभाव) व तेवढेच उपासना मार्ग हे स्वातंत्र्य आपल्या संस्कृतीने आपल्याला दिले आहे.

''मय्येव मन आधस्व: पासून तत: कुरु यतात्मवान् ।।'' येथ पर्यंत हे श्लोक आहेत.

१) मला तुझे मन व बुद्धी दे. असे केलेस की तू माझ्याच ठिकाणी येऊन मिळशील यात संशय नाही.

२) माझ्या ठिक़ाणी चित्त देऊ शकत नसशील तर अभ्यासाच्या सहाय्याने पुन्हा पुन्हा प्रयत्न करुन माझी प्राप्ती करुन घे.

३) असा अभ्यास करणे शक्य नसेल तर माझ्यासाठी कर्म करणारा हो. 'मत्कर्मपरम:' होऊन सुद्धा तुला माझी प्राप्ती होईल.

४) हे ही अशक्य असेल तर माझ्याशी जोडले जाण्याचा प्रयत्न करुन, मनावर नियंत्रण ठेऊन कर्माच्या फलांचा त्याग कर.

या चार प्रकारच्या भक्तीमध्ये ज्याने त्याने आपल्या क्षमतेप्रमाणे भक्तीचा प्रकार निवडावा. सूर्य जसा उगविल्यानंतर अनेक रस्ते दिसतात पण त्या सर्व रस्त्यांवरून एकाच वेळी चालायचे नसते. एकच रस्ता निवडावा लागतो. तसेच हे आहे. मन व बुद्धी देणे म्हणजे परमात्म्याला संकल्पकर्ता करणे व बुद्धी म्हणजे जे जे निर्णय बुद्धी घेते त्याचा निर्णय कर्ता भगवंतालाच करणे. हीच समर्पित भावना. जे जे कर्म हातून घडते ते ते त्याला अर्पून मोकळे व्हायचे. मन व बद्धी ज्याचे चिंतन करते तशीच दृष्टी व जग त्याला दिसते. म्हणून मनात केवळ माझाच ध्यास कर अशी भगवंताची मागणी आहे. प्रपंच करायचा, पण कर्तव्य भावनेने व अनासक्तीने. आसक्ती ठेवायची ती भगवंताची सतत चिंतन, मनन, स्वाध्याय, भजन-कीर्तन करीत ईश्वराच्या गुणांचे अनुकरण करणे म्हणजे अभ्यासयोग.



अद्वेष्टा सर्वभूतांना... पासून प्रियो नर: । या १३ ते १९ व्या श्लोकापर्यंत भगवंताने भक़्तांच्या दैवी गुणांचे वर्णन केले आहे. कोणाचाही द्वेष न करणारा, सर्वांशी मित्रभावाने वागणारा, ममत्व बुद्धी व अहंकार सुटलेला,... अशा ३६ गुणांपैकी जितके गुण आचरणात येतील तेवढा तो भगवंताजवळचा असेल. हे गुण अंगी आणून तसा व्यवहार करणे भक्तीत अभिप्रेत आहे. चित्ताची पूर्ण शुद्धता झाल्याशिवाय तेथे ज्ञान प्रतिष्ठीत होत नाही. अंत:करण शुद्धी ही अशा गुणांवर आधारीत आहे. परमार्थ, अध्यात्म म्हणजे अंतर्बाह्य शुद्धता. यासाठी हे गुण. हे गुण आले की वृत्ती बदलते भक्तीच पाया या परिवर्तनातच आहे. हे सर्ववैश्विक गुण आहेत. जगातील कोणत्याही देशातील व धर्मातील मनुष्याला आत्मोन्नतीसाठी आवश्यक असणारे.

### अध्याय १६ वा

# दैवी व आसुरी संपत्ती आत्मपरिक्षण

शुद्ध अंत:करणातच ज्ञान, भक्ती विराजते. अंत:करण म्हणजे चित्त, मन, बुद्धी, अहंकार हे शुद्ध होण्यासाठी दैवी गुणांची जोपासना झाली पाहिजे. हे गुण जेंव्हा अंत:करणात प्रतिष्ठित होतात तेंव्हाच शांती, प्रसन्नता, ज्ञान प्राप्त होते.

पण जन्म-जन्मांतरीच्या वासना, काम, क्रोध, लोभ अशा विकारांचे दुर्गुण घेऊनच आपण जन्म घेतलेला असतो. ही आसुरी संपत्ती दैवी गुणांनीच दूर होते.

जीवनात ह्या दोन्ही गुणांचा संघर्ष सततच करावा लागतो. भक्ती यासाठीच आहे. भक्तीच्या आधारे आसुरी संपत्तीला दूर करुन दैवी गुणांची आपण जेवढी प्रतिष्ठापना करतो तेवढी आपली प्रगती होत असते. आपली प्रगती निश्चीत किती झाली याचे परीक्षण आपण स्वत:च करायचे असते. म्हणून आत्मपरीक्षण करण्यासाठी या अध्यायाची योजना भगवंतानी केली आहे. परमार्थात आपले परीक्षक आपण स्वत: व प्रत्यक्ष भगवंत हे दोघेच असू शकतात.

हे दैवी गुणच भगवंताजवळ घेऊन जाणारे असल्याने गीतेमध्ये हे पुन्हा पुन्हा सांगितले आहेत. दुसऱ्या अध्यायातील स्थितप्रज्ञाचे गुण, बाराव्या अध्यायातील भक्ताचे छत्तीस गुण, तेरा पंधरा व नवव्या अध्यायात केलेले दैवी व आसुरी शक्तींचे वर्णन व आता सोळाव्या अध्यायात केलेले सव्वीस दैवी गुण व अकरा आसुरी संपत्तीचे गुण यांचे वर्णन आले आहे. गीतेचा एवढा मोठा भाग, भगवंताने याचसाठी खर्चिला. कारण, भक्ताने सतत प्रत्येक टप्प्यावर आपली निश्चित प्रगती किती झाली याचे आत्मपरीक्षण करावे.

१६ व्या अध्यायातील पहिल्या तीन श्लोकात सव्वीस गुणांचे वर्णन केले आहे. निर्भयता म्हणजे अभय, अंत:करणाची शुद्ध वृत्ती, दान, इंद्रिय, निग्रह, सत्य, अहिंसा, प्रेम, दया, निर्विकार व निर्विषय राहणे, क्षमा, धैर्य... असे हे सव्वीस गुण आहेत.

राक्षसी संपत्तीचे वर्णन चार ते आठ श्लोकात केले आहे. दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, निष्ठुरपणा, अज्ञान, असत्य, अनीती, अनीश्वर, अश्रद्ध, काम, लोभ... अशा आसुरी दुर्गुणांचे वर्णन आले आहे.

दैवी गुण मनुष्याला भगवंताची प्राप्ती करुन देतात व आसुरी गुण संपूर्ण अधोगतीला नेऊन राक्षसी, नरकप्राय जीवन भोगावयास लावतात. दैवी संपत्तीच्या पूर्णपणे विरोधी हे आसुरी गुण आहेत. कळत नकळत आपल्यात यातील किती गुण-दुर्गुण आहेत हे माहीत असावे म्हणून कृष्णाने याचे सविस्तर वर्णन केले आहे. यातील काम क्रोध व लोभ ही तर नरकाची तीन दरवाजे आहेत असे सोळाव्या श्लोकात वर्णन आहे.

भगवंतांनी सृष्टी निर्माण करुन जेंव्हा मनुष्याची उत्पत्ती केली तेंव्हा त्यांच्यात दैवी व आसुरी अशा दोन्ही प्रवृत्तीची व्यवस्था केली. भद्र-अभद्र, सत्-असत्, प्रकाश-अंधार, देव-दानव, राम-रावण अशा द्वंद्वांनी मनुष्याचे अंत:करण भरले आहे. देवत्व, पशुत्व दोन्हीही आहेत. महाभारतातील कुरुक्षेत्राप्रमाणे मानवी अंत:करणही एक कुरुक्षेत्रच आहे. विषय-विकार, द्वेष, मत्सर, सूड, क्रोध इ. आसुरी गुणांच्या रुपाने कौरव-सेना तर दया, अहिंसा, सत्य, प्रेम, करुणा, क्षमा, सत्... अशा दैवी गुणांच्या रुपाने



पांडवसेना एकमेकांसमोर अंत:करणात उभी ठाकली आहेत. म्हणून अंत:करणात शुभ-अशुभ यांच्यातील संघर्ष सतत सुरु आहे. जेंव्हा या दैवी गुणांचा विजय होतो तेंव्हा त्या कुरुक्षेत्राचे धर्मक्षेत्र होते. नराचा नारायण होतो. हे गुण जेथे असतात तेथे प्रसन्नता, शांती व अक्षय सुख यांची प्राप्ती होते. 'कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत्'' रामोभूत्वा राम यजेत्. कृष्ण होऊन कृष्णाची पूजा, राम किंवा शिव होऊन राम-शिवाची पूजा करण्याचे सामर्थ्य मनुष्याला भगवंताने दिले आहे. हे दैवी गुणच मनुष्याला देवत्वापर्यंत नेतात. या सव्वीस गुणात ''अभय व सत्वसंशुद्धि'' हे दोन गुण म्हणजे सर्व गुणांचे सार आहे. सर्व गुण आहेत पण माणूस भयग्रस्त आहे तेंव्हा अर्जुनासारखी अवस्था होते. मनुष्याला मरणाची भिती सतत असते. अज्ञानामुळे असणारी भिती घालवून निर्भयता जेव्हा जीवनात येते, तेंव्हा विजीगीषुवृत्ती निर्माण होते. तेजस्वी जीवन जगण्यासाठी निर्भयता व आत्मसंशुद्धि याची गरज सर्वांनाच आहे.

**अध्याय १७ वा**

## श्रद्धा - अश्रद्धा

सतरावा अध्याय मनुष्याच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या मूलभूत अशा स्वभाव वैशिष्ट्यांचे दर्शन घडविणारा अध्याय आहे.

श्रद्धा हा संपूर्ण जीवन व्यापून टाकणारा विषय आहे. श्रद्धावानाचे जीवन भावमय, रसमय असते. सश्रद्धअंत:करण समृद्ध असते व अश्रद्ध, अज्ञ मनुष्य संशयात्मा असतो. तो नाश पावतो. प्रत्येक मनुष्याच्या जीवनात (३/४) तीन चतुर्थांश भाग भावाचा असतो. भावसंपन्न असल्याशिवाय भौतिक जीवनात सुद्धा सुख मिळत नाही. मग ते नात्या-गोत्यातील असो अथवा ईश्वराने निर्माण केलेल्या निसर्गातील अद्भूत गोष्टी असोत. श्रद्धा नसेल तर प्रेम नसते. श्रद्धा म्हणजे स्वत:वरील विश्वास. तीच आत्मश्रद्धा ! प्रत्येक आत्म्याच्या ठिकाणी वसत असलेल्या अनंत शक्तीचा विकास हा त्याच्या व माणसाची प्रत्येक कृती हा त्याच्या श्रद्धेचा परिणाम असतो.

श्रद्धापूर्वक केलेले प्रत्येक काम निर्दोष व परिपूर्ण असते. कारण काम हे काम न राहता त्याला पूजेचे स्वरुप प्राप्त होते. त्यामुळे स्वामी विवेकानंद म्हणतात की, माझे काम हीच माझी देवपूजा आहे.

या अध्यायात अर्जुन प्रथम श्लोकात एक प्रश्न विचारतो. प्रश्न असा की, जे लोक शास्त्रनियम सोडून केवळ श्रद्धापूर्वक देव-देवतांची पूजा करतात. त्यांची निष्ठा कशी असते, राजस, सात्विक की तामस ?

यावर उत्तर देताना भगवंतानी श्रद्धेचे नेमके स्वरुप सांगितले. भगवान म्हणतात, ''सात्विक, राजस व तामस या तीन प्रकारच्या श्रद्धा आहेत. प्रत्येकाची श्रद्धा त्याच्या त्याच्या सत्वाप्रमाणे म्हणजे प्रकृती स्वभावाप्रमाणे होत असते. ज्याची जशी श्रद्धा असते तसाच तो असतो. सात्विक लोक देवांची, राजस लोक यक्ष व राक्षस यांची व इतर तामसी लोक प्रेते व भूतगण यांची पूजा करतात.

प्रत्येक मनुष्याचे व्यक्तित्व व चारित्र्य त्याच्या त्याच्या आंतरिक स्वभावानुसार घडत असते. स्वभाव श्रद्धेनुसार, श्रद्धा विचारानुसार व जसे विचार तशी कृती घडते. कौरव-पांडवांचे युद्ध त्यांच्या त्यांच्या श्रद्धेनुसार घडले. श्रीकृष्णाकडे जेंव्हा दुर्योधन व अर्जुन एकाचवेळी गेले त्यावेळी दुर्योधनाने कृष्णाची यादवसेना मागितली व अर्जुनाने रथाचा सारथी म्हणून भगवंताला मागितले. सत्व व तामस यातील हे युद्ध होते. दैवी व आसुरी संपत्तीतील हे युद्ध होते. म्हणून दैवी गुणांचा म्हणजे पांडवांचा विजय अटळ होता.

जितकी श्रद्धा बलवान तितके त्याचे यश महान. सिद्धी, सुख, परमगती प्राप्त होण्यासाठी शास्त्रानुसार श्रद्धा बळकट केली पाहिजे. श्रद्धा असेल तरच भाव निर्माण होतो. ''श्रद्धावान लाभते ज्ञानं'' श्रद्धावानालाच ज्ञान प्राप्त होते असे श्रीकृष्ण म्हणतात.

आहार, यज्ञ, तप व दान यांचे भेद सुद्धा या तीन प्रकारच्या श्रद्धेनुसार घडत असतात.

शेवटच्या अठ्ठावीसाव्या श्लोकात भगवंताने, अश्रद्ध माणसाला कोणतेही चांगले फळ मिळत नाही असे सांगितले. कृष्ण म्हणतात, ''श्रद्धा न ठेवता जे हवन केले जाते, दान दिले जाते, तप केले जाते किंवा कोणतेही कर्म



केले जाते तेंव्हा त्याला 'असत्' असे म्हटले जाते. हे अर्जुना, इहलोकी अथवा परलोकी यांच्यामुळे कोणताही लाभ त्यांना होत नाही.''

भगवंत म्हणतात, यज्ञ, दान, तप इ. कर्मे जर श्रद्धापूर्व भावनेने केली तर ती 'सत्' ठरतात व ती ईश्वराप्रित्यर्थ केली तर भगवंताला प्रिय ठरतात. श्रद्धेवाचून केलेली सर्व कर्मे ही व्यर्थ ठरतात. श्रद्धाहीन कर्मात असे कोणतेही सत्व राहत नाही की, ज्यामुळे मनुष्यास उत्तमगती प्राप्त होईल. ते परमात्म्याला पोहोचत नाही. मोठे दान, घोर तप, यज्ञ केल्याने इहलोकांत कीर्ति व स्तुती प्राप्त होईलही पण अशा अश्रद्धेने केलेल्या कर्माची परलोकात मात्र नोंदही होत नाही. आंतरिक चित्तशुद्धीने व श्रद्धेने सात्विक कर्मे करुन संपूर्ण जीवन यज्ञमय करायचे व ते सारे ईश्वरार्पण करायचे हा गीतेचा संदेश पुन्हा एकदा या अध्यायात सांगितला आहे.

**अध्याय १८ वा**

# स्वधर्म-ईश्वरप्राप्ती-शरणागती

अठरावा अध्याय हा गीतारुपी मंदिराचा कळस आहे. हा अध्याय ७८ श्लोकांचा आहे. ज्ञानेश्वरांनी या अध्यायाला ''एकाध्यायी गीता'' च म्हटले आहे. संपूर्ण गीतेचे सारच या अध्यायात सामावलेले आहे. केवळ गीतेचे सारच नव्हे तर वेदांचा सारार्थही या अध्यायात सामावलेला आहे असे आदि शंकराचार्य म्हणतात. सर्व विषयांची एकवाक्यता करुन सर्वोच्च सिद्धान्त सांगणारा हा उपसंहारात्मक अध्याय आहे. संपूर्ण गीतेतून प्रसन्नता, पुरुषार्थ, भगवंताला आवडणारी भक्ती, अनहंकारिता, संयम व समर्पण या सहा गोष्टी जीवनात आल्या पाहिजेत.

संयम हा गीतेचा प्राण आहे. मनाचे उदात्तीकरण, उन्नयन झाल्याशिवाय व बुद्धी शुद्ध झाल्याशिवाय भक्तीत काहीही प्राप्त होत नाही. अंतःकरण शुद्धी हा परमार्थाचा पाया आहे. प्रसन्नता मिळवायची असेल तर या गोष्टी तरी आवश्यक आहेतच पण त्या बरोबर सुख-दुःखात मनाचे समत्व म्हणजे समतोलत्व. रामाला आदल्या दिवशी सांगण्यात येते की, उद्या रामाचा

राज्याभिषेक होणार व दुसऱ्या दिवशी सांगितले जाते की, रामाने चौदा वर्षे वनवास स्वीकारायचा. या दोन्ही वेळी रामाची प्रसन्नता ढळली नाही. अहंकार सुटल्याशिवाय दिव्यत्वाची प्रचिती येत नाही. अहंकार उपरण्यासारखा केंव्हाही काढून ठेवता आला पाहिजे. जीवनात कृतज्ञता आली की, अहंकाराचा नाश होतो. भगवंत माझे जीवन् चालवितो, माझे सर्व व्यवहार त्याच्याच कृपेने चालतात, अशी कृतज्ञता आली की, अहंकार गळून पडतो. म्हणून ''निरहंकारी व निर्मम'' हे गीतेत सतत सांगण्यात आले आहे. अनासक्ति म्हणजेच निर्मम 'मी व माझे' सोडून 'तू व तुझे' हे प्रत्येक ठिकाणी आले की, समर्पण भाव आला असे समजायचे.

भोगवाद, चंगळवाद आज थैमान घालत आहे. त्यामुळे जीवन उद्ध्वस्त होत आहे. गीतेने दिलेल्या संयमाच्या शिकवणाची आता खरी गरज आहे. भोग की त्याग यात गीतेने समन्वयाची भूमिका घेतली आहे. भोगविषय ईश्वरानेच निर्माण केले आहेत. त्यासाठीच दहा इंद्रिये दिली आहेत. धर्माला, नीतीला अनुसरुन भोग जरुर भोगावेत हा गीतेचा आग्रह आहे.

स्वधर्माला अनुसरुन सर्व कर्मे करावीत. ती कर्मे निरंहकार बुद्धीने व यज्ञीय भावनेने करुन भगवंताला अर्पण करावीत. ''स्वकर्मणा तमभ्यर्च्य'' हाच गीतेचा आग्रह आहे. म्हणजे शुद्ध केलेल्या कर्मरुपी फुलांची ओंजळ त्याच्या चरणावर वाहिली की, भगवंताला ती अर्पण भक्ती आवडते.

अशी कर्मे समर्पण करता करता एक दिवस भक्ताने भगवंताला संपूर्ण शरणागत व्हावे ही इच्छा स्वत: भगवंताने सहासष्ठाव्या श्लोकात सांगितली आहे.

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वां सर्व पापेभ्यो मोक्षायिष्यामि मा शुचः ।। १८.६६**

**अर्थ :-** ''सर्व सोडून तू मला एकट्यालाच शरण ये. मी तुला सर्व पापापासून मुक्त करीन भिऊ नको''

भक्तीचे सर्व मार्ग सांगितल्यावर अखेरच्या भागात संपूर्ण समर्पणाचा हा शरणागतीचा मार्ग स्वत: कृष्णाने अर्जुनाला सांगितला. सर्व पापापासून मुक्त करण्याचे आश्वासनही दिले. भिऊ नकोस हा धीरही दिला.



ईश्वरप्राप्तीचा राजमार्ग ४९ ते ५५ या श्लोकात, कृष्णाने कथन केला आहे. हे सात श्लोक भगवंत प्राप्तीचे सारभूत श्लोक आहेत. भगवंताने ४९ व्या श्लोकात म्हटले आहे.

''कोठेही आसक्ती न ठेवता, मन ताब्यात आणून, निष्काम बुद्धीने जो कर्मे करतो त्याला कर्मफलाचा त्याग केल्यामुळे ज्ञानयोग्याला मिळणारी श्रेष्ठ नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होते.'' यानंतर अशी सिद्धी प्राप्त झाल्यावर ब्रह्मप्राप्ती कशी होते याचे वर्णन आहे. अंत:करण शुद्धी, संयमीत जीवन, ध्यानयुक्त व विरक्त, तसेच अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह यांचा त्याग करुन, ममत्वरहित व शांत झालेला ब्रह्मपद प्राप्त होण्यास योग्य ठरतो. अशा ब्रह्मसाक्षात्काराने प्रसन्नचित्त झालेला योगी निरपेक्ष व प्रसन्न असतो. सर्व प्राणीमात्राविषयीची समभावना त्याच्या मनात असते. अशा ब्रह्मभूत झालेल्या साधकाला भगवंताची श्रेष्ठ भक्ती प्राप्त होते.

अशा भक्तीमुळे ''मी कोण आहे व केवढा आहे'' हे त्याला तत्वत: कळते आणि हे तत्वत: कळल्यावर तो माझ्याशी एकरुप होतो असे भगवंत शेवटी सांगतात. हे भक्तीचे सोपान म्हणजे गीतेचे संपूर्ण भक्तीशास्त्रच आहे.

शेवटी भगवंत अर्जुनाला विचारतात, ''आतापर्यंत जो उपदेश केला तो एकाग्र चित्ताने ऐकलास का ? व त्यामुळे तुझा मोह नाहीसा झाला का ?'' या प्रश्नाला अर्जुन कृतज्ञतापूर्वक सांगतो –

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत् प्रसादात मया अच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ।। ७३ ।।**

''हे अच्युता ! तुमच्या प्रसादाने माझा मोह नाहीसा झाला. माझ्या कर्तव्यधर्माचे स्मरण मला झाले. आता मी नि:संदेह झालो. मी तुमच्या म्हणण्याप्रमाणे (युद्ध) करीन.''

''गीतेच्या वचनाप्रमाणे मी वागेन''असे अर्जुनासारखे प्रत्येकाने म्हटले पाहिजे. अर्जुनाच्या निमित्ताने तुम्हा-आम्हा सर्वांना, हे विचार प्रत्यक्ष आचरणात आणण्यासाठी हा भगवंताचा उपदेश आहे. आपल्या जीवनरुपी रथाचा कृष्ण हा सारथी झाला तर जीवनरथ आत्मोन्नतीच्या राजरस्त्याने निश्चित जाईल.

# भगवद्गीता व कृष्णनीती

गीतेच्या महत्वाच्या श्लोकातून आपण कृष्णाच्या तत्वज्ञानाचे विहंगावलोकन केले. जीवनाच्या सर्व क्षेत्रात कृष्णनीतीची आज गरज आहे. या तत्वज्ञानातून जो नीतीधर्म प्रकट झाला, त्याप्रमाणे कृष्ण आपले जीवन जगला. आपल्या आचरणात व नीतीत कोठेही भेदाभेद नव्हता. गीतेत जीवनाच्या सर्व पैलूवर या कृष्णनीतीचाच प्रभाव होता. जे सांगितले त्याप्रमाणे सर्व व्यवहार केला. उक्ती व कृतीत संपूर्ण एक वाक्यता ! जगाच्या पाठीवर असे तत्वज्ञ क्वचितच आढळतील.

कृष्णजन्माच्या वेळची सामाजिक, नैतिक, राजकीय, धार्मिक स्थिती किती विदारक होती हे आपण पाहिले. 'यदा यदा हि धर्मस्य... या श्लोकात भगवंताच्या अवताराचे प्रयोजन सांगितले. ''सज्जनांच्या रक्षणासाठी, दुर्जनांचा नाश करण्यासाठी व धर्माच्या पुनर्स्थापनेसाठी'' कृष्णाने आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले व यासाठी ही कृष्णनीती वापरली.

या नीतीचा भाग म्हणून, कर्मयोग सांगितला. विहीत, नीयत व भगवंताने नेमून दिलेला स्वधर्म निष्ठेने, प्रेमाने व कर्तव्य भावनेने करावा याचा वस्तुपाठ स्वतःच्या आचरणांतून दाखविला. ''सतत कर्म समाचर'' हा संदेश दिला. 'मी केले' असा अहंकार न ठेवता, अनासक्त बुद्धीने सर्व कर्मे, भगवंताला अर्पण करुन कर्मबंधनातून मुक्त व्हावे असा सल्ला दिला. एवढी राज्ये, वैभव जिंकले पण सत्ता, संपत्ती यापासून स्वतःला पूर्णपणे दूर ठेवले. हे सर्व करताना फक्त एकच हेतू होता. सर्वांचे कल्याण व दुष्टांचा नायनाट. पांडव सज्जन होते म्हणून पांडवांची बाजू घेतली. कौरव आसुरी शक्तीचे होते म्हणून ते शत्रू होते. भीष्म, द्रोण, कर्ण... असे सर्वजण ज्ञानी, शूर, वीर योद्धे होते पण सत्याच्या, नीतीच्या व धर्माच्या विरुद्ध होते म्हणूनच युद्धनीतीप्रमाणे त्यांचाही संहार करावा लागला. हे करताना पांडवासह कृष्णाला विजयाचा आनंद नव्हता. पण नीयती अटळ होती.

भक्तीयोग सांगितला तोही भक्ताचे गुण सांगून, ईश्वराच्या नेमका पत्ता सांगून व भक्तीची वैश्विक प्रेमसूत्रे सांगून. भक्तीतील सर्वात मोठे



साधन म्हणून अंतर्बाह्य सत्वशुद्धी सांगितली. अंतःकरण म्हणजे आतील इंद्रिये. मन, बुद्धी, चित्त व अहंकार ही आतली इंद्रिये ही पूर्ण शुद्ध झाल्याशिवाय भक्ती व ज्ञान प्रतिष्ठित होत नाही हे पुन्हा पुन्हा सांगितले. भक्ताने आत्मौपम्य दृष्टीने जगाकडे पहावे कारण भगवंत अंश रुपाने प्रत्येक भूतमात्रात आहे याचा गीतेत वारंवार उल्लेख केला. म्हणून समता, बंधूता, प्रेम, विश्वबंधूत्व म्हणजे वसुधैव कुटुंबकम् या महान मूल्यांचा उद्घोष केला. भगवंताला सर्वात पाहणे व भगवंतात सर्व पाहणे ही दृष्टि येण्यासाठीच भक्ती असावी हे उद्दीष्ट सांगितले.

भगवंताने प्रत्येकात प्रचंड उर्जा दिली आहे. यावर श्रद्धेने विश्वास ठेवावा. ही आत्मशक्ती जाणावी व विजीगीषु वृत्तीने, तेजाने त्याचा वापर स्वतःच्या उन्नतीसाठी व जगाच्या कल्याणासाठी त्याचा वापर करावा. ''आत्मनो मोक्षार्थं जगद्हितायच'' या उदात्त हेतूने प्रत्येक कर्म करावे. यातच जीवन साफल्य आहे. यासाठी दैवी गुणांची जोपासना करावी. राष्ट्रपीता महात्मा गांधीनी १६ व्या अध्यायाच्या २६ दैवी गुणांपैकी केवळ तीन गुण निवडले. या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात असलेले... अहिंसा, सत्य, प्रेम हे तीन गुण ! गीतेच्या तत्वज्ञानाप्रमाणे संपूर्ण जीवनभर आचरण केले म्हणून गीतेला त्यांनी आई मानले.

'सुख' हे मनुष्याच्या जीवनाचे प्रमुख उद्दीष्ट आहे. गीतेचा पहिला अध्याय 'विषाद योग'. विषाद म्हणजे दुःख, नैराश्य. गीतेचा शेवट प्रसन्नतेत आहे. म्हणून गीतेतील संपूर्ण तत्वज्ञान हे विषादापासून प्रसन्नतेकडे नेणारे आहे. तृप्ती, शांती, निर्भयता, आनंद या जीवन कृतार्थ व सुखी करणाऱ्या, चारी गोष्टी गीतेने सूत्रबद्ध रीतीने मांडल्या आहेत. सुखाचा झरा अंतःकरणातच आहे. सुख म्हणजे आत्मसुख. अखंड टिकणारे. भौतिक सुख म्हणजे वस्तूच्या भोगातून मिळणारे विषय सुख. हे सुख अल्पकाळ टिकणारे क्षणिक म्हणून ते पुन्हा भोगावेसे वाटते. या भोगातून जे सुख मिळते असे वाटते. तो केवळ आत्मसुखाचा स्पर्श असतो मग आत्मसुख प्रत्यक्ष मिळाले तर ? माणसाला भौतिक सुखाची सर्व साधने मिळतात पण मनःशांती मिळत नाही. कारण शांतीचे हे ठिकाण आत अंतःकरणात आहे. यासाठीच अध्यात्म ! गीतेच्या

विचारातून शांती प्राप्त करण्याची साधना समजते. सुखाची साधना प्रेम व त्यागात, दानात आहे. त्यात तृप्ती दडलेली आहेच.

कृष्ण म्हणजे आनंद. कृष्ण म्हणजे प्रेम. कृष्ण म्हणजे कर्षति इतिकृष्ण: । सर्वांना आकर्षित करतो तो कृष्ण. कृष्ण म्हणजे अभय ! निर्भयता ! कृष्ण म्हणजे दैवी विचार. कृष्ण म्हणजे सोळा कला. म्हणून कृष्ण म्हणजे पूर्णपुरुष...पूर्णावतार. एक पूर्ण पुरुष म्हणून, गोकुळापासून देह सोडेपर्यंत सर्व भूमिका कृष्णाने निभावल्या.

गीता सांगते की, प्रत्येक देहातील आत्मा हा, त्या एकाच परमात्म्याचा अंश आहे. आत्मा जेव्हा परमात्म्याशी एकरुप होतो तेंव्हा तो ब्रह्मपदाला पोहोचतो. म्हणून प्रत्येकजण अमृतपुत्र आहे. सोऽहं म्हणजे स:अहं–तो मी आहे. ही परमपदाची प्राप्ती या एकाच जन्मात घडू शकते हा विश्वास व तो मिळविण्याचा मार्ग गीतेने दिला आहे. हे पंचमहाभूताचे शरीर जरी मर्त्य असले तरी, या देहात चेतन, चैतन्य, प्राण, आत्मा या रुपाने ती महानशक्ती विलसत आहे. त्या महान शक्तीला ओळखणे व अनुभवणे म्हणजे ज्ञान... आत्मज्ञान ! आपण नित्य, शुद्ध, बुद्ध व आनंदस्वरुप आहोत याची अनुभूती घेणे म्हणजे आत्मज्ञान. हे कसे प्राप्त करायचे याचा साधनमार्ग कृष्णाने सांगितला.

सगुण व निर्गुणाची, मूर्त व अमूर्त, साकार व निराकार, व्यक्त व अव्यक्त यात भेद नाही. निर्गुण, निराकार शक्तीसुद्धा भक्ताच्या प्रेमाखातर सगुण रुप धारण करते. मानवी मनासाठी सगुणाची पूजा म्हणजे मूर्तिपूजा अधिक सोयीची. दोन्हीही श्रेष्ठ ! त्यामुळे ज्याला जी शक्य आहे त्याने ती करावी या स्वातंत्र्यामुळेच अनेक पंथ, अनेक संप्रदाय, अनेक देवदेवता पूजा पद्धती. पण सगुणातून निर्गुणाकडे मात्र भक्तीचा प्रवास असावा. कारण –

**एकोदेव: सर्वभूतेषु गूढ: सर्वभूतान्तरात्मा ।**
**कर्माध्यक्ष: सर्वभूताधिवास: साक्षीचेता केवलो निर्गुण:च ।।**
**(श्वेताश्वेतर उपनिषद)**

''सर्वांच्या ठायी एकच परमात्मा, तोच देव, सर्व ठिकाणी व्यापून राहिलेला, सर्व भूतमात्रात वसत असलेला. गूढ, साक्षी, चैतन्यमय केवळ



शुद्ध व निर्गुण असलेली परमशक्ती.''

तोच आत्मा म्हणून शरीरात आहे. भक्तीची परमोच्च अवस्था म्हणजे त्या आत्मरुपाला जाणून ब्रह्मभूत होणे. हाच आत्मा जेंव्हा परमशक्तीशी जोडला जातो तेंव्हा सोऽहंची अनुभूती होते व तो भक्त ईश्वररुप होतो. तो ज्ञानी होतो, त्याला सत्याचा साक्षात्कार होतो. तो बुद्ध होतो, रामकृष्ण परमहंस होतो. तुकाराम ज्ञानेश्वर होतो, तोच कृष्णरुप होतो.

गीतेत या कृष्णरुपाचा, कृष्णनीतीचा महिमा अक्षरा–अक्षरातून मंत्ररुपाने व्यक्त झाला आहे. तो प्रत्यक्षात आचरणे म्हणजे कृष्णरुप होणे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



कृष्ण म्हणजे प्रेम .... आनंद

प्रकरण ७

# भारत व जगाला कृष्ण-कृष्णनीती-गीता यांची गरज

## कृष्ण म्हणजे प्रेम .... आनंद

कृष्णावतार हे या देशाचे भूषण आहे. महाभारताचे वैभव आहे. महाभारतातून कृष्ण वगळला तर त्यात काहीच राहणार नाही. कृष्ण एक पूर्णावतार होता. पण मनुष्यावतारात येऊन आपले अवतार कार्य पूर्ण केले. विविध रुपांनी कृष्ण नटला. नटरवट, खट्याळ बालकापासून जगाला दीपवून टाकणारे तत्वज्ञान सांगणारा तत्वज्ञ श्रीकृष्ण, गोवर्धन पूजा प्रस्थापित करुन इंद्रपूजा बंद करणारा समाजोद्धारक, कुरुक्षेत्रावरील धर्मयुद्ध जिंकणारा युद्धनीतीज्ञ व भल्या भल्या, कंस, जरासंध अशा पाशवी शक्ती नष्ट करणारा राजनीतीज्ञ, तत्वज्ञान केवळ न सांगता प्रत्यक्ष नीती-धर्माने जगून दाखविणारा नीतीज्ञ.... अशी कृष्णाची अनेक रुपे आतापर्यंत आपण पाहिली. कृष्ण-चरित्र हे लोकोत्तर चरित्र आहे. कृष्ण समजणे म्हणजे आकाशाला गवसणी घालण्यासारखे आहे. साडेसहाशे महाविद्वानांनी आतापर्यंत गीतेवर भाष्ये लिहिली नित्य-नूतन अशा या ग्रंथावर यापुढे ही अशी भाष्ये लिहीली जातील पण एकमात्र निश्चित की कृष्ण व कृष्णाचे तत्वज्ञान मला पूर्ण समजले आहे असे असे म्हणणारा कोणीही असणार नाही हे मात्र निश्चित. माझीही भूमिका अशीच आहे. भाव-विभोर व्हावयास लावणाऱ्या कृष्णजीवनावर केवळ प्रेमभक्ती करणारा एक साधक, अशीच माझी भूमिका आहे.

श्रीकृष्ण हे प्रेमाचे प्रतीक आहे. जन्मल्यापासून ते देहोत्सर्गापर्यंत



कृष्णाने सर्वांना प्रेमच दिले आहे. मानव वंशाचा उद्धारक असणारा तत्वज्ञ श्रीकृष्ण हा स्वत: आनंदस्वरुप होता, प्रेमस्वरुप होता पण सज्ञनांसाठी व दुर्जनांसाठी कर्दनकाळ. दैवी काम करणाऱ्यांचा सरवा व अनन्यभावाने भक्ती करणाऱ्यांचे योगक्षेम चालविणारा तारणहार. म्हणून ''न मे भक्त: प्रणश्यति ।'' असा प्रतिज्ञापर्वूक सांगणारा भगवानही तोच आहे.

गोकुळात कृष्णाचे प्रेम बालसवंगड्यांना लाभले. माता यशोदेला लाभले. गोकुळातल्या गायी, कृष्णाच्या बासरीने त्याच्यामागून जात. गोकुळातल्या झाडा-पानाफुलावर कृष्णाचे प्रेम होते. कृष्णाचे रुप अतिशय मनोहारी होते. त्यामुळेच तो सर्वांना प्रिय होता. कर्षति इति कृष्ण: सर्वांना आकर्षित करतो तो कृष्ण. त्यामुळे बालकृष्णाचा नटखटपणा व त्याच्या खोड्या सुद्धा गोप-गोपींनां आनंदाचा विषय होता. या प्रेमाखातर कृष्णाने कोणत्याही संकटकाळात आपल्या बालगोपाळांना वाचविले. मग तो कालिया नागाचा प्रसंग असो किंवा इंद्रपूजा बंद करुन गोवर्धन पूजा सुरु करण्याचा प्रसंग असो..... सर्व ठिकाणी कृष्णाच्या पराक्रमाने गोकुळवासियांना जिंकले होते. स्वत:च्या शौर्याबद्दल त्याने कधी अभिमान बाळगला नाही. 'गवळ्याचा पोर' म्हणून काहीजण हिणवायचे. पण त्याला तो अभिमान वाटायचा. सर्वच जातींची ही गोकुळची मुले असायची. पण आपण नंदराजाचे पुत्र आहोत असा अभिमान कृष्णाने कधीही दाखविला नाही. त्यांच्याबरोबर खेळण्याबागडण्यात व गायींच्या कळपात तो स्वत:ला हरवून जाई. गोकुळच्या सर्व मुलांना गोकुळातले दूध-दही-लोणी मिळावे व नंतरच मथुरेला त्या दुधाची विक्री व्हावी याचसाठी दही लोण्याची सांघिक चोरी व्हायची. गोपींची मडकी फोडायची. हा बंडखोरपणा समतेच्या उदात्त तत्वातून व्हायचा. नाहीतर नंदराजाच्या घरात दूध, लोण्याची काय कमतरता होती ? पूतनामावशी, केशी, अधासूर अशा असुरांना शासन करुन गोकुळवासियांच्या मनात निर्भयता व विजीगीषु वृत्ती निर्माण करण्याचे कार्य कृष्णाने बालपणातच करुन दाखविले. यामुळे कृष्णाचे गोकुळावरचे प्रेम व गोकुळवासियांचे कृष्णावरचे प्रेम इतके पराकोटीला गेलेले असताना सुद्धा, गोकुळातून मथुरेला जेव्हा त्याने प्रयाण केले, त्यानंतर तो पुन्हा गोकुळात कधीही फिरकला नाही. प्रेम करुन आनसक्त राहायचे.

कारण अंगिकारलेल्या भावी कार्यात झोकून देण्याची त्याची वृत्ती होती.

रुक्मिणीने कृष्णाला लिहिलेले प्रेमपत्र हे बहुतेक इतिहासातील पहिलेच प्रेमपत्र असावे. कृष्णानेही रुक्मिणीची इच्छा पूर्ण केली. जरासंध, शिशुपाल व रुक्मि यांची योजना असफल ठरवून रुक्मिणीहरण केले. द्वारकेस येऊन थाटामाटात लग्नही केले. प्रेम हे उभयपक्षी असल्यामुळे संसार सुखाचा होतो. तसा त्यांचाही झाला. द्रौपदीवरील प्रेम हे आदरयुक्त प्रेम होते. द्रौपदीला कृष्ण हा रक्षणकर्ता वाटायचा. केवळ कृष्णाच्या सांगण्यावरुन पाच पांडवांची ती पत्नी झाली नाहीतर केवळ अर्जुनाशीच लग्न व्हायचे पण कृष्णाला आपल्या अवतार कार्याच्या पूर्ततेसाठी पांडवांना निमित्त बनवायचे होते. त्यामुळे त्यांचे एकत्र असणे हे अपरिहार्य होते. सुभद्रा व द्रौपदीवर सारख्याच बंधूभावाने प्रेम केले व रुक्मिणी, सत्यभामा व जांबवंती या तिन्ही पत्नीवरील प्रेमात कुठेही अधिक उणे होऊ दिले नाही. देवकीच्या पोटी जन्म घेतला पण वाढविले यशोदा मातेने पण दोघींवर प्रेम मात्र सारखेच केले.

कृष्णाचे हे सर्वांवरचे प्रेम हीच खरी त्याची शक्ती होती. श्रीकृष्णाचे मातृप्रेम, भातृप्रेम, मित्रप्रेम, पत्नीप्रेमव लोकप्रेम हे अलौकिक होते. कृष्णाचे सामाजिक, राजकीय काम तसे लोकोत्तर आहे तसे त्याचे कौटुंबिक दृढसंबंध घट्ट प्रेमाचे आहेत. कृष्ण गोकुळ सोडून मथुरेत आला व एका मागून एक अशा महान कार्यात त्याने स्वतःला झोकून दिले त्यामुळे तो गोकुळात परत जाऊ शकला नाही. त्याचे वय चौदा वर्षाचे होते जेव्हा त्याने गोकुळ सोडले. असे जरी असले तरी नंद यशोदेला प्रभासक्षेत्रामध्ये बोलावून त्या दोघांबद्दलचा भाव व्यक्त केला. देवकी–वसुदेव या जन्मदात्या आईवडिलांवर त्यांचे नितांत प्रेम होते. मथुरेत आल्यावर त्याने कंसाचे आदरातिथ्य स्वीकारले नाही. माझे मातापिता तुरुंगात असताना राजमहालात मी राहू शकत नाही असे म्हणून गावाबाहेरील बगीचामध्ये राहणे पसंत केले. जेव्हा कंस वध केला तेव्हाच तुरुंगात जाऊन आईवडिलांची मुक्तता केली. वसुदेवाला मथुरेमध्ये सन्माननीय पद देवून उभयतांना सुखी केले.

कृष्णाचे बंधूप्रेमही आदर्श होते. बलराम–कृष्णा मध्ये बलराम वडील बंधू होता. कृष्ण आपल्या मोठ्या भावाचा आदर व सन्मान सर्व प्रसंगात



राखत होता. त्याची आज्ञा व मर्यादा यांचे उल्लंघन कधीही करत नव्हता. बलरामाचेही कृष्णावर असेच प्रेम होते. बलरामाची इच्छा सुभद्रेचे लग्न दुर्योधनाशी लावून द्यावे अशी इच्छा होती व कृष्ण सुभद्राचे लग्न अर्जुनाशी व्हावे असे इच्छित होता. म्हणून कृष्णाने अर्जुनाकडून सुभद्रेचे अपहरण करविले. दुर्योधन बलरामाचा शिष्य असल्याने महाभारताच्या युद्धात कौरव पक्ष घेण्याची बलरामाची इच्छा होती. पण कृष्णाच्या पांडवांवरील ममतेमुळेच बलरामाने कौरवांना मदत केली नाही. दोघांचे बंधुप्रेम असे अतूट होते.

मित्र प्रेमाचा अद्भूत सोहळा सुदामा व कृष्ण यांच्या रुपाने अनेकांनी काव्यातून वर्णन केला आहे. कुठे कृष्ण व कोठे गरीब ब्राह्मण. पण सुदाम्याने आणलेली पोह्याची पुरचुंडी कृष्णाने अवीट गोडीने चाखली. सुदाम्याने आपल्या येण्याचे खरे कारण सांगितले नाही. पण कृष्णाने ते नेमके ओळखले. जेव्हा सुदामा द्वारकेस गेला. त्यावेळी त्याला समजले की, कृष्णाने त्याचे दारिद्र्य केव्हाच मिटवून टाकले होते.

कृष्णाच्या अनेक पत्नी संदर्भात आक्षेपाही काहीजण घेतात. पण बहुपत्नीत्व ही त्यावेळची सामाजिक रुढी होती. त्यामुळे कृष्णाने विवाहाच्या बाबतीत जात–पात कधीच पाहिली नाही. उलट सोयीस्कर राजकारणांसाठी काही राजांनी आपल्या मुलींचा विवाह कृष्णाशी करुन दिला. कृष्णाने सर्वांशी उत्तम प्रकारे गृहस्थाश्रम पार पाडला. जरासंधाने तुरुंगात डांबून ठेवलेल्या स्त्रियांना कृष्णाने मुक्त केले. त्या मुलींना समाजातून बहिष्कृत केलेले असल्यामुळे व प्रत्यक्ष आईवडिलही घरात घेण्यास तयार नसल्यामुळे केवळ त्यांना सन्माननीय प्रतिष्ठा मिळवून देण्यासाठी त्यांना पत्नीपद बहाल केले.

कृष्ण–अर्जुन म्हणजे नर नारायणाची जोडी. अर्जुन सखा, शिष्य अशा नात्याने एकरुप झाला होता. जेव्हा जेव्हा अर्जुन मोहवश होवून कर्तव्यमुक्त व्हायचा. अशा प्रत्येक क्षणी कृष्णाने त्याला वाचविले आहे. प्रत्यक्ष युद्धभूमीवर असे अनेक वेळा प्रसंग आले. नात्याने अर्जुन कृष्णाचा आतेभाऊ होता. पण या सर्व नात्यात दोघांच्यातील सख्यप्रेम केवळ अद्भूत होते. अर्जुन स्वतःच कृष्णाला सांगतो की, 'मी तुला पूर्णपणे शरणागत

झालेलो आहे. म्हणून गुरु या नात्याने मला माझ्या कल्याणाचा उपदेश करा.'' शाधि मां त्वा प्रपन्नं .. मी तुम्हांला पूर्ण शरण आलेलो असल्यामुळे जे मला श्रेयस्कर असेल असा उपदेश मला करा '' ।। २.७।। असा अर्जुनाचा भाव होता. कृष्णाने अर्जुनाला आपल्या अवतारकार्याची धुरा सांभाळण्यासाठी साधन केले होते. म्हणून युद्धात असो अथवा सुभद्रेशी विवाह करण्याचा प्रसंग असो. कृष्णाच्या सर्व योजनांना मूर्त स्वरुप देणारा तो प्रत्यक्ष साधन होता. जेव्हा जेव्हा दोघांच्याही हातून असे मानवतेचे कार्य घडत गेले तेव्हा हे प्रेमसंबंध दृढ होत गेले. कृष्णाने जेव्हा आपले चतुर्भूज रुप दाखवून विश्वदर्शन घडविले तेव्हा तो नम्रपणे म्हणाला, ''कृष्णा मला हे रुप पाहवत नाही. तुझे नेहमीचे रुप पाहायचे आहे.'' या प्रसंगानंतर आपण कोणत्या महान शक्तीशी जोडले गेलो आहोत याची जाणीव अर्जुनाला झाली. नर–नारायणाचे हे ऐक्य म्हणजे अर्जुनाच्या अध्यात्मिक ज्ञानाची पूर्तताच होती. कृष्णाच्या या महान मंगल कार्यात मला निमित्त व्हायची संधी मिळाली. त्यामुळे कृतकृत्य झाल्याची सार्थ भावना अर्जुनाच्या मनात होती. अर्जुनाला स्वत:ची भूमिका, ओळख व नेमके विहीत कर्म समजले म्हणून त्याच्या मनात काही शंका उरल्या नाहीत. कृष्ण जे जे सांगेल ते माझ्या पूर्ण कल्याणाचे आहे ही, त्याची दृढ श्रद्धा होती. त्यामुळे कोणत्याही परिणामांची, फळांची अपेक्षा न करता, केवळ कर्तव्य भावनेने अर्जनाने सर्व कार्ये पूर्ण केली. ''कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत्'' तसे कृष्णविचारांनी, अर्जुनाने कृष्णाचे काम केले. असा तो एकरुप झाल्यामुळे, नरका नारायण होवून गेला. म्हणून आज कृष्ण–अर्जुनाची अनेक मंदिरे भारतात आहेत.

कृष्ण–राधेच्या प्रेमाविषयी खूप विविध मत मतांतरे आहेत असे असूनसुद्धा राधा–प्रेमाविषयी चर्चा केल्याशिवाय कृष्ण प्रेमाची पूर्तता होत नाही. राधे–श्याम व राधा कृष्ण यातील राधा कोण ? प्रेमभक्तीमध्ये राधेला एवढे महत्त्व आहे की, राधेशिवाय कृष्णाचे अस्तित्व नाही पण वस्तुस्थिती अशी आहे की, कोणत्याही प्रमाणभूत ग्रंथात 'राधा' नावाच्या स्त्रीचा उल्लेखही नाही. उदा. कृष्ण जीवनावरचा प्रमाणभूत ग्रंथ 'हरिवंश' आहे. यात राधा नावाचा उल्लेखही नाही.



म्हणून 'राधा' हे रुपक आहे असे मानले जाते. प्रेमभक्तीचा महिमा वाढविण्यासाठी पुराणकारांनी राधेला कृष्ण जीवनात स्थान दिले असावे. व आता ते इतके रुढ झालेले आहे की आज राधा–कृष्णाची असंख्य मंदिरे भारतात उभी राहिली आहेत. खूप संप्रदाय राधाभक्तीच्या पायावर उभे राहिले आहेत. राधाच्या समर्पण भक्तीने भक्तीत रंगून गेलेले असंख्य भक्त आज सर्वत्र आढळून येतात. जेथे राधेचा उल्लेख आहे अशा ग्रंथात तो लक्षणारुपात आहे म्हणून राधा म्हणजे प्रकृती ! प्रकृती व चेतना यांच्या संयोगातून जगाची निर्मिती झाली. असो.

काहीही असले तरी जेथे कृष्ण तेथे राधा. व जेथे राधा कृष्ण तेथे प्रेमाची अत्युत्कट अवस्था ! समर्पित प्रेमाची दिव्यधारा म्हणजे राधेचे प्रेम. म्हणून गोप–गोपिका या गोकुळवासियांच्या दिव्य प्रेमाची मूर्तिमंत ज्योत म्हणजे राधा. जशी संत मीराबाई. मीराचे प्रेम हे जसे कृष्णाशी एकरुप होण्यासाठी केलेले समर्पण होते. तसेच राधेचे अशा भक्तीसाठी केवळ प्रेमरुप. होणे व जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी त्या कृष्णाचे रुप पाहणे. कृष्णरुप होऊन स्वत:चे लौकिक अस्तित्व मिटवून टाकणे व कृष्णमय होऊन जाणे. ईश्वराशी एकरुप होण्यासाठी कर्मक़ांड, कर्मयोग, ज्ञानयोग अशा इतर कोणत्या भक्तीची आवश्यकताच नाही. जसे रामकृष्ण परमहंस ! कालिमातेशी ते संवाद करीत. विवेकानंद म्हणजे नरेंद्राला देवीशी बोलण्यासाठी त्यांनी एकदा पाठविले. भावविभोर स्थितीत नरेंद्राने वैराग्य ज्ञान याची मागणी मातेकडून केली. वास्तविक आईकडे रामकृष्णांनी पाठविले होते. ते नोकरी मागण्यासाठी. सगुण, साकार मूर्तीच्या बाबतीत अशी प्रेमभक्ती करुन ईश्वराशी एकरुप होता येते. तर प्रत्यक्ष विष्णूचा अवतार असलेल्या श्रीकृष्णाला पाहून अशी दिव्य प्रेमभक्ती का होणार नाही ?

म्हणून राधा किंवा संत मीराबाई या अशा अत्युत्कट, समर्पित प्रेमयोगाचे प्रतीक म्हणून का न मानावे ? कारण भगवंत अर्जुनाला शेवटच्या अध्यायात अशीच भक्ती करण्याचा उपदेश करतात ते म्हणतात,

**''सर्वधर्मान परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच: ।। ६६ ।।**

**''सर्वधर्म सोडून तू मला एकट्यालाच शरण ये. मी तुला सर्व पापापासून मुक्त करीन, भिऊ नको ।। १८.६६ ।।**

भक्तीचे सर्व मार्ग जे, मी तुला आतापर्यंत सांगितले ते पूर्णपणे विसरुन जा, मला तुझे संपूर्ण समर्पण कर. संपूर्ण समर्पण हीच शरणागतता. अशा समर्पित भावनेने माझ्याशी एकरुप हो. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन. श्रद्धेची परिसीमा व प्रेमाची अत्युच्य उत्कटता यातून ही समर्पित भावना निर्माण होते. राधा व मीराबाईने हेच केले. असेच समर्पण गोपींचेही होते. म्हणूनच संत कबीराने आपल्या शिष्यांना समजावले.

**''कबीर कबीर क्या कहे, जावो जमुना के तीर ।**
**एक एक गोपीके प्यार में बह गये कोटी कोटी कबीर ।।**

''माझ्या भक्तीचा उधो उधो कसला करता । त्या जमुनाच्या किनाऱ्यावर जा. तेथल्या एक एक गोपींचे कृष्णावरचे उत्कट प्रेम, दिव्य प्रेम पाहा. मग कळेल की, त्या एक एक गोपींच्या प्रेमात कोटी कोटी कबीर बुडून जातील.

कृष्णाने उद्धवाला गोपींचे प्रेम अनुभविण्यासाठी गोकुळला पाठविले होते. ज्ञानमार्गी असलेल्या उद्धवाला कळून चुकले की, गोपी पूर्णपणे कृष्णमय झाल्या होत्या. म्हणून राधा आणि कृष्णाच्या प्रेमाची प्रचिती गोकुळच्या गोप-गोपिकांच्या समर्पित प्रेमातून दिसून येतो.

म्हणून राधा-कृष्णांची भक्ती करणारे साधक हे त्या गोप-गोपिकांच्या समर्पित व शरणागत भक्तीचे अनुकरण करत असतात. म्हणून वृंदावन, गोकुळ, मथुरा ही त्यांची तीर्थक्षेत्रे झाली आहेत. कृष्ण जेथे जेथे वावरला तेथली धूळ, माती, झाडे, पाने, फुले ती जमुना नदी गायी-गुरे, मोर-पक्षी, तेथले आकाश..... सर्व काही कृष्ण-दर्शनाची प्रत्यक्ष चिन्हे आहेत. सर्व काही जर कृष्णमय दिसत असेल तर यापेक्षा अधिक, भगवंत कुठे काय मागतात ?

मग विद्वानांनी खुशाल वादविवाद करत राहावेत. राधा हे केवळ प्रतीक आहे. राधाही काल्पनिक व्यक्तिरेखा आहे वगैरे वगैरे. त्या लाखो भक्तांना याचे सोयर-सुतक नाही. 'राधेश्याम' 'राधेश्याम' म्हणून देहभान



विसरुन तादात्म्य पावलेल्या भक्तांच्या हृदयात राधा का असणार नाही ? शेवटी राधा म्हणजे तरी कोण ? राधा म्हणजे त्या समर्पित शरणागत भक्तीचे दुसरे रुप नव्हे काय ?

मधुराभक्तीत भक्त स्वत:ला राधा समजतो व कृष्णावर राधेसारखे प्रेम करतो. त्या भक्तांना ईश्वराशी एकतानता, एकरुपता झाल्याची अनुभूती येत नसेल का ?

कारण शेवटी भक्ती, भक्ती म्हणजे तरी काय ? ''सात्विास्मिन परमप्रेम रुपा, अमृत स्वरुपाच'' भक्ती म्हणजे त्या ईश्वरावरील श्रेष्ठ प्रेम. जे अमृतासारखे आहे. नारदीय भक्ती सूत्रातील ही भक्तीची व्याख्या.

म्हणून कृष्ण म्हणजे केवळ प्रेम ! समर्पित प्रेम ! शरणागत प्रेम. जे कृष्णाने गीतेत सांगितले ते, गोकुळातल्या गोप-गोपींनी-राधेंनी-मीराबाईने आचरणात आणले व त्या प्रेमभक्तीरुपी अमृताचे सेवन केले.

# कृष्णाचा प्रेमसंदेश

कृष्णाने भक्तीतील कोणत्याही प्रकाराला तर-तम भावाने पाहिले नाही. भक्ती-कर्म ज्ञान या तिन्ही योगांचा समन्वय गीतेत केला. रामकृष्ण परमहंस यांनी म्हटल्याप्रमाणे प्रत्येक व्यक्ती आपल्या आंतरिक प्रकृती धर्मानुसार म्हणजेच सत्वानुरुप श्रद्धा स्वीकारतो व त्याप्रमाणे उपासनापद्धती म्हणून जितक्या व्यक्ती तेवढे मार्ग. स्वत: रामकृष्ण परमहंसानी इस्लाम, ख्रिश्चन अशा अनेक धर्मांच्या उपासनामार्गाने, त्या त्या ईश्वरांची भक्ती करुन अनुभूती प्राप्त करुन घेतली. व शेवटी हेच सांगितले की, ''एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति ।। म्हणून ''एको देव:।'' हा उपनिषदांचा उद्‌घोष सर्वप्रथम हिंदू धर्मानेच स्वीकारला. हिंदू धर्माने आपल्या सहिष्णू, उदारता व लवचिकता या गुणांनी ईश्वरी सत्तेकडे पाहिले आहे. कृष्णाने याच धर्माचा पुरस्कार केला आहे.

शाण्डिल्याच्या भक्तिसूत्रात भक्तीची व्याख्या ''परानुरक्तिरीश्वरे'' अशी केली आहे. भक्ती म्हणजे ईश्वराविषयीचे पराकाष्ठेचे प्रेम ! या श्रेष्ठ भक्तीमध्ये भक्त देवाकडे काहीच मागत नसतो उलट भक्तच स्वत:ला संपूर्णपणे समर्पित

करतो. तुकारामाने मागितले त्याप्रमाणे ''हेचि दान देगा देवा, तुझा विसर न व्हावा'' अशी निरपेक्ष भक्ती गोपींनी, राधेंनी केली. कृष्ण गोकुळ सोडून निघून गेला पण कृष्णाबरोबर गोपींची मनेही निघून गेली. उद्धवाला त्यांनी हेच सांगितले की आमची मने आमच्या जवळ नाहीतच. ''अविभक्तम् विभक्तेषु''– अनेकात एकत्व पाहणे हा सनातन विचार गीतेने स्वीकारला. गोपींची दृष्टी अशीच झाली होती. कृष्ण त्यांना सर्वत्र दिसत होता. जसे संत मीराला वाटत होते. जेथे पाहीन तेथे तोच मला दिसतो. माझे अस्तित्वच काही राहिले नाही. 'सुद बुध' काही राहिलेच नाही अशी मीराची धारणा झाली होती.

या प्रेमरुप भक्तीने गोपी कृतकृत्य झाल्या होत्या. अमृतत्वाची प्राप्ती त्यांना झाली होती. खरेखुरे श्रेय प्राप्त झाले होते.

कृष्णाचा धर्माचा अर्थ गोप-गोपींनी आपल्या आचरणाने दाखविला होता. धर्म म्हणजे अत्यंत प्रेमाने, आपल्याला मिळालेले विहीत कर्म, स्वधर्म करणे. भगवंताने जन्म देऊन आपल्याला याच कामासाठी धरतीवर पाठविलेले असते. कृष्ण स्वत: याच भावनेने जगला. कृष्णाचा जन्म या अवतारी कार्यासाठीच झाला होता. आपल्या कार्यासाठी त्याने या प्रेम धर्माची नीती अवलांबिली. प्रेम व आनंद म्हणजे कृष्ण असे नातेच निर्माण झाले. या भावनेपोटी शिशुपालाचे शंभर अपराध होईपर्यंत वाट पाहिली. शेवटी ज्या भिल्लाने बाण मारला त्याला सुद्धा क्षमा करुन उत्तम गती प्राप्त करुन दिली. दुर्योधनाला आपले यादव सैन्य दिले. शेवटपर्यंत त्याच्याशी युद्धात तडजोड करण्याचा प्रयत्न केला. भीष्म, द्रोण, कर्ण या वाट चुकलेल्या सज्जनांना न्याय बाजू घेण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न केले. पांडवांना निमित्त करुन धर्मराज्याची स्थापना केली. असुरी शक्तींचा नाश करुन त्यांच्याच पुत्रांच्या हवाली राज्ये सुपूर्द केली कारण त्यांच्या सत्प्रवृत्तीवर कृष्णाचा विश्वास होता. सज्जनांचे रक्षण, दुष्ट शक्तीचे निर्मुलन व धर्मस्थापना या सर्व कार्यासाठी ही कृष्णनीती वापरली. या नीतीने सर्वांना आनंद देणे हेच कृष्णाचे जीवन कार्य होते. या संपूर्ण कार्यात स्त्रीचा सन्मान, तिचे रक्षण हे, लोकनिंदा स्वीकारुन सुद्धा कृष्णाने आनंदाने पार पाडले.



सर्वांवर प्रेम केले पण कोठेही आसक्ती ठेवली नाही. प्रत्येक कार्यात समतोल साधला. मोह, लोभ यांचा स्पर्शही होऊ दिला नाही. आपल्या सर्जन शक्तीने द्वारका नगरी वसविली. पण त्यात सुद्धा अलिप्तता बाळगली. राजसूय यज्ञाचे यजमानपद नाकारले व अतिथींच्या पत्रावळी उचलण्याचे काम केले. राज्ये जिंकली पण सत्ता संपत्ती यापासून दूर राहिले. ''तस्माद असक्त:'' सततं कार्य कर्म समाचार'' या आपल्याच तत्वज्ञानाप्रमाणे सतत कार्य करत राहिले पण सर्व ठिकाणी अनासक्ती ठेवून केवळ कर्तव्यभावनेने.

प्रेम मनुष्याला निर्भयता देते. संपूर्ण गीतेत दैवी गुणांच्या अग्रस्थानी अभय या गुणाला स्थान दिले आहे. कृष्णाने ही सर्व कार्ये केली ती निर्भयतेने जरासंधाशी संघर्ष करताना असो किंवा धृतराष्ट्राच्या दरबारात कृष्णाला बंदी करण्याच्या दुर्योधनाच्या कटाच्या वेळी असो, सर्व ठिकाणी बुद्धीची स्थिरता व निर्भयता यामुळे कृष्ण विजयी झाला.

एक पूर्ण पुरुष म्हणून जीवनातील सर्व व्यवहारात, आपली अनंत उर्जा वापरुन यश प्राप्त केले.

एवढ्या उदांत्त, दैवी गुणांचा समुच्चय एका व्यक्तीत आढळणे हे दुरापास्त. पण कृष्णावर सुद्धा आक्षेप घेणाऱ्यांची संख्या कमी नाही. त्यावेळच्या सामाजिक रुढीप्रमाणे बहुपत्नीत्व स्वीकारले पण आदर्श ग्रहस्थाश्रम पार पाडला. सर्व नात्यातील प्रेमाचा धागा घट्ट राखला. गीतेतील ''चातुर्वर्ण्य मया सृष्टं गुणकर्मणिभागश:। (४.१३) चार वर्णांची व्यवस्था गुण व कर्म यांच्या भेदाप्रमाणे मीच केली आहे असे कृष्णाने स्वत: सांगितले.

वास्तविक हे वर्ण जन्मावर आधारलेले नाहीत. समाजात हे चारही घटक आवश्यक आहेत. जन्म, जात यावरुन हा वर्ण ठरत नसून तो केवळ गुण व कर्म यावरुन ठरतो हे संदिग्धपणे सांगितले. स्वत: कृष्ण हे चार ही वर्ण प्रत्यक्ष जगला. विवाह करताना जात पाहिली नाही. या चार वर्णांची सर्व विहीत कर्मे कृष्णाने आपल्या जीवनात पार पाडली. ब्राह्मण म्हंणून गीतेसारख्या महान ग्रंथाची रचना करुन स्वत: तत्वज्ञानाची भूमिका पार पाडली. स्वत: जन्माने क्षत्रिय असल्यामुळे निर्भयता, साहस या गुणांच्या जोरावर युद्ध करुन असुरी शक्तींचा नाश केला. वैश्य म्हणून द्वारका नगरीची निर्मिती

केली. पांडवांना इंद्रप्रस्थ नगरी स्थापण्यासाठी धन दिले. इतरांची सेवा प्रेमाने व निरहंकार वृत्तीने केली पाहिजे. हे शूद्राचे काम कृष्णाने राजसूय यज्ञाच्या वेळी केले. बालगोपालांची सेवा केली. सांदिपनी ऋषींच्या आश्रमात पडेल ते काम केले व गुरुसेवा म्हणून पळवून नेलेल्या त्यांच्या एकुलत्या मुलाला, पंचजन्य राक्षसाच्या तावडीतून परत आणले.

खरे म्हणजे प्रत्येक मनुष्य या चारी वर्णांची सेवा कधीतरी करत असतो. महात्मा गांधीनी गीतेच्या शिकवणुकीप्रमाणे जन्मभर आचरण केले. समता, बंधूता, प्रेम यासाठी जन्मभर संघर्ष केला. दलितांना हरिजन म्हणून सन्मान दिला. स्वत: हातात झाडू घेऊन स्वच्छता केली. प्रार्थनेचा उपक्रम करुन आंतरिक स्वच्छतेलाही प्राधान्य दिले. सत्य, अहिंसा, प्रेम या दैवीगुणांप्रमाणे वागून या मूल्यांच्या प्रतिष्ठापनेसाठी एक वस्तुपाठ जगासमोर ठेवला. प्रेमधर्मात ही सर्व कार्ये सहजपणे होतात हे कृष्णाने सुद्धा जगून दाखविले.

कृष्णाने जगाला हा प्रेमाचा संदेश दिला आहे. प्रेम हीच भक्ती, प्रेम हाच धर्म. म्हणून सानेगुरुजी म्हणतात, ''खरा तो एकचि धर्म, जगाला प्रेम अर्पावे'' कृष्णाच्या आयुष्यातील दोन महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे युद्ध व दुसरे प्रेम. वास्तविक या दोन्ही टोकाच्या विरुद्ध गोष्टी. पण युद्धाच्या वेळी युद्ध हाच धर्म व प्रेमाच्या वेळी प्रेम हाच धर्म. या दोन्ही परस्परविरोधी गोष्टी असल्यातरी त्यात कोणताही संघर्ष, कृष्णाने येऊ दिला नाही. झोकून देवून पण कर्तव्यभावनेने सर्व काही यशस्वी करुन दाखविले. सर्वांच्या सुखाचा व कल्याणाचा विचार असल्याने कृष्णावर सर्वांनीच आत्मीयतेने प्रेम केले. राजापासून सामान्य माणसापर्यंत कृष्णाचे स्वागत सर्व ठिकाणी होई. असुरी शक्तींच्या जाचातून सुटका झाल्यामुळे सर्वांनी सुटकेचा निश्वास सोडला. नव्याने स्वातंत्र्याचा अनुभव मात्र घेतला.

कृष्ण म्हणजे प्रेम व आनंदाचा झरा. गोकुळापासून मथुरेपर्यंत मग वृंदावनापासून मगधापर्यंत जाईल तेथे कृष्णाने भरभरुन प्रेम व आनंद दिला. हे देत असताना दुष्टांचाही संहार केला.

पाच हजार वर्षानंतर आज कलियुगामध्ये याच कृष्णविचारांची गरज



आहे. पाच हजार वर्षांपूवी 'भागवता' मध्ये याचा स्पष्ट उल्लेख करण्यात आला आहे. तो संदर्भ असा ....

**कलौदोषनिधे राजन अस्तिही एको महान गुण: ॥**
**कीर्तनात एव कृष्णस्य मुक्तसङ्.ग परं व्रजेत् (भाग१२/३/५१)**

**अर्थ –** '' हे राजा, कलियुग हा पापांचा सागर आहे खरा पण त्यात एक महान गुण आहे तो असा की, ह्या कलियुगात केवळ कृष्णाच्या गुणांचे संकीर्तन केल्याने मनुष्याची सर्व बंधापासून मुक्तता होऊन त्याला परमपदाची प्राप्ती होईल.''

म्हणून कृष्णविचार, कृष्णभक्ती, कृष्णनीती याची आज सर्वांनाच गरज आहे. प्रेमभक्तीनेच धर्माधर्मातील तेढ, द्वेष संपेल व दुष्टतेचा सर्व सज्जनांनी एकत्र येवून जोरदार प्रतिकार केला तर शांती, सुख याचा अनुभव समाजाला घेता येईल.

# भारताला कृष्णनीतीची गरज – (२)

भारताला कृष्णनीतीची म्हणजे कृष्ण–विचारांची गरज आहे. राम व कृष्ण हे भारतमातेचे हृदय आहे. प्रत्येक भारतीयाच्या श्वासात राम व कृष्ण आहेत. दोघेही या भूमीत जन्मले. या भूमीत वाढले. या भूमीतच आपले अवतार कार्य पूर्ण केले. व इथेच पंचमहाभूतांचा पण दिव्य शक्तीचा देह विसर्जित केला. राम मर्यादा पुरुषोत्तम होता व कृष्ण पुरुषोत्तम, पूर्णावतार होता. एकाने कुटुंबातील नाती कशी असावीत याचा आदर्श सर्वांसमोर ठेवला व दुसऱ्याने चारी पुरुषार्थाचा ..... धर्म, अर्थ व काम व मोक्ष यांचा आदर्श ठेवला. आपल्या दिव्य अवतार कार्यासाठी भारताचा भूप्रदेश निवडला. देवांना आवडणारी भूमी म्हणून या भारतमातेचा आपल्याला गर्व वाटला पाहिजे. राम व कृष्ण या दोघांनीही आपल्या तत्वज्ञानाप्रमाणे प्रत्यक्ष जगून दाखविले. आपल्यासमोर कसे जगावे याचा वस्तुपाठ ठेवला. कोणतीही शंका, संदेह, प्रश्न मनात राहूच शकत नाहीत, इतके स्पष्ट, स्वच्छ, स्फटिकासारखे निरभ्र असे जीवन आपल्यासमोर ठेवले. आतापर्यंत आपण कृष्णाच्या जीवनाचे विविध पैलू, त्याच्या तत्वज्ञानाचा थोडा–अधिक भाग

आपण अभ्यासला. ज्या गुणांनी व विचारांनी कृष्णाने क्रांती केली, संपूर्ण राजकीय, सामाजिक व आध्यात्मिक परिस्थिती बदलून टाकली, नव्या पण सनातनच मूल्यांना पुनर्स्थापित केले. असुरी शक्तींचे निर्मूलन करुन सत्य धर्माची स्थापना केली. पांडवांचे म्हणजे सत्प्रवृत्त, नीतीमान लोकांच्या हातात राजकीय सत्ता सोपविली व स्वत: अनासक्त राहून सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा किर्ती यापासून दूर राहिला. त्या कृष्णांच्या गुणांचे व विचारांचे चिंतन करुन ते गुण प्रत्यक्ष आचरणात आणण्यासाठी आपण निश्चित काय केले याचे आत्मपरीक्षण प्रत्येक राम व कृष्ण भक्ताने करण्याची वेळ आली आहे. आपण स्वत:ला कृष्ण भक्त म्हणून घेतो मग आपण केलेली कर्मे भगवंताला आवडली असतील का ? याचा विचार व निर्णय आपण कधी घेतला का ?

पाश्चात्याकडून एक प्रश्न नेहमी विचारला जातो की, भारत ही अध्यात्मिक भूमी असून सुद्धा इतका दुराचार, भ्रष्टाचार, अनाचार, बलात्कार, स्त्रीजातीवर अत्याचार का ? या देशातील अज्ञान, दारिद्र्य का मिटत नाही ? भौतिक विकास हा होत नाही ?

भारताने जगाचा अध्यात्मिक गुरु व्हावे अशी इच्छा धर्मगुरु राजकारणातील नेते, हिंदूप्रेमी, असे सर्व जण करीत असतात पण भारतीयांकडे पाहिल्यानंतर वरील प्रश्न जर विचारले तर ते आपण नाकारणार आहोत का ?

आपली संस्कृती अतिप्राचीन आहे. एके काळी समाज प्रगतीच्या अत्युच्य शिखरावर होता. भारतीयांचा तो सुवर्णकाळ होता. आपल्या ऋषीमुनींनी भौतिक शास्त्रातील अनेक सिद्धातांची उकल केली होती. शून्याचा शोध, खगोलशास्त्र, आयुर्वेद.... अशा अनेक शास्त्रात आपण प्रगती केली होती. कणादासारख्या ऋषींनी वैज्ञानिकांचे व शास्त्रज्ञांचेच काम केले. आपले अध्यात्मिक तत्वज्ञान ज्या वेदांतून प्रकट झाले आहे ते आपण अपौरुषेय असे मानतो. वेद हे ईश्वराचे नि:श्वास आहेत, अशी आपली श्रद्धा आहे. वेदातील ज्ञानकांड म्हणजे उपनिषदे ही तत्वज्ञानाने भरलेली आहेत. ते तत्वज्ञान भौतिक विकास व अध्यात्मिक विकास या दोन्ही पातळ्यावर आजही जगांनी स्वीकारण्यासारखेच आहे. ही आपली गौरवशाली संस्कृती



आहे याचा निश्चित अभिमान पाहिजे.

पण गेल्या हजार वर्षात आपली स्थिती काय होती ? सिकंदराने भारताचा प्रचंड भूप्रदेश जिंकला. मोगलांनी या देशाला लुटून नेले. चंगीजखान, बाबर अशा आक्रमकांनी इथली संपत्ती आपल्या देशाला नेली. इथली राज्ये स्वतंत्र होती. अखंड देश नसल्यामुळे मुसलमानांना इथे राज्य करणे जमले. कारण संस्थानिकांनी फक्त आपल्या पुरते पाहिले. मूठभर इंग्रजांनी व्यापाराच्या निमित्ताने येवून आधुनिक शस्त्रास्त्रांच्या जोरावर हिंदुस्थानावर राज्य केले. सर्व भारतीय एकाच वेळी थुंकले तर इंग्रज बुडून जातील असे लोकमान्य टिळक म्हणायचे. इंग्रजांनी दीडशे वर्षे राज्य केले व उरलेली सर्व संपत्ती लुटून नेली. आपला कोहिनूर हिरा व छत्रपती शिवाजींच्या काळातील शस्त्रास्त्रे लंडनच्या म्युझियममध्ये दिमाखाने तळपत आहेत व आपण भारतीय युरोपच्या दौऱ्यात लंडनच्या म्युझियमला भेट देवून ती गौरवाने पाहात असतो. हजार वर्षाच्या गुलामगिरीत आपण आपले स्वत्व हरवून बसलो होतो, स्वाभिमानी भावनाच विसरुन गेलो होतो.

पण या देशाच्या संस्कृतीचा, अध्यात्माचा पराभव कोणीही करु शकले नव्हते. प्रत्येक प्रांतातील संत महात्म्यांनी, ऋषी-मुनींनी हे अध्यात्म व संस्कृती इथल्या पिढ्यानपिढ्यामध्ये रुजविली. या संतांनी आसेतु हिमालय, राम-कृष्णाच्या कथा, वेद-उपनिषदांचे तत्वज्ञान याचा प्रचार प्रसार केला. यासाठी त्या त्या प्रांताच्या भाषांमधून यावर काव्ये-कथानके-नाटके लिहीली. उत्तरेकडे जसे कबीर झाले तसे आपल्याकडे संत तुकाराम. दोघांच्या उक्तीत कमालीचे साम्य. दोघेही परखड लिहीणारे. आपल्याकडे जशी मातृह्रदयाची माऊली ज्ञानेश्वर झाले तसे तामीळनाडूमध्ये अलूरवायूर होऊन गेले. दोघांनीही आपल्या रसाळ काव्यातून भरभरुन जगाला तत्वज्ञान दिले. ज्ञानेश्वरांनी फक्त कृष्णाची गीता निवडली. व संस्कृतमधील सातशे श्लोकांचा अर्थ नऊ हजार ओव्यांमध्ये मराठीतून सामान्य लोकांसाठी लिहीला. तीच ज्ञानेश्वरी-भावार्थ दिपीका ! सूरदास जसे झाले तसे गुलाबमहाराज. अंध असूनही दोघांनीही विपुल तत्वज्ञानपर रचना केल्या. हिंदुस्थानाच्या काना-कोपऱ्यात याचे श्रवण, कीर्तन, भजन, प्रवचन या स्वरुपात लोकशिक्षण व्हायचे. जीव,

जगत्, जगदीश्वर यासह जन्म–मृत्यू, जीवन, परलोक पुरुषार्थ अशा सर्व घटकांचे ज्ञान त्यांना मिळायचे.

याचा परिणाम असा झाला की, हिंदूंची मंदिरे जमीनदोस्त केली; देवाच्या मूर्ती फोडून टाकल्या, मंदिराचे शिल्प विद्रूप करुन टाकले; मंदिराची संपत्ती, वैभव लुटून नेले व अमानुष छळ करुन इथल्या स्त्रीयांवर अत्याचार केले. मृत्यूची भीती घालून धर्मांतर केले. मोगल कारकीर्दीत हा टोकाचा छळ झाला तर ब्रिटीश मिशनऱ्यांनी इथल्या दारिद्र्य व अज्ञानाचा फायदा घेऊन सेवेच्या निमित्ताने धर्मांतर केले. चर्चेस बांधले. हिंदूच्या सहिष्णूतेचा, उदारतेचा फायदा घेऊन धर्म व संस्कृती नष्ट करण्याचा सर्वोतोपरी प्रयत्न केला. याच्या उलट हिंदूनी आपल्या संस्कृतीच्या इतिहासात कोणावरही कधीही आक्रमण केले नाही. कोणाचेही धर्मांतर केले नाही.

केवळ अध्यात्मामुळे या देशाचे पूर्ण धर्मांतर होऊ शकले नाही ही वस्तुस्थिती आहे. यामुळेच प्रत्येक भारतीयाच्या हृदयात असलेल्या राम–कृष्णाला मिटविता आले नाही. भूप्रदेश जिंकला पण इथल्या मातीच्या कणाकणात असलेल्या अध्यात्म्याला संपविता आले नाही. अध्यात्मामुळे संस्कृती, धर्म, देश अबाधीत राहिला. व स्वातंत्र्यही.

ज्या राष्ट्रपिता महात्मा गांधीनी देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्यात सर्वात मोठा उचलला. त्यांनी आपल्या जीवनात भगवद्गीतेला आई मानले. गीतेच्या विचारानुसार जीवन जगले. त्यांनी आपल्या आत्मचरित्रात लिहीले आहे की, जेव्हा जेव्हा जीवनात मला काही समस्या आल्या तेव्हा मी गीता हातात घेत असे व माझ्या समस्यांचे निराकारण गीता करीत असे. सत्य, अहिंसा, प्रेम ही तिन्ही महान मूल्ये गांधीजींनी गीतेच्या १६ व्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकातून स्वीकारली होती. गीतेतील अनासक्ती वर गांधीजींनी स्वतंत्र पुस्तक लिहीले. सर्वयोगामध्ये अनासक्ती त्यांना आवडली. त्याचप्रमाणे ते प्रत्यक्ष जगले.

स्वातंत्र्य प्राप्तीनंतर, राज्यकर्ते गांधी व गांधींच्या तत्वज्ञानाला विसरले. संस्कृती, परंपरा, धर्म हे सर्व सर्वधर्मसमभाव या नीतीला मारक ठरु लागले. त्यामुळे अध्यात्म्याची पिछेहाट झाली. वास्तवातील हिंदू धर्म हा मूळातच ही



नीतीच नव्हे, तर विश्वकर्म, विश्वबंधुत्व मानणारा असून सर्वसमावेशक आहे हे सोयिस्करपणे विसरले.

यामुळे कृष्णविचार फक्त प्रवचनापुरताच मर्यादित राहिला. भागवत व रामायण यांच्या रसाळ कथातून राम व कृष्णाचे जीवन समजले पण तत्वज्ञान मागे पडले. भगवद्गीता हा जीवनग्रंथ असून तो आचरण्याचा ग्रंथ आहे. ते उपनिषदांचे सार आहे. प्रत्यक्ष भगवंताची वाणी आहे. भगवंताला आवडणारी भक्ती त्यात आहे. आणि त्या कृष्णविचारांनी आपले जीवन बदलू शकते व ते तेजस्वी बनू शकते याचा विसरच पडला.

त्यामुळे भक्तीचा मळा फुलला. मंदिराची श्रीमंती अतोनात वाढली. तीर्थक्षेत्रे भरभरुन गेली. कर्मकांडांना ऊत आला. श्रद्धा व अंधश्रद्धा यातील सीमारेषा अधिक अस्पष्ट झाली. नागबळी, कालसर्प अशा कर्मकांडातून कोट्यावधींचे व्यवहार घडायला लागले. पूर्वजांच्या आत्म्याला सुख लाभते, की नाही यापेक्षा. यातल्या दलालांना आर्थिक लाभ होत असल्याने त्यांना मात्र सुख मिळते हे निश्चित. कोणतेही शास्त्रीय तत्व या कर्मकांडात नाही. सरकारने अंधश्रद्धा व त्यातील गैरप्रकार बंद करण्यासाठी क़ायदा केला पण बळी देण्याचे प्रकार थांबले नाहीत.

वैदिक काळामध्ये सुद्धा यज्ञ व कर्मकांड यांचा अतिरेक जेव्हा झाला तेव्हा ज्ञानकांडाला महत्त्व प्राप्त झाले. कर्मक़ांड व यज्ञसंस्था यातून निर्माण झालेली बहिर्मुख वृत्ती जाऊन उपनिषदातील ज्ञानाने अंतर्मुख वृत्ती व्हायला लागली.

आज पुन्हा हीच स्थिती निर्माण झाली आहे. प्रत्यक्ष उपनिषदे, गीता, ब्रह्मसूत्रे हे सर्व ज्ञानभांडार बाजूला सारुन अंधश्रद्ध होऊन केलेल्या कर्मकांडातून हाती काहीच लागत नाही. अज्ञानापोटी केलेल्या या विधीमुळे अंधश्रद्धेचा बाजार तेवढा मांडला आहे.

हिंदूधर्मातील या हिणकस गोष्टी दूर होऊन हिंदू धर्माचे शुद्धीकरण होणे ही काळाची गरज आहे. आपल्या धर्मातील जातीव्यवस्था पूर्णपणे मिटली पाहिजे. यालाच कंटाळून लाखो लोकांनी बौद्ध धर्म स्वीकारला. डॉ. आंबेडकर यांनी इतर कोणता धर्म न स्वीकारता बौद्ध धर्म स्वीकारला हे

हिंदूधर्मावर उपकारच केले असे म्हटले तर काय वावगे आहे ? जाती जेव्हा जन्मावरुन ठरु लागल्या, तेव्हा गुणकर्मानुसार जातीव्यवस्था ही गीतेची संकल्पना मागे पडली. २१ व्या शतकात स्पृश्य–अस्पृश्य हा भेदाभेद संपुष्टात आला नाही तर समता, बंधूता, प्रेम ही मूल्ये केव्हा आचरणात येणार ? शतकानुशतके अस्पृश्य म्हणविणाऱ्यांनी खूप सोसले. आता मात्र काळ आपल्याला माफ करणार नाही. सर्वजण भगवतांची लेकरे आहोत हे गीतेचे तत्वज्ञान कोणत्या तोंडाने जगाला सांगणार ?

म्हणून हिंदूनी ही जातीयता नष्ट करण्यासाठी इतर जमातींमध्ये विश्वास निर्माण केला पाहिजे. स्वातंत्र्याची फळे सर्वांना समान पद्धतीने मिळण्याची व्यवस्था निर्माण झाली पाहिजे. आजच्या राजकर्त्यांनी ''सबका विकास सबके साथ'' या कृष्ण विचाराची घोषणा करुन सर्व धर्मीयात सौहार्द निर्माण केला आहे. हे जेव्हा प्रत्यक्षात उतरेल त्यावेळी हिंदू धर्माचा, तत्वज्ञानाचा उधोउधो होईल. जगाला देण्यासारखे निश्चित आपल्याकडे काही असेल यात शंका नाही.

आज स्त्रियांनी सर्वच क्षेत्रात आपल्या कर्तृत्वांनी प्रचंड कामगिरी केली आहे. पुरुषांच्या बरोबरीने सर्व क्षेत्रात आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटवला आहे. प्राचीन ऋषी काळात वैदिक स्त्रीयांनी, उदा. गार्गी, मैत्रेयी, अनुसूया अशा स्त्रियांनी ज्ञानाच्या क्षेत्रात खूप मोठी कामगिरी केली. हे जरी खरे असले तरी अजूनही स्त्रीयांना शिक्षणापासून वंचित ठेवले जाते. अज्ञानातील स्त्रियांना मग रिती–रिवाजांच्या शृखंलात बांधले जाते. अजूनही हुंडाबळीचे प्रमाण कमी झाले नाही. कायद्याने समान हक्क मिळाले असले तरी ते हक्क प्रत्यक्षात कुठे मिळतात ? प्रगत राष्ट्रांच्या मानाने, आपल्या देशात स्त्रीयांना अबला म्हणूनच मागे ठेवले जाते. बालविवाहांचे काही राज्यातले प्रमाण निश्चितच चिंता करण्यासारखे आहे. चूल नि मूल या चक्रात सापडलेल्या स्त्रियांना विचार प्रकट करण्याचे सुद्धा स्वातंत्र्य नाही. मागासवर्गीय गरीब वर्गातील स्त्रीयांना आपल्या हक्कांची सुद्धा जाणीव नाही. स्त्रीयांचे सबलीकरण करणे ही सर्वांचीच जबाबदारी आहे.

भारतीय स्त्रीला अध्यात्म्यात मोठे स्थान दिले. जिथे स्त्रीयांची पूजा



केली जाते. तेथे देवतासुद्धा वास करत असतात असे म्हणून तीला देवतेचे स्थान देण्यात आले आहे. पण प्रत्यक्षात बंड, क्रांती करणाऱ्या दुर्गा, काली, अंबा का दिसत नाहीत ? महाभारतात काही स्त्रियांचे स्फूर्तीदायक चरित्रे आली आहेत. स्त्रीयांना अत्यंत मानाचे स्थान देवून त्यांचा यथोचित गौरव केला आहे. सुभद्रा, सत्यभामा, कुंती, द्रौपदी, रुक्मिणी, देवकी, यशोदा अशा स्त्रियांना त्यांच्यातील शौर्य, कौशल्य दाखविण्यासाठी कृष्णाने प्रोत्साहित केले. त्यांचे हक्क त्यांना बहाल केले. शासन पातळीवर आज या स्त्री सबलीकरणासाठी उत्तम प्रयत्न होत आहेत पण सामाजिक व धार्मिक पातळीवर हे प्रबोधनाचे काम मोठ्या प्रमाणावर होणे गरजेचे आहे. यासाठी पुरुषांची मानसिकता व धर्मातील चुकीच्या रुढी–परंपरा बंद करण्याची वेळ आली आहे. शिक्षणाचा खालच्या थरापर्यंत जर प्रसार झाला तर हे परिवर्तन खूप लवकर घडेल. औद्योगिक, आय टी, स्पर्धात्मक परीक्षा, परदेशी शिक्षण, शासन व्यवस्थेत मानाची पदे, धर्मातील प्रबोधनाचे कार्य, वैदिक पूजा कर्मक़ांडे यात प्रत्यक्ष सहभाग अशा विविध क्षेत्रात स्त्री पुढे येत आहे हे चित्र आशादायक आहे. गंगा, गाय व गौरी यांच्या रक्षणासाठी सर्व स्तरावर क्रांतिकारक पावले उचलली जात आहेत. गंगा स्वच्छतेसाठी कोट्यावधी रुपये खर्च करण्याची शासनाची तयारी आहे. स्वत: पंतप्रधान या स्वच्छतेच्या कामात झोकून देत आहेत. देशातील सर्व क्षेत्रातील आघाडीच्या कर्तृत्ववान लोकांना या सर्व उपक्रमात सहभागी करुन समाजाला प्रेरित करण्याचे प्रयत्न होत आहेत. स्वच्छता देश पातळीवर जर घडली तर गांधीजींचे स्वप्न तर पूर्ण होईलच पण जागतिक पातळीवर देशाचा गौरव वाढेल हे निश्चित. गाय म्हणजे गोमाता. कृष्णाने गायीवर अपार प्रेम केले. गोवर्धन पूजेने गायीचे माहात्म्य सिद्ध केले. गाय ही कल्पवृक्षासारखी आहे. गायीचे दूध हे अमृतासारखे आहे. तिचे मूत्र विविध रोगावर गुणकारी असल्याचे संशोधनाने सिद्ध झाले आहे. तिच्या दूधात अत्यंत आरोग्यकारक घटक आहेत यावरही प्रचंड संशोधन झाले आहे. वैदिक काळात गाय ही मोठी संपत्ती होती. गो–धन ज्याच्याकडे जास्त तो खरा सधन असे मानले जायचे. कृष्णाच्या बासरीच्या आवाजाने गायी कृष्णा मागून यायच्या. आज देशाला हे गोधन मोठ्या प्रमाणात असण्याची गरज आहे. गायीचे दूध,

लोणी, तूप, मूत्र हे आरोग्य व संपत्ती या दृष्टीने महत्त्वाचे असल्याने गायींची जितकी संख्या अधिक वाढेल, तेवढा देश अधिक संपन्न होईल. शेतकरी, साधू-संन्यासी यांनी या पवित्र कार्यात सर्व शक्तीनिशी झोकून दिले आहे ते याचसाठी.

गौरी म्हणजे स्त्री. याविषयी आपण खूप चर्चा केली. म्हणून गाय, गंगा व गौरी यांचे सर्व प्रकारे उत्थान होणे; यात आपल्या देशाचा गौरव आहे.

धर्माने संपत्तीला चार पुरुषार्थात स्थान दिले आहे. जी संपत्ती नीती व धर्म याला अनुसरुन मिळविली जाते. तिला लक्ष्मी म्हटले जाते. व जी गैरमार्गाने येते तिला अलक्ष्मी असे शास्त्रात म्हटले आहे. लक्ष्मी पुढील दाराने वाजतगाजत येते व अलक्ष्मी मागील दाराने गुपचूप येते. लक्ष्मी घरात सुख, शांती, समाधान देते व अलक्ष्मी घरातील शांती, सुख नष्ट करते. श्री. सुक्तामध्येही असेच वर्णन आहे. म्हणून भगवंताने लक्ष्मीला श्रेष्ठ मानले आहे. कृष्णाने सुद्धा ''धर्माविरुद्धो भूतेषु कामो स्मि भरतर्षभ'' असे म्हणून लक्ष्मीचा गौरव केला आहे. जी धर्म, नीतीला अनुसरुन मिळवली जाते ती लक्ष्मी.

असे असूनसुद्धा हे धर्माचरण का होत नाही ? या अलक्ष्मीने म्हणजे काळ्या पैशाने देशाला पोखरुन टाकले आहे. आपल्याच नव्हे तर सर्वच देशांना या भस्मासुराने घेरले आहे. पण आपल्या देशात या भ्रष्टाचाराला ऊत आला आहे. अलिखित कायदा असल्याप्रमाणे प्रत्येक कामात काहीतरी चिरीमिरी घेतली जाते. देणारा अगतिकपणे देतो पण तोही गुन्हेगार व घेणारा त्यापेक्षा अधिक गुन्हेगार. राजनीतीमध्ये भ्रष्टाचाराने कहर केला आहे; कालच एक वार्ता होती. महाराष्ट्राच्या जलखात्याच्या मंत्र्याने पत्रकार परिषदेत सांगितले की, मागील सरकारच्या जलखात्याच्या दोन मंत्र्यांनी कंत्राटदारांकडून (२२%) बावीस टक्के असे कमिशन घेऊन सर्व कामे दिली. राजकारणातून संपत्ती म्हणजे सत्तेतून संपत्ती व संपत्तीतून सत्ता हे दुष्टचक्र झालेले आहे. मग मिळालेली अगणित सपंत्ती ठेवायची कुठे ? यासाठी स्विझर्लंडसारख्या प्रामाणिक देशात हा काळा पैसा ठेवायचा हा राजमार्ग !

या संपत्तीसाठी गुन्हेगारी वाढलेली आहे. दरोडे, खून, अनैतिक



व्यवहार, विनाशकारी ड्रग्जचा व्यापार, धान्य, औषधे अशा जीवनावश्यक वस्तूमध्ये भेसळीचे प्रमाण, कमीत कमी, मुदतीमध्ये दुप्पट, तिप्पट पैशाचे आमिष अशा अनेक मार्गाने संपत्ती मिळविली जाते.

धन ही अशी वस्तू आहे की ती कितीही मिळाली किंवा मिळविली तरी समाधान, तृप्ती कधी होत नाही. काम, क्रोध ही तीन नरकाची द्वारे आहेत. असे गीतेत म्हटले आहे. धन मिळविताना कुठे थांबावे हे ज्याला समजत नाही तो स्वतःचा आत्मनाश करुन घेतो. अशी माणसे धनाचा केवळ संग्रह करुन त्याचा भोग न घेताच जगातून निघून जातात. मग वारसांना आयती संपत्ती मिळते. विनासायास मिळालेल्या धनाचा वापरही चुकूनच बुद्धी व संयमाने होतो. शासनाने कठोर पावले उचलून हा अधर्म संपविला पाहिजे. यासाठी सर्व प्रकारे साम, दाम, दंड ही नीती वापरुन परदेशातून काळा पैसा आणावा व भ्रष्टाचार संपवावा.

## शिक्षण व अध्यात्म

ब्रिटिशांनी या देशात मेकॉलेची शिक्षणपद्धती सुरु केली व देश आपला आत्माच हरवून बसला. या शिक्षण पद्धतीत ब्रिटिशांना हवे असलेले कारकून निर्माण करण्याची शिक्षण रचना होती. आपल्या सरकारने स्वातंत्र्य प्राप्तीनंतर यात काही आमूलाग्र बदल केला नाही. आता मात्र या बदलाचे वारे वाहू लागलेत.

शिक्षण म्हणजे केवळ माहिती ज्ञान होते. कृष्णाने गीतेत ज्ञानाची स्पष्ट व्याख्याकेली आहे. तेराव्या अध्यायात ज्ञानासाठी लागणाऱ्या वीस गुणांचे वर्णन केले आहे. असे गुण जितके आचरणात येतील तितका तो ज्ञानी (१३.७ ते ११ श्लोक). अठराव्या अध्यायात सात्विक ज्ञानाची व्याख्या केली आहे. कृष्ण म्हणतात, ''निरनिराळ्या सर्व भूतमात्रात, एकच अविभक्त व अव्यय भाव किंवा तत्व आहे, असे ज्या ज्ञानाने कळते ते सात्विक ज्ञान आहे.'' (१८.२०) कृष्णाने ज्ञान सांगताना, व्यक्तींच्या सर्वांगीण उन्नतीसाठी लागणाऱ्या दैवी गुणांचा म्हणजे श्रेष्ठ जीवनमूल्यांचा उल्लेख केला आहे.

आज हीच समस्या आहे की, उच्चविद्याविभूषित एखादा इंजिनिअर किंवा डॉक्टर माणुसकीला काळिमा फासणारे उद्योग करत असेल तर त्या ज्ञानाचा काय उपयोग ? विद्येबरोबर नैतिक आचरणाचे शिक्षण नसेल तर आत्मिक उन्नती होणार कशी ? आर्थिक भ्रष्टाचार, लैंगिक अत्याचार जर शिक्षित लोकांमध्ये दिसत असेल तर त्या शिक्षणाचा काय उपयोग ?

म्हणून डॉ. राधाकृष्णन् व माजी राष्ट्रपती डॉ. अब्दुलकलाम यांनी शिक्षणात अध्यात्माची साथ पाहिजे; शिक्षण व अध्यात्म याबरोबर विज्ञान व अध्यात्म हेही एकत्र शिकविले पाहिजेत. असा जन्मभर आग्रह धरला. डॉ. राधाकृष्णन् यांनी शिक्षणाची व्याख्या करताना म्हटले आहे, ''जे मनुष्याच्या मन, बुद्धी व हृदय यांचा विकास साधते ते शिक्षण.'' डॉ. कलाम यांनी शिक्षणात अध्यात्म म्हणजे नीतीमूल्ये व भौतिक विकास यांचे ऐक्य साधले पाहिजे असा आग्रह धरला. या संकल्पना स्पष्ट करण्यासाठी त्यांनी पुस्तके लिहीली. देशभर व्याख्याने दिली.

शिक्षणात हल्ली मूल्यशिक्षणाचा अभ्यास क्रम ठेवला आहे. आता योग शिक्षण सक्तीचे केले पाहिजे अशी सक्त मागणी पुढे येत आहे. जगातील एकशे ऐंशी देशांनी योगशिक्षण देण्याचे मान्य केले आहे. युनोमध्ये तसा एकमताने ठराव पास झाला आहे. पण योगाची जन्मभूमी असलेल्या आपल्या देशात यावर फक्त चर्चा चालू आहे.

## व्यवस्थापन - अर्थनीती - राजनीती

कृष्णाच्या संपूर्ण जीवनाचे अवलोकन केल्यानंतर आपण स्तिमीत होतो. त्याने आर्थिक, सामाजिक, राजकीय व अध्यात्मिक क्षेत्रात पाच हजार वर्षापूर्वी जे अभूतपूर्व कार्य केले ते आजच्या प्रगत समाजाला सुद्धा अनुकरणीय असेच आहे. स्वत: परिपूर्ण पुरुष असल्याने त्याला हे करणे सोपे झाले. लहान मोठी राज्ये जिंकली पण जिंकल्याबरोबर वेळ न घालविता ती ताबडतोब योग्य माणसांच्या हाती सुपूर्द केली. सर्वांची निवड अचूक ठरविली. प्रत्येक ठिकाणी सत्ता, संपत्तीपासून स्वत:ला अनासक्त, अलिप्त ठेवले. केवळ जनतेच्या कल्याणाचा विचार केला. राज्यप्रमुख कसा असावा



याचे आदर्श उदाहरण म्हणजे कृष्ण ! स्वत:चे व्यक्तिमत्व चतुरस्त्र बनविले. सर्व वर्णांच्या कार्याचा स्वत: अनुभव घेतला. ब्राह्मणासारखे ज्ञानाचे कार्य केले. गीतेच्या रुपात तत्वज्ञान सांगितले व त्या तत्वज्ञानाप्रमाणे आपले आचरण ठेवले. दैवी गुणांचे वर्णन करताना ''निर्भयता'' या गुणाला सर्वश्रेष्ठ स्थान दिले. आयुष्यभर कृष्ण निर्भयतेने जगला. गोकुळात असताना गोकुळवासियांना या निर्भयतेनेच त्यांचे रक्षण केले. कालिया सारखे इतर राक्षसी प्रवृत्तींच्या असुरांना ठार केले. मथुरेत कंसाचा वध करुन मथुरावासियांना भीतीमुक्त केले. जरासंधाच्या पाठीमागे प्रचंड ताकद होती पण भीमाच्या साहाय्याने त्याला यमसदनी पाठविले. क्षत्रियासारखे शौर्य दाखविले. सज्जनांच्या रक्षणात कृष्ण कुठेही कमी पडला नाही. हे कृष्णाचे जीवीत कार्यच होते. वैश्याप्रमाणे द्वारका सुवर्णनगरीचे निर्माण केले. संपत्तीचे वाटप केले. पांडवांना इंद्रप्रस्थ नगरीसाठी आर्थिक साहाय्य केले व राजांचा महाराजा असून राजसूय यज्ञाच्या वेळी पत्रावळ्या देखील काढल्या. याचा अर्थ राजकीय प्रमुखाला समाजातील सर्व थरातील लोकांच्या सुखदु:खाचा विचार पाहिजे. सर्वांना बरोबर घेऊन सर्वांसाठी काम करण्याची नीती पाहिजे. म्हणूनच नव्या पंतप्रधानांनी कृष्णाचा विचार घेऊन निवडणूकीत प्रचंड यश मिळविले. ''सबका विकास सबके साथ'' ही घोषणा सर्व गरीब श्रीमंताना, सर्वधर्मीयांना, सर्ववर्णियांना आश्वासक वाटली. स्वातंत्र्यानंतर पहिल्यांदाच या नीतीचा प्रत्यक्ष अवलंब होत आहे. आपल्या पंतप्रधानांनी कृष्णाची गीता जगातील दोन राष्ट्रप्रमुखांना अमूल्य भेट म्हणून दिली याचे कारण. गीतेचा त्यांच्या स्वत:च्या जीवनावर असलेला प्रभाव. आपल्या सर्व कार्यात असलेली सर्वसमावेशकता, उदारता, लवचिकता हे कृष्णनीतीचे सार आहे. जेथे जाईल तेथे कृष्णाने याच नीतीमुळे विजय मिळविला. लहान छोट्या छोट्या राजांचे संघटन करुन, शक्तिशाली असुरी शक्तीशी यशस्वी लढत दिली. प्रसंगी 'रणछोडदास' होऊन मथुरावासियांचे कल्याण केले. दुर्योधनाचा दुष्ट असुरी वृत्तीला शह देण्यासाठी भीष्म, द्रोण, कर्ण यांना पांडवांची सत्य बाजू घेण्यासाठी परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. परिणाम एवढाच झाला की, निदान त्यांची आक्रमकता बोथट झाली. कर्णाने ब्रह्मास्त्राचा वापर अर्जुनावर केला नाही. मला आठवण होते ती, आपल्या परराष्ट्र

राजनीतीची सतत आक्रमण करणाऱ्या व दहशतवादाला उघड पाठिंबा देणाऱ्या पाकिस्तानविरुद्ध प्रभावी राष्ट्रांचे जनमत तयार केले, काश्मीर प्रश्नावर पाकिस्तानला बोलणे अवघड करुन टाकले. कृष्णाने आपल्या राजनीतीमध्ये याच नीतीचा वापर केला.

सर्व काही करायचे पण सर्वांतून अलिप्त राहायचे व मिळालेले श्रेय हे सर्व जनतेचे आहे असे मानून अनासक्त रहायचे ही कल्याणकारी कृष्णनीती आज प्रभावी ठरत आहे. कर्मयोगी असाच असावा हे पुन्हा पुन्हा कृष्णाने गीतेत सांगितले आहे. ''सततं कार्यं कर्म समाचर'' पण निर्मोही, निरहंकारी, निर्भय व अनासक्त होवून हा कृष्णमंत्र आहे. कृष्णाने भक्तीच्या तीन योगांचा गीतेत समन्वय केला आहे. अशा समन्वयानेच कृष्ण आपले जीवन जगला. मानवी पातळीवरुनच हे त्यांनी जगून दाखविले. कृष्ण जीवनाकडे पाहताना विष्णूचा अवतार म्हणून पाहिले की, आपली विचारधारा व दृष्टी बदलते. आपल्या दैवी शक्तीचे प्रकटीकरण त्याने चमत्कारासाठी कधी केले नाही. अवतार कार्य केले ते मानवी पातळीवरुन.

तिन्ही योगांचा समन्वय जर योग्य पद्धतीने झाला नाही तर आपण कोणत्याही क्षेत्रात असू पण त्यात पूर्णत्व येत नाही. कृष्णाने आपल्या सर्व कार्यातून या समन्वयाचा आदर्श जगासमोर ठेवला आहे. कोणतेही कर्म करीत असताना फळाची अपेक्षा केली नाही. भक्ती म्हणजे प्रेम या संकल्पनेप्रमाणे गोकुळच्या गोप-गोपीपासून पांडव व यादव यांच्यावर मनापासून प्रेम केले. त्याच्या ज्ञानयोगाचे उत्तम उदाहरण म्हणजे अर्जुनाला निमित्त करुन जगाला दिलेले ज्ञान.

भीष्म व द्रोण यांचे पांडवावरही प्रेम होते. पण ते कृतीतून व्यक्त करण्याऐवजी चुकीच्या हेतूने कौरवांची बाजू घेतली. त्याच्या उलट अक्रूर, विदूर अशांनी न्याय व नीतीची बाजू घेतली. युधिष्ठीराने शकुनी व दुर्योधनाचे पाताळयंत्री कारस्थान, भावनेच्या आहारी जाऊन जाणले नाही. व्यावहारिक पातळीवरील ज्ञानाने सुद्धा हे जाणून द्यूत खेळले नसते. धृतराष्ट्र आपल्या फसव्या व बेगडी प्रेमाने युधिष्ठीराला जाळ्यात ओढत होता. याचीही जाणीव त्याला झाली नाही.



आजच्या काळात व्यवहारामध्ये सुद्धा या समन्वयाची नितांत गरज आहे. विशेषत: व्यवस्थापकीय नेतृत्व व उद्योग क्षेत्रात ही समन्वयाची परिभाषा परिणामकारक ठरु शकते. कृष्णाचे सर्वांत मोठे कार्य म्हणजे महाभारताचे युद्ध ! या युद्धात अर्जुनाच्या रथाचेच नव्हे तर संपूर्ण युद्धाचे सारथ्य, नेतृत्व कृष्णाने केले. युद्धाचा हेतू पवित्र होता. त्यामुळे व्यूहरचना करताना मनात काहीही शंका नव्हती. दुष्टांचा पराभव ह्या ध्येयसिद्धीसाठी कोणताही विधी निषेध बाळगण्याची गरजच नव्हती.

अशाच युद्धनीतीने शिवाजी महाराजांनी मोंगलाशी यशस्वी टक्कर दिली. आजसुद्धा दहशतवादासारख्या समस्यांना तोंड देण्यासाठी या कौशल्याची गरज आहे. आपण हिंदू धर्मातील अंधश्रद्धा, कर्मक़ांड यावर चर्चा केली. प्रत्येकाने आपल्या जीवनात हा समन्वय जर साधला तर उत्तम प्रकारची विहीत कर्मे स्वधर्मानुसार होतील. ती कर्मे भगवंताला अर्पण करण्याच्या श्रद्धेने व निष्ठेने, समर्पित भावनेने केल्यामुळे शुद्ध व पवित्र असतील. त्यामुळे उत्तम भक्तीयोग साधला जाईल. कर्म व भक्ती याला ज्ञानाची जोड मिळाली तर त्यात हिणकस दोष काहीच राहणार नाहीत.

व्यवस्थापन कौशल्यात आजकाल योग, ध्याने हे शिकविले जाते. बुद्धीची स्थिरता, ताण-तणाव विरहीत अवस्था व शारिरीक क्षमतेत वृद्धी यामुळे उत्पादनावर निश्चित परिणात होतो. कर्मातील दोष निघून जातो त्याचा दर्जा, गुणवत्ता हेही सुधारते. याच्या जोडीला जर प्रेमाची, भक्तीची जोड असेल तर मन ओतून काम करणे सहज शक्य होते. व्यवस्थापन आपल्या कल्याणासाठीच कार्य करते हा विश्वास हे प्रेम निर्माण करते. याच्या जोडीला कुशलतेची परिपक्व ज्ञानाची साथ असेल तर त्यात सर्वांचेच हित साधते. कृष्णाने आपल्या सर्व कार्यात असेच व्यवस्थापन केले. सर्वांवर प्रेम केले. स्वत: फलापेक्षा न करता कार्यरत राहिला. राज्ये जिंकली व लोकांचेही प्रेम जिंकले. युद्ध केले ते केवळ सज्ञनांच्या रक्षणासाठी. ही सर्व कार्ये निरपेक्ष भावनेने केली. म्हणून कृष्ण म्हणजे कर्तव्य, ज्ञान, भक्ती, कर्म यांचा पूर्ण आदर्श होता.

# अर्थनीती

कृष्णाच्या अर्थनीतीत धर्म व नीतीचा अधिक संबंध आहे. चार पुरुषार्थापैकी अर्थ हाही एक पुरुषार्थ आहे अशी कृष्णाची धारणा होती. पण हे धन जेव्हा नीतीने मिळविले जाते तेव्हा ते सुखाला कारण होते. ईशावास्यम् उपनिषदात म्हटल्याप्रमाणे, कृष्णाची अर्थ नीती होती.

**ईशावास्यमिदं सर्व यत् किंच जगत्यांजगत् ।**
**तेन त्यवक्तेन भुंजीथा: मा गृध: कस्य स्विद धनम् ।। ईश १ ।।**

''हे जग ईश्वराने वसविलेले आहे. म्हणून त्याच्या नावाने त्याग करुन भोग भोगीत जा. कोणाच्याही धनाविषयी वासना राखू नकोस.''

यामुळे स्वत: कृष्ण संपत्तीच्या बाबतीत अनासक्त होते. पांडवांच्या इंद्रप्रस्थ नगरीसाठी मोठे अर्थसाहाय्य केले. पांडवांच्या राजसूय यज्ञासाठी छोट्या मोठ्या राजांनी दिलेली संपत्ती स्वीकारली. गीतेत जी सात्विक ज्ञानाची व्याख्या केली आहे त्याप्रमाणे ते स्वत: जगले. सात्विक दान म्हणजे जे अनुपकारासाठी देश, काल, पात्र यांचा विचार करुन दिले जाते ते त्यामुळे कुठेही परत फेडीची अपेक्षा त्यांनी ठेवली नाही.

जगातील सर्व संपत्ती ही केवळ परमेश्वराची असल्याने आपण फक्त त्याचे विश्वस्त आहोत ही कृष्णाची धारणा होती. महात्मा गांधींनी या विश्वस्त संकल्पनेचा पुरस्कार केला. म्हणून संपत्ती ही ''सर्व जनाय...'' या हेतुसाठीच वापरली पाहिजे हा गांधीजींचा आग्रह होता.

कृष्णाने द्वारकेसारखी सुवर्णनगरी वसविली पण या नगरीचा कारभार आपल्या मोठ्या भावाकडे म्हणजे बलरामकडे सोपवून स्वत: मात्र अनासक्त राहिला. मथुरा, मगध ही राज्ये कंस व जरासंध यांच्या जाचातून मुक्त केली. पण त्यांच्याच पुत्रांच्या हाती सोपवून स्वत: नामानिराळा राहिला.

कृष्णाची अर्थनीती समता व बंधुता या मूल्यावर आधारलेली होती. एका धनिक व्यक्तीला दैवकृपेने लाभला होता तो हिरा, अनमोल असाच होता. पण कृष्णाने तो राजाच्या कोषागारात जमा करण्यास सांगितले. म्हणजे संपत्तीचा उपयोग न्याय व नीतीला अनुसरुन व्हावा असा कृष्णाचा



विचार होता. द्वारकानगरीच्या उभारणीत व उपभोगात जी नीती वापरली तीच अर्थनीती सर्व ठिकाणी कृष्णाने अंमलात आणली. जेथे जेथे वैभव धनसंपत्ती आहे त्याचा उपभोग जरुर घ्यावा पण संयमाने. कारण धनाची लालसा कधीच संपत नाही. या त्याच्याच विचारांनी ही अर्थनीती भरली होती. संपत्ती ही यज्ञ, दान अशा वापरासाठी द्यावी व ती यज्ञीय म्हणजे परोपकारासाठी असावी असा अलिखित दंडक होता.

भीष्म, द्रोण, द्रोणाचार्य अशा विद्वान समाजधुरीणांनी दुष्ट दुर्योधन व धृतराष्ट्र यांच्यावर, पांडवांना संपत्तीचा योग्य वाटा देण्याबाबत जर दबाव आणला असता तर कदाचित हे महाभारताचे विनाशकारी युद्ध थांबले असते. केवळ पाच गावावरसुद्धा पांडव समाधानी राहिले असते. पण दुर्योधनाच्या धनाच्या मोह व आसक्तीमुळे हे युद्ध लादले गेले. कृष्ण एवढ्या मोठ्या संपत्तीचा मालक होता पण ते धन कृष्णाने विश्वस्ताच्या भूमिकेतून वापरले. गांधीजींनी हीच कल्पना मांडली. संपत्ती असणाऱ्या प्रत्येकाने संपत्तीचे व्यवस्थापन विश्वस्त म्हणून करावे. त्या संपत्तीचा मालक म्हणून नव्हे. ही कृष्णनीती आज जितक्या प्रमाणात वापरली जाईल तेवढी श्रीमंत गरीब यांच्यातील दरी कमी होईल.

# जगाला कृष्णनीतीची-गीतेची गरज

श्री कृष्णाने ५१५० वर्षापूर्वी कुरुक्षेत्रावर अर्जुनाला गीता सांगितली. संपूर्ण गीतेत 'हिंदू' हा शब्दही नाही. अर्जुनाच्या निमित्ताने सर्व मानवजातीला हे जीवन तत्वज्ञान सांगितले आहे. २१ व्या शतकात जगाला या तत्वज्ञानाची आवश्यकता आहे का ? याचे ठाम उत्तर 'आहे' असेच आहे. तशी कारणेही आहेत. गेल्या शतकात दोन महायुद्धे होवून गेली आहेत तिसऱ्या महायुद्धाच्या उंबरठ्यावर जग उभे आहे. रशिया, चीन, अमेरिका, ब्रिटन, फ्रांस... अशा अत्यंत प्रगत देशांकडे तसेच भारत, पाकिस्तान, कोरिया, इस्त्रायल अशा लहान मोठ्या देशांकडे अशी विनाशकारी अण्वस्त्रे आहेत की, त्यांच्या वापराने संपूर्ण जगच विनाशाच्या खाईत लोटले जाईल. इसिस, तालिबान, लष्करी तोयबा... अशा दहशतवादी संघटनांनी काही देशांना

आपले लक्ष्य बनविले आहे. गेल्या महिन्यात एका दहशतवादी संघटनेने पाकिस्तानातील लष्करी शाळेतील दीडशे कोवळ्या मुलांना निर्दयपणे गोळ्या घालून ठार केले. इसिससारखी संघटना अमेरिकन, ब्रिटीश पत्रकारांची अमानुषपणे जाहीर हत्या करीत आहे. अशा उग्र संघटनांच्या हाती जर एखाद्या देशातील अण्वस्त्रे हाती पडली व त्यांनी याचा गैरवापर करण्याचे ठरविले तर ? कारण यांच्या आत्मघातकी पथकांनी प्रत्यक्ष अमेरिकेवर व भारतावर हल्ले करुन याचा इशारा आधी दिला आहे. आज जग केवळ दोन विभागात विभागले आहे. एक पाशवी असुरी सत्ता व दुसरी ज्यांना पृथ्वीवर सर्वांचे कल्याण व्हावे असे वाटणारी सज्जनांची सत्ता, धर्माचा चुकीचा अर्थ लावून, धर्माच्या नावावर शस्त्रांच्या बळावर जगाला इस्लाम करण्याचे उद्दिष्ट ठेवणाऱ्या या राक्षसी, उग्रवादी संघटना स्वत:चाही आत्मनाश घडविणार व जगाचाही. म्हणून मी म्हणतोय की जग महायुद्धाच्या उंबरठ्यावर उभे आहे.

महाभारत युद्धाच्या वेळी सुद्धा असुरी शक्ती व दैवी सज्जनांची शक्ती अशा दोन प्रवृत्तीमधील तो संघर्ष होता. त्या निर्णायक युद्धामध्ये कृष्णाने आपल्या हाती सर्व सूत्रे घेतली होती. अर्जुन जेव्हा आपल्याच बांधवांना ठार करायचे हे जाणून अत्यंत मोहवश होऊन निराशेने जेव्हा शस्त्रे खाली ठेवतो. तेव्हा त्याला युद्धाला प्रवृत्त करण्यासाठी जे तत्वज्ञान कृष्णाने सांगितले ती ही गीता.

आजही तीच परिस्थिती आहे. कृष्णाने जसे लहान-थोर सर्व राजांचे संघटन केले. तसेच संघटन आज होण्याची गरज आहे. जिहादी मुस्लीम व अन्य सर्वजण असे जर झाले तरच पृथ्वी सुरक्षित राहील. कारण मध्यपूर्वेतील अनेक देशांचा या दहशतवाद्यांना पूर्ण विरोध आहे. वास्तविक 'इस्लाम' या शब्दाचा अर्थच शांती असा आहे. पण या जिहादांनी अशांततेचे टोक गाठले आहे. ज्या देशांनी हा भस्मासुर उभा केला. आज त्यांनाच याची फळे भोगावी लागत आहेत.

कृष्णाने गीतेतून जे तत्वज्ञान सांगितले त्या तत्वज्ञानांत एका सर्वसमावेशक, उदार, लवचिक, सर्वांना सहजसुलभ मान्य होणाऱ्या एका वैश्विक धर्माची सर्व सूत्रे सामावलेली आहेत. हिंदू, ख्रिश्चन, बौद्ध, इस्लाम



अशा सर्व धर्मातील सर्वांना मान्य होणारी अशीच ही सूत्रे असतील. जगातील दोन महान देशांच्या प्रमुखांना भारताच्या पंतप्रधानांनी अशा अचूक वेळी भगवद्गीता भेट म्हणून दिली यातील सूचकता हीच असेल का ?

सर्व वेद-उपनिषदातून 'वसुधैव कुटूंबकम्' या तत्वाचा उद्धोष केला गेला. सर्व पृथ्वी ही एका कुटूंबासारखीच आहे, हे भारतीय तत्वज्ञानाचे सार आहे. म्हणून वेदांचे जे ज्ञानकांड. उपनिषदे यातून अशाच सूत्रांचा पुन्हा पुन्हा उल्लेख केला आहे. श्वेता-श्वेतर उपनिषदातील एक मांगलिक श्लोक याचे सार सांगतो, तो असा -

**एको देव: सर्वभूतेषु गूढ: सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा ।**
**कर्माध्यक्ष: सर्वभूताधिवास: साक्षी चेता केवलो निर्गुण:च ।।**

अर्थ : ''सर्वांच्या अंत:करणात असलेला, सर्वव्यापी, गूढ, अधिष्ठाता, चैतन्य स्वरुपात असणारा, साक्षीरुपाने असणारा, अत्यंत शुद्ध व निर्गुण स्वरुपात असणारा देव एकच आहे.''

असे हे एकाच परमात्म्याचे हे वर्णन आहे. म्हणूनच हे तत्वज्ञान म्हणते,

**''एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति ।''**

एकच सत्य विद्वान मंडळी वेगवेगळ्या तऱ्हेने सांगतात. कोण राम कृष्ण म्हणतो, कोण अल्लाह म्हणतो, कोण बुद्ध , येशू म्हणतो या पृथ्वीवर असे ईश्वररुप होऊन आलेले अवतार सर्व धर्मात आहेत. अनेक नावाने, रुपाने नटलेली ही परमसत्ता एकच आहे.

,म्हणून आपण सर्वजण एकाच ईश्वराची लेकरे आहोत, शरीर, रंग, रुप वेगळे पण मन, बुद्धी, चित्त, अहंकार, गुण, दुर्गुण, विकार सर्वांचे एकच आहेत ना ? जे जे धर्म आहेत त्या सर्वांनी मनुष्य जातीच्या सर्वांच्या कल्याणाचाच विचार केला आहे. कोणत्याही धर्माने खोटे बोला, दरोडे घाला, खून करा.... असे तरी काही सांगितले नाही. ईश्वराच्या पूजेचे, दया, क्षमा, शांती, सद्गुण, सत्य, अहिंसा या महान मूल्यांचाच पुरस्कार केला आहे.

आपल्या प्राचीन तत्वज्ञानाने सर्वमानव जातीच्या सुखाचा विचार केला.

**सर्वेभवन्तु सुखिन: सर्वे सन्तु निरामय: ।**

**सर्वे भद्राणी पश्यन्तु मा दु:खं आप्नुयात् ।।**

**अर्थ –** ''विश्वातील सर्वांनी सुखी असावे, सर्वांनी निरामय आयुष्य जगावे, सर्वांनी कल्याणकारक पाहावे व कोणीही दु:खी असू नये.''

वेदातील सर्व शांती मंत्र याच स्वरुपाचे आहेत.

''ईशावास्यम् इदं सर्वं यत् किंच जगल्यांजगत्'' या ईशोपनिषदाच्या पहिल्याच श्लोकात म्हटले आहे की,

''या जगतामध्ये जे जे काही आहे ते सर्व ईश्वराने भरलेले आहे.''

सातशे वर्षापूर्वी श्री ज्ञानेश्वरांनी गीतेवर भाष्य लिहीले. त्यात या विश्वधर्माचा पुरस्कार केला आहे.

**हे विश्वचि माझे घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**

**किंबहुना चराचर । आपण जाहला ।। १२.२१३ ।।**

''हे विश्वच माझे घर आहे. असा ज्याचा दृढ निश्चय झाला आहे. त्याला संपूर्ण जग आपल्याहून वेगळे आहे असे वाटतच नाही.''

श्री ज्ञानेश्वर हे मानवतावादी आध्यात्मिक संत आहेत. म्हणून भगवंताकडे प्रसाद मागताना पसायदानाची रचना केली. व भगवंताकडे विश्वातील सर्व लोकांना सुख, शांती मिळावी म्हणून प्रार्थना केली. त्यांनी भगवंताचे स्वरुप सुद्धा विश्वात्मक केले आहे. म्हणून त्यांची दृष्टीसुद्धा वसुधैव कुटूंबकम् । अशी होती. त्यांना संपूर्ण जगात भेदाभेद काहीच दिसत नाही. म्हणून ते भगवंताचे वर्णन करताना म्हणतात,

**''जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।।''**

''जेथे जेथे चैतन्य आहे. त्या सर्वप्राणीमात्रात तो भगवंत आहे असेच मानतात.''

भारतातील सर्व संतानी या वैश्विक धर्माची पताका फडकविली कारण आपले प्राचीन तत्वज्ञान !



गीता हे सर्व उपनिषदांचे सार आहे. त्यामुळे वेदकाळात व त्यानंतरही वैश्विक धर्माचा आग्रह सर्वांनी धरला. हिंदू धर्माचे सहिष्णूतेचे व सर्वसमावेशक असे असणारे हे तत्वज्ञान, २१ व्या शतकातील नव्या सर्व धर्मांच्या एकत्रीकरणासाठी निश्चित उपयोगी ठरेल. हिंदूधर्माचे शुद्धीकरण या प्रकरणात जातीविरहीत व्यवस्था व स्त्री सबलाकरण हे होणे अत्यंत जरुरीचे आहे. किंबहुना समता, बंधुता, स्वातंत्र्य या वैश्विक संकल्पना मूर्त स्वरुपात आणण्यासाठी त्याची जरुरी आहे हे मी मांडले होते.

एवढे सुंदर, पवित्र तत्वज्ञान असताना, त्यात कर्मकांडाचा अतिरेक व भ्रष्टाचार व जन्मावर आधारलेली जातीव्यवस्था यांनी हिंदूधर्माला अवक़ळा आणली. ही हिणकस स्थिती बदलून शुद्ध हिंदूधर्माची स्थापना करण्याचे अवतार कार्य आधी केले पाहिजे. नाहीतर आपले अध्यात्म व तत्वज्ञान ठोसपणे कोण सांगेल व कोण ऐकेल ?

''कृष्णं वंदे जगद्गुरुं'' असे म्हटले जाते. ते ही हजारो वर्षांपूर्वीपासून इस्कॉन सारखी आंतरराष्ट्रीय संस्था कृष्ण विचाराने प्रभावित आहे. प्रभूपादांनी या संस्थेची स्थापना केली. लाखो विदेशी या संस्थेचे सभासद आहेत. कृष्णाचे सर्व उत्सव मोठ्या थाटामाटात साजरे केले जातात. जगाच्या अनेक शहरात सुंदर मंदिरे या संस्थेने बांधली आहेत.

कृष्णाला जसे जगद्‌गुरु म्हटले जाते. तसे भारताला अध्यात्मिक क्षेत्रात जगद्‌गुरु होता येईल का ?

भारताचे सुवर्णयुग जेव्हा होते त्यावेळी जगातील अनेक राष्ट्रे जन्माला सुद्धा आली नव्हती. अमेरिका साडेचार शतकापूर्वी अस्तित्वात आली. त्या सुवर्णयुगात भारताने विज्ञानक्षेत्रातसुद्धा भरीव कामगिरी केली होती. कणाद, सुश्रूत सारख्यांनी आपापल्या क्षेत्रात खूप संशोधन केले. त्या काळात आयुर्वेद गणित, खगोल अशा शास्त्रांमध्ये आपली खूप प्रगती झाली होती. महाभारत काळात सुद्धा वैज्ञानिक विकास खूप झाला होता. पण गेल्या दोन हजार वर्षात या भौतिक विकासाबद्दल भारतीयांच्या मनात अनास्था निर्माण झाली होती. ''ठेविले अनंते तैसेचि राहावे.'' – या कर्मविपाक सिद्धांताप्रमाणे जसे प्रारब्ध असेल तसे भोगावेच लागते. अशी दैवाधिनता शतकानुशतके

भारतात टिकून होती. त्यामुळे मोगल, ............. पोर्तुगीज, इंग्रज यांनी आपल्यावर आक्रमण करुन इथली संपत्ती लुटून नेली. तरी समाजाचा पुरुषार्थ कधी जागा झाला नाही. आता ही परिस्थिती बदलत आहे. पण प्रगत राष्ट्रांच्या तुलनेत आपण खूप मागे आहोत. लोकसंख्या प्रचंड असल्याने त्यावर आळा घालणे, नियंत्रण असणे गरजेचे आहे. चीनने 'एकच मूल' चा प्रयोग बराच यशस्वी केला. भारताला सुद्धा याची गरज आहे. भौतिक विकासासाठी लोकसंख्या नियंत्रणाची गरज आहे.

भारतात आज जगातील सर्वात जास्त तरुणांची संख्या आहे. परदेशात नोकरीनिमित्त गेलेल्या तरुणांची संख्या लाखोंच्या घरात आहे. त्या त्या देशांच्या प्रगतीत भारतीय तरुणांचा सिंहाचा वाटा आहे. या सर्वांना भारताविषयी निश्चित प्रेम आहे. त्यांना हे धर्मातील परिवर्तनाची आवश्यकता वाटते. स्वच्छ भारताबद्दल या तरुणांना याविषयी खूपच आस्था आहे. भारताची प्रतिष्ठा वाढेल असे उपक्रम शासनकर्त्यांची राबविले पाहिजेत. अशी रास्त मागणी त्यांची आहे. आंतरराष्ट्रीय जगतात ही प्रतिष्ठा वाढण्यासाठी, हुंडाबळी, अंधश्रद्धा, भ्रष्टाचार, स्त्रियांना समान वागणूक व भ्रष्टाचार निर्मूलनासारख्या गोष्टी अधिक गतीने व्हायला पाहिजेत. तरच आध्यात्मिक क्षेत्रात जगद्‌गुरु बनण्याचे स्वप्न साकार होईल. हिंदूधर्म शुद्धीकरण व वरील चळवळी होण्यासाठी शासनाबरोबर समाजाची मानसिकता बदलण्याचे मोठे काम आहे.

भारतातील तरुण व नोकरी व्यवसायानिमित्त परदेशात स्थायिक झालेले तरुण हे या परिवर्तनाच्या कामात उत्स्फूर्तपणे सहभागी झाल्यास हे अधिक गतीने घडेल. इथे या तरुणांनी एवढाच विचार करायचा की, देशाने मला काय दिले यापेक्षा मी देशाला काय देऊ शकतो. डॉ. अब्दुल कलाम यांनी या विचारांचा अधिक प्रसार, प्रचार केला.

तत्वज्ञान हे सर्वश्रेष्ठच आहे. पण या तत्वज्ञानाला अनुसरुन आचरण झाले की जगद्‌गुरुपद भारताकडे सहजपणे येईल. कृष्ण जगद्‌गुरु आहेच पण कृष्णनीती व कृष्णविचार यांचा प्रचार करण्याची नेमकी वेळ येऊन ठेपली आहे असे झाले की, कृष्णाने जसे सर्व सज्जनांची संघटना केली व असुरी



शक्तींशी लढा देऊन त्यांना जिंकले. त्याप्रमाणे या दहशतवादाविरुद्ध या सर्व देशांचे एकमत करण्यात पुढाकार घ्यावा. या दिशेने भारत सरकाराची पावले पडत आहेत हे मोठे आशादायक चित्र आहे.

यासाठी वैश्विक धर्माची संकल्पना या एकत्रित होण्यासाठी, कृतीत येणे गरजेचे आहे. हे कार्य स्वामी विवेकानंदांनी १८९३ मध्ये झालेल्या सर्वधर्मपरिषदेपासून सुरु केले. वेदांच्या व भगवद्‌गीतेच्या वैश्विक तत्वज्ञानाने भरलेली त्यांची भाषणे खूप गाजली. यामुळे अमेरिका व ब्रिटन मधील त्यांचे वास्तव्य वाढतच गेले. त्यांचा शिष्य परिवारही वाढत गेला. काहींनी हिंदू धर्म. स्वीकारुन भारतात येऊन स्वामींच्या कार्यात सहभाग घेतला. विवेकानंदांचा आत्मविश्वास एवढा होता की, ते म्हणायचे की, मला नचिकेताच्या वृत्तीचे शंभर तरुण मिळाले तर भारतासह जगाचे चित्र पालटून दाखवेन.

पंतप्रधानांनी 'योगा' च्या संदर्भात भरीव कार्य केले. एकशे पंच्याऐंशी देशांनी राष्ट्रसंघात एकमताने ठराव करुन आरोग्यासाठी योग स्वीकारला. एकवीस जून हा योगदिनही साजरा करण्याचे ठरले. आता आयुर्वेदाला असे अधिकृत स्थान मिळण्यासाठी आपल्या प्राचीन विद्येबरोबर त्याला वैज्ञानिक संशोधनाची जोड देणे आवश्यक आहे. पंतजली सारख्या योग व आयुर्वेदाला वाहून घेतलेल्या संस्था यावर मोठ्या प्रमाणावर संशोधन करीत आहेत. ॲलोपॅथिक औषधासारखे साईड इफेक्ट आयुर्वेदाला नसल्यामुळे या संशोधनानंतर ही आयुर्वेदिक औषधे पाश्चिमात्य देशात लोकप्रिय होण्यात काही अडचण येणार नाही.

अमेरिका, ब्रिटन सारख्या देशात भारतीयांची संख्या दिवसेंदिवस वाढत असल्याने भारतीय संस्कृतीतील आहार, संगीत, नृत्य, नाटक यांचे आकर्षण पाश्चात्यांमध्ये वाढत आहे. याला कारण तेथे स्थायिक झालेले भारतीय व वर्षानुवर्षे अखंड कार्य करीत असलेले अध्यात्मिक गुरु व आचार्य. यामुळे मंदिरे पाठशाला, ध्यान, शिबीरे, प्रवचने व सामाजिक कार्य यांच्या माध्यमातून भारतीय संस्कृती व अध्यात्म याची ओळख पाश्चात्यांना होतच आहे.

इतकी पार्श्वभूमी तयार असल्याने या वैश्विक धर्माची स्थापना राजकीय पातळीवरुन होणे सोपे आहे. अजूनही आपल्यातील असंख्य देव, संप्रदाय यामुळे बरेच संभ्रम आहेत. हे संभ्रम दूर करण्यासाठी आपल्या शुद्ध सनातन धर्माची व विविधतेत जी एकता आहे त्याची मांडणी शुद्ध स्वरुपात करुन जगासमोर मांडणे गरजेचे आहे. या सनातन भारतीय तत्वज्ञानाचे सार गीतेत असल्यामुळे, त्याची योग्य ती मांडणी, गीतेत असल्यामुळे, त्याची योग्य ती मांडणी, २१ व्या शतकाच्या जागतिक परिस्थितीच्या संदर्भात करणे गरजेचे आहे.

सर्व धर्मातील महान तत्वे ही आपल्या तत्वज्ञानात आहेतच. पण सर्वधर्मीयांचे संघटन वैश्विक पातळीवर करायचे असेल तर प्रत्येक धर्मातील उदात्त तत्वांचे आदान-प्रदान व्हायला पाहिजे. कर्मठपणामुळे माझा धर्म जे सांगेल तेच सत्य असे न मानता वैचारिक देवाण-घेवाण होणे महत्त्वाचे आहे. यासाठी २१ व्या शतकात, सर्वधर्मीयात उदारता, लवचिकता आणणे हे सर्वांचे सामायिक कर्तव्य आहे. संपूर्ण जगाचे इस्लामीकरण करणे व इतर धर्मीयांना काफीर समजणे व यासाठी शस्त्रे हातात घेऊन जिहाद पुकारणे हा आत्मघातकी खेळ बंद झाला पाहिजे. पण दुर्दैवाने धर्माचे चुकीचे तत्वज्ञान डोक्यात घेऊन शिकले सवरलेले तरुणही जेव्हा देश सोडून या अतिरेकींच्या मागे जातात, तेव्हा त्या त्या धर्मातील सुजाण लोकांनी त्यांना योग्य ते मार्गदर्शन करणे जरुरीचे आहे. जगातील प्रत्येकाला आपापल्या धर्माप्रमाणे उपासना करण्याचे स्वातंत्र्य आहे व त्याचा सर्वजण आदर करतात हे चित्र जेव्हा उभे राहील, तेव्हाच जगात शांती नांदेल, हिंसाचार थांबेल व जर यात बदल झाला नाही तर मात्र भगवंत जरी पुन्हा अवतरले तरी युद्ध अटळ असेल. जसे दुर्योधनाने आपला स्वभाव बदलला नाही व साधी पाच गावे द्यायलाही तयारी दाखविली नाही. तेव्हा कृष्णालाही युद्ध अटळ आहे असेच म्हणावे लागले. हिटलरच्या हुकूमशाहीमुळे व समूळ ज्यू वंशाचा नाश करण्याच्या प्रतिज्ञेने, संपूर्ण जगाला युद्धात लोटले. व शेवटी असुरी शक्तींचा विनाश झाला. ज्यू वंश नाश न पावता उलट आर्थिक दृष्ट्या सर्वशक्तीशाली झाला. ज्यूंच्या नव्या राष्ट्राची निर्मिती झाली. अमेरिकेच्या प्रशासनावर सर्वात मोठा



अंकुश ज्यूंचा आहे. इस्त्रायल भोवती सर्व मुसलमान राष्ट्रे असूनसुद्धा इस्त्रायल सुरक्षित आहे. कारण त्यांच्या लष्करी व आर्थिक सामर्थ्यापुढे सर्वजण हतबल ठरतात.

हा जगाचा इतिहास जेवढ्या लवकर या दहशतवाद्यांना समजेल तेवढे त्यांचे व जगाचेही त्यात हित आहे. इस्लाम म्हणजे शांतता. बंधूता व प्रेम. बुद्ध, महावीर भारतातच जन्मले. बुद्धाच्या तत्वज्ञानाने पूर्वेकडील देश बौद्धमय झाले. ख्रिस्तपूर्व ५६३ या वर्षी गौतम बुद्धाचा जन्म झाला. पस्तीसाव्या वर्षी बुद्धत्व प्राप्त झाले. पहिल्या प्रवचनात चार आर्यसत्यांचा उपदेश केला. जगात दुःख आहे हे सत्य आहे. दुसरे सत्य हे की, दुःखाचे कारण अविद्या किंवा अज्ञान. अविद्येतून तृष्णा व तृष्णेमुळे दुःख निर्माण होते. तिसरे सत्य असे - ज्या अर्थी दुःखास कारण आहे त्या अर्थी त्याचा निरोध करुन दुःखनाश होऊ शकते व चवथे सत्य हे की, या दुःख निरोधाचा ''आर्य आष्टांग मार्ग'' हा निश्चिम मार्ग आहे. म्हणून सम्यक् (शुभ) दृष्टी, सम्यक कर्म ... असे आठ मार्ग बुध्दाने सांगितले. याचे सार तीन मार्गात सांगितले. सम्यक् प्रज्ञा, सम्यक् शील व सम्यक् समाधी. हिंदुतत्व ज्ञानाप्रमाणे 'आत्मा' हे तत्व बुध्दाने मानले नाही. ''सर्वदुःखम्, सर्व क्षणिकं'' हे विचारांचे सूत्र आहे.

हे सर्व बौद्ध तत्वज्ञान आपल्या तत्वज्ञानातील शांकर अद्वैत मतास अत्यंत जवळचे आहे. फक्त दोघात महत्त्वाचा फरक आत्मवादी व अनात्मवादी एवढाच आहे. म्हणून शंकराचार्यांना प्रच्छन्न बुद्ध असे म्हटले जाते व हिंदूनी बुद्धाला आपला दहावा अवतार मानले.

ख्रिस्ती धर्मातील पाप-पुण्याचा विचार, ईश्वराचे ठिकाण आकाशात आहे हा विचार, पापक्षालनासाठी पश्चाताप हा मार्ग, बंधुभाव व सर्वात मोठे तत्व म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य. जैन धर्मामध्ये, महावीरांनी सांगितलेले अहिंसा हे तत्व व इच्छा नियंत्रणाचा संयमाचा मार्ग तसेच ज्यूंनी भौतिक विकासाचे म्हणजे अभ्युदयिनी हे तत्व सर्वांनी स्वीकारण्यासारखे आहे.

ही सर्व धर्मांची महान तत्वे भारतीय तत्वज्ञानांत अंतर्भूत अशीच आहेत. परमहंस रामकृष्णांनी थोडा फार फरक असलेल्या इस्लाम, ख्रिश्चन

अशा विविध धर्मांच्या उपासनेचा मार्ग घेऊन साधना केली. व त्या त्या धर्माप्रमाणे आत्मसाक्षात्काराची अनुभूती घेतली. या अनुभूतीत कमालीची साम्यता आढळली. म्हणूनच त्यांनी सर्वांनाच उपदेश केला – ''जितक्या व्यक्ती तेवढ्या प्रकृती व जेवढ्या प्रकृती तेवढे मार्ग. तुम्ही कोणत्याही मार्गाने त्या प्रभूकडे जाऊ शकता. सर्व मार्ग त्या एकाच अंतिम तत्वाकडे नेतात. म्हणून कोणीही आपल्याच मार्गाचे समर्थन न करता सर्वांचा आदर करावा. हे स्वत:च्या अनुभूतीने सांगितले. स्वामी विवेकानंदांनी सर्वधर्मपरिषदेत याचाच पुनरुच्चार केला. ईश्वराची रुपे अनंत आहेत व त्याच्या उपासनेचे मार्गही भिन्न आहेत. त्यांची नावेही अनेक आहेत. कोणी निर्गुणाची, कोण ईश्वराला 'नेति' 'नेति' म्हणेल. कोण त्याची व्याख्या करेल व एखादा म्हणेल की तो वर्णनाच्या पलीकडील आहे व पंचमहाभूताच्या देहाने ओळखता न येण्यासारखा आहे. अशा ईश्वराचे दर्शन केवळ अनुभूतीनेच घ्यावे.

भगवान श्रीकृष्णाने सांगितलेल्या गीतेत या सर्व विभिन्न धर्मांना एकत्रित करण्याचे सामर्थ्य आहे. जगातील सर्व लोकांचे ऐक्य करुन सर्वांच्या कल्याणासाठी एकच 'विश्वधर्म' निर्माण करण्याचे तत्वज्ञान ठासून भरलेले आहे. या विश्वधर्माचे विश्वात्मक ईश्वराचे वर्णन सातशे वर्षापूर्वी गीतेवर भाष्य करताना श्री ज्ञानेश्वरांनी केले आहे.

**''हे विश्वचि माझे घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ।।''**

आज जगाला 'ग्लोबल व्हिलेज''– 'जागतिक खेडे' असे म्हणतात. उंच आकाशातून पाहिले की जग पृथ्वी किती सुंदर दिसते ! जणू सुखाचा स्वर्गच. पण विचारांची प्रचंड झेप घेऊन अखिल मानवतेकडे पाहणाऱ्या ऋषी–मुनींना, जगाकडे पाहून 'एक कुटूंबच'' आहे. असे वाटले. म्हणून उपनिषदांनी ''वसुधैव कुटूंबकम्'' असा उद्घोष हजारो वर्षापूर्वी केला तर त्याच्यापुढे जाऊन, श्री ज्ञानेश्वरांनी जगाला ''आपले घरचं मानले.'' अशी ही उत्तरोत्तर उन्नत होणारी विचारधारा, जगाला टाहो फोडून सांगण्याचे उत्तरदायित्व, हिंदू धर्म स्वीकारेल का ?

मी असा प्रश्न केला, कारण या प्रचाराने काही जणांना भीती वाटण्याची



शक्यता आहे. या तत्वज्ञानाने आपल्या धर्माच्या लोकांना जर आकर्षित केले तर ? कारण ज्यांनी आपला धर्मच जगावर राज्य करेल असे आपले जीवित कार्य मानले आहे, त्या धर्मीयाना या विश्वधर्माच्या संकल्पनेची भीती वाटण्याचा संभव आहे. म्हणून सर्वधर्मीयांचे एकत्रीकरण करुन वैश्विक धर्माची स्थापना ही केवळ जगाच्या शांततेसाठी व सुखासाठीच असेल. स्वर्ग आकाशात आहे. की नाही याचा प्रत्यक्ष पुरावा आपल्याकडे नाही पण विनाशाची भीती असलेल्या, या पृथ्वीवरच स्वर्ग निर्माण करण्याचे सामर्थ्य मानवजातीला भगवंताने आधीच देवून ठेवले आहे. भगवंताने हे ईश्वरी सामर्थ्य देताना, गर्भित इशाराही दिला आहे की, त्याने सत्–असत्, दैवी–असुरी, स्वर्ग–नरक, सत्य–असत्य, सुख–दु:ख, प्रकाश–अंधार, गुण–दुर्गुण, न्याय–अन्याय, पांडव–कौरव, राम–रावण, कंस–कृष्ण.... अशा सर्व प्रकारची द्वंदे निर्माण करुन पृथ्वीवर पाठविले आहे. पाठविताना विष–अमृत हातात दिले व स्वर्गाची किंवा नरकाची निवड करण्याचे स्वातंत्र्य मात्र दिले. विचारांचे सामर्थ्य देवून निश्चित मार्ग स्विकारण्याचे बळ दिले. हीच बुद्धी लादेन सारखी विध्वंसकही बनू शकेल व तीच बुद्धी मलाला सारख्या सोळा वर्षाच्या मुलीला जगातील सर्वोत्कृष्ठ नोबेल प्राईजची मानकरी बनवू शकेल. जीने स्त्री–शिक्षणासाठी अतिरेकींच्या गोळ्या झेलल्या व जी मृत्यूच्या दाढेतून अल्लाहाच्याच इच्छेने जिवंत राहिली व लादेन मात्र भीतीने लपून बसलेल्या अवस्थेत बंदुकीच्या गोळ्यांची शिकार बनला.

आज संपूर्ण जगच स्वर्ग व नरक याच्या सीमारेषेवर उभे आहे. भगवंत म्हणतो, ''तूच तुझ्या जीवनाचा शिल्पकार आहेस, गती अथवा अधोगती, याला तूच जबाबदार आहेस, तुझ्या सुख दु:खाला तूच कारण आहेस. मी केवळ दृष्टा, साक्षी आहे.'' उद्धरेत आत्मना आत्मना आत्मानं..... (६.५) हे मी तुला आधीच सांगून ठेवले आहे. स्वत:चा उद्धार स्वत: करावा. आपल्या यशाला, अपयशाला कारणीभूत आपणच आहोत हे मी अनेक वेळा अनेक प्रसंगातून समजावले आहे. आपली नियती आपणच ठरविण्याचे स्वातंत्र्य व बळ तुला मी आधीच ईश्वर, अल्लाह, येशू, बुद्ध, महावीर..... माझ्या कोणत्याही रुपातला मी.... परमात्मा, सर्वसत्ताधीश, संपूर्ण ब्रह्मांडाची सूत्रे हलविणारा.....

याला जबाबदार नाही.

हे सत्य सांगण्याची जबाबदारी जगातील सर्व सज्जनांची आहे. म्हणून याच्या विचारमंथनासाठी सर्वांनी एकत्र येण्याची गरज आहे.

कृष्णविचार, कृष्णनीती ही एका विशिष्ट धर्माची संपत्ती नाही. सर्वभूतमात्राच्या कल्याणासाठी जगाला दिलेले हे विचार आहेत. ''वसुधैव कुटूंबकम्'' साठी प्रत्येक मनुष्याला दिलेले हे अमृत आहे. आजच्या भीषण परिस्थितीत जगाला निश्चित मार्गदर्शन करणारे असल्याने केवळ राष्ट्रध्यक्षांना अक्षररुपी ग्रंथाच्या रुपात गीता भेट म्हणून देऊन कार्यपूर्ती होणार नाही. तर गीतेच्या विचारांचे प्रत्यक्ष आचरण करण्यासाठी हीच योग्य वेळ आहे. सर्वांच्या विचार मंथनातून ही सांघिक कृती घडली तरच, मानवतेचे मारक असलेल्या अतिरेकींचे पाशवी शक्तींचे दमन होऊ शकेल. कंस, दुर्योधन, दुःशासन, जरासंध.... अशा दुष्टांना यमसदनाला पाठवून कृष्णाने पाच हजार वर्षापूर्वी हा आदर्श आपल्यासमोर ठेवला आहे. शांततेचे, अहिंसेचे सर्व प्रयत्न केल्यावरच कृष्णाने हे पाऊल उचलले हे मात्र ध्यानात घेतले पाहिजे.

कृष्णाचे हे जीवित कार्यच होते. सज्जनांचे रक्षण, दुर्जनांचा नाश व सर्वांचे कल्याण करणाऱ्या धर्माची स्थापना'' यासाठीच त्याचा जन्म होता, जगणे होते व जगण्याचे प्रयोजन होते. कृष्णनीती व कृष्णविचार घेणे म्हणजे स्वतः कृष्ण होणे किंवा करिष्ये वचनं तवं'' असे वचन देणाऱ्या अर्जुनाची भूमिका घेऊन अर्जुन झाले तरी चालेल.

पृथ्वीचे नंदनवन होण्यासाठी याची गरज आहे.

**।। कृष्णार्पणमस्तु ।।**





**श्री शिवमंदिर**
**क्षेत्र कणेरी मठ, कणेरी**



# लेखक परिचय

| | | |
|---|---|---|
| नांव | : | • प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| जन्म | : | • १९ जानेवारी १९४१ बेळगांव |
| शिक्षण | : | • १) एम.ए. (इंग्रजी-संस्कृत) २) एम.ए.(मराठी) |
| व्यवसाय | : | • १० वर्षे पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून व ३० वर्षे महाविद्यालयीन गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथे प्राध्यापक म्हणून - निवृत्त. |
| छंद व आवड | : | • देश विदेशात सतत भ्रमण - अमेरिका- कॅनडा- मिडलईस्ट - येथे प्रदीर्घ वास्तव्य व युरोपचे ११ देश चीन हाँगकाँग इ. देशभ्रमण<br>• वक्तृत्व-नाट्य-लेखन, वर्तमानपत्रे,मासिकांतून अनेक विषयांवर लेखन-व्याख्याने.<br>• निसर्गात पदभ्रमण हायकींग ट्रेकींग सतत २५ वर्षे<br>• योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्याने व प्रात्यक्षिक. |
| प्रकाशित पुस्तके | : | • सर्वांसाठी गीता - एक जीवनग्रंथ खंड १ ते ५<br>• दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी (खंड १ व २)<br>• कठोपनिषद, ईशावास्योपनिषद अशी चार उपनिषदे<br>• ''तरुणांनो, हे तुमच्यासाठी'' हे तरुणांसाठी पुस्तक प्रसिध्द<br>• ही सर्व पुस्तके, सिध्दगिरी गुरुकुल फाऊंडेशन, कणेरी व केशव भिकाजी ढवळे, मुंबई यांकडून प्रसिध्द. |
| सामाजिक कार्य | : | • गेली २५ वर्षे प्रवचने, व्याख्याने यातून समाजप्रबोधन टी.व्हीवर सलग दोन महिने प्रवचनमालिका. |
| संपर्क | : | • प्रा. द. ना. दुभाषी, 'हरिप्रसाद',९०५/३ अ, सरदार पार्क, देवकर पाणंद, पद्मावती कॉलनी, कोल्हापूर-४१६०१२<br>दूरध्वनी : ०२३१ - २३२४०३९, भ्रमणध्वनी : ९८२२५१८२४८. |